वापर आपल्याला आढळतो मध्यपूर्वेचा इतिहास आणि दंतकथा ह्यातील, शीरीं फरहाद, लैला मजनू, यूसफ जुलेखा ह्याचाहि सर्रास उपयोग उर्दू कवि करतात गालिबच्या उपमा गुंता गुंतीच्या आहेत त्यात फारसी शब्द सढळ हातानें वापरण्याकडे त्याचा कल दिसून येतो त्याच्या काव्यात आढळणाऱ्या फारसी शब्दांची यादी केली तर एक हजाराच्या वर भरेल आता रूढ असलेल्या उर्दू बोलभाषेंत यापैकीं बरेच शब्द वापरीत नाहींत ह्यामुळें भाषांतर शब्दशः केलं तर तें दुर्बोध होईल असे वाटले म्हणून काहीं ठिकाणीं, भावार्थ दिला आहे, काहीं ठिकाणीं दंतकथांची माहिती अनुवादातच दिली आहे फारसे उर्दू न येणारा, पण उर्दू काव्याची बैठक तरी कशाप्रकारची आहे ह्याबद्दल जिज्ञासा आणि कुतूहल बाळगणारा, सामान्य मराठी वाचकवर्ग आहे त्याची जिज्ञासा पूर्ण करता यावी हाच हेतु हा अनुवाद करताना मी समोर ठेविला आहे हा प्रयत्न कितपत यशस्वी झाला आहे हें ठरविण्याचं काम रसिकांचे आहे

ज्यांनीं ह्या कामात मला प्रोत्साहन दिलें आणि अनेक उपयुक्त सूचना केल्या त्यात, उर्दू संशोधनसंस्थेचे चालक प्राध्यापक नदवी, नागपुरचे सुपरिंटेंडिंग इंजीनियर श्रीयुत अयारे, लोकसत्तेचे सहसंपादक विद्याधर गोखले आणि गोविंद तळवलकर, माझे मित्र वै के बी जोशी या सर्वांचा मी ऋणी आहे

सेतुमाधव पगडी

“ सुशील ”, आर्थर बंदर रोड
कुलाबा, मुंबई
१ जुलै, १९५८

सेतुमाधव श्रीनिवास पगडी हे मराठवाड्यांतील, वाङ्मय, इतिहास व समाजशास्त्र ह्या विषयांचे गाढे अभ्यासक म्हणून विद्वज्जनांत ओळखले जातात. ते बहुभाषाकोविदही आहेत. मराठी व इंग्रजी ह्या भाषांव्यतिरिक्त कानडी, तेलगु, हिंदी, बंगाली, फार्सी, उर्दू, गोंडी, कोलामी ह्या भाषाही त्यांना चांगल्याच अवगत आहेत.

पगडी ह्यांचे घराणें मूळचें श्रीक्षेत्र वाई येथील. उत्तर-पेशवाईतील स्वाऱ्यांच्या निमित्तानें त्यांचे पूर्वज कर्नाटकांत स्थायिक झाले. श्री. सेतुमाधवराव ह्यांचा जन्म ता० २७ ऑगष्ट १९१० मराठवाड्यांत निलंगा ह्या गांवीं झाला. पुणें येथील न्यू इंग्लिश स्कूलमधून ते मॅट्रिक झाले. त्यांचें उच्च शिक्षण काशी व अलाहाबाद येथें झालें. हिंदु युनिव्हर्सिटीचे ते बी. ए. असून अलाहाबाद युनिव्हर्सिटीचे ते 'राज्यशास्त्र' ह्या विषयाचे एम्. ए. आहेत ह्या दोन्ही परीक्षा ते पहिल्या वर्गांत पहिल्या क्रमांकास उत्तीर्ण झाले.

महाविद्यालयीन अभ्यासक्रम आटोपल्यावर हैद्राबाद राज्यांत त्यांनीं नोकरी धरली. मामलेदाराच्या जागेवरून शिक्षणखात्याच्या सचिवाच्या जागेपर्यंत ते वाढत गेले. सध्या ते मुंबई राज्यात शिक्षणखात्याचे नायब सचिव म्हणून काम करीत असतात.

गेल्या वीस वर्षांत त्यांनीं विपुल ग्रंथरचना केली आहे. 'उषा,' 'अलकनंदा,' 'अशोकाचीं पानें' हे तीन लघुकथासंग्रह, 'त्रिलिंग देशांतील दैनंदिनी' हा निबंधसंग्रह, 'मराठवाड्यांतील आधुनिक कविता,' 'मराठवाड्यांतील गद्यवाङ्मय,' हे समीक्षणात्मक लेखसंग्रह, 'वरंगळचे काकतीय राजे,' 'सूफी संप्रदाय,' 'हैद्राबादच्या स्वातंत्र्याच्या चळवळीचा इतिहास' हे ऐतिहासिक ग्रंथ, असे नऊ ग्रंथ त्यानीं लिहिले आहेत. मराठीप्रमाणेंच इंग्रजींतही त्यांनीं लिहिलेले 'Among the Gonds of Adilabad' 'Tribal Welfare', 'A Grammar of the Gondi Language', 'A Grammar of the Kolami Language' हे ग्रंथ प्रसिद्ध आहेत. "The Freedom struggle in Hydrabad (1800 – 1920) ह्या ग्रंथाच्या तिन्ही खंडांचे त्यानीं संपादन केलें आहे.

मराठवाड्यांत मराठी भाषा व वाङ्मय ह्यांसंबंधीं अलीकडे जी एक नव्या उत्साहाची लाट उसळली आहे, तिला प्रेरक अशा ज्या कांहीं प्रमुख व्यक्ति आहेत, त्यापैकीं श्री. पगडी हे एक होत. मराठवाडा साहित्यपरिषदेचे ते कांहीं काळ अध्यक्षही होते.

मिर्झा असदुल्लाखान गालिब ह्याचें उर्दू काव्यवाङ्मयांतील स्थान हें अद्वितीय आहे. गालिबचा मृत्यु होऊन आज जवळ जवळ नव्वद वर्षें होत आलीं, परंतु त्याची लोकप्रियता आणि त्याच्या वाङ्मयाचा अभ्यास ह्या गोष्टी अद्यापही यत्किंचित् सुद्धा कमी झाल्या नाहीत हे विशेष होय. त्याच्या काव्याचे आणि गद्याचे ग्रंथ त्याच्या हयातींत प्रकाशित झाले, इतकेंच नव्हे तर त्याच्या मृत्यूपूर्वी त्याच्या ग्रंथांच्या एकाहून अधिक आवृत्त्या निघाल्या. इतर कवींच्या मानानें गालिबला विलक्षण प्रसिद्धि आणि लोकप्रियता लाभून त्याला 'उस्ताद' म्हणजे कविकुलगुरु म्हणून त्याच्या हयातींतच त्याला मान मिळूं लागला.

मिर्झा गालिबची उर्दू आणि फारसी रचना विपुल आहे. त्याच्या फारसी कविता संख्येनें त्याच्या उर्दू कवितांच्या चौपट भरतील. फारसींत त्याची गद्यरचनाही बरीच आहे. तैमूर घराण्याचा सुरवातीचा इतिहास, १८५७ सालांतील घटनांच्या विविध आठवणी, फारसी पत्रपद्धतीवर चर्चा, फारसी कोशावर टीकात्मक लिखाण असें गालिबचें फारसी गद्य-लिखाण आहे. उर्दूतील त्याचें प्रकाशित वाङ्मय म्हणजे त्याचा 'दीवान' ऊर्फ गझल-संग्रह किंवा कविता-संग्रह आणि त्यानें लिहिलेल्या पत्रांचा प्रचंड संग्रह होय. त्याच्या पत्रांनीं उर्दू गद्याला सोपें आणि सुटसुटीत वळण लावलें. उर्दू गद्याच्या घटनेंत गालिबचें स्थान म्हणजे केवळ असाधारण आहे.

मिर्झा गालिबची उर्दू कविता तसें पाहिलें तर संख्येनें फार मोठी नाही. सुमारें सवा-दोनशें गझला आणि पंचवीस-तीस कसीदा म्हणजे स्तुतिपर कविता, रुबाया आणि काहीं प्रासंगिक कविता मिळून तीनएक हजार ओळी भरतील. इतका गालिबचा काव्यसंसार आहे. पण भाषेवरील विलक्षण प्रभुत्व, कल्पनांचा तरलपणा, उपमांचा मार्मिकपणा, मानवी जीवनाचें सूक्ष्म निरीक्षण, प्रेमाच्या निरनिराळ्या अवस्थांचें सखोल वर्णन आणि तत्त्वज्ञानपर विचार ह्यांमुळें गालिबच्या कविता उर्दूतील इतर कोणत्याही कवींच्या काव्यकृतीपेक्षां उठून दिसतात खास !

असा हा अग्रगण्य उर्दू कवि इ. स. १८६९ सालीं पैगंबरवासी झाला. त्याच्या मृत्यू-नंतर त्याच्या ग्रंथांच्या अनेक आवृत्त्या निघाल्या आणि त्याच्या काव्यावर अनेक टीकात्मक ग्रंथ लिहिले गेले. गालिबच्या चरित्रकारांत सुप्रसिद्ध कवि अल्ताफ हुसेन 'हाली' ह्यानें लिहिलेलें 'यादगारे गालिब' हें महत्त्वपूर्ण होय. हालीला गालिबच्या सहवासाचा लाभ झाल्यामुळें

१ . . . .

त्यानें लिहिलेल्या चरित्रात जिव्हाळा आणि आत्मीयता आहे त्यानंतर डॉ विजनोरी, डॉ अब्दुल लतीफ, महमद अकाम इत्यादींनी गालिबचें चरित्र आणि वाङ्मय ह्यावर संशोधन पूर्वक ग्रंथ लिहिले आहेत अलीगड, लखनौ, दिल्ली, हैद्राबाद इत्यादि ठिकाणीं गालिबच्या काव्याची चर्चा करण्याकरिता मंडळें असून अंजुमन तरक्की उर्दूने गालिबसंबंधी अनेक विद्वानांचे लेख एकत्रित करून प्रकाशित केले आहेत

मिर्झा गालिबला इतकी प्रसिद्धि व लोकप्रियता का लाभली, त्याच्या वाङ्मयात कोणतीं वैशिष्ट्यें आहेत हे समजावून घेण्याकरिता त्याचा जीवनवृत्तांत समजून घेणें अत्यावश्यक आहे

'गालिब' आणि 'असद' हीं मिर्झा असदुल्लाखान गालिब ह्याचीं कवितेतील नावें होत गालिबचे घराणें हें मूळचें मध्य आशियातील समरकंदचे ते वंशानें तुर्क होते गालिबचा आजा कौकानबेग हा इ स १७५० च्या सुमारास आपलें नशीब काढण्याकरिता समरकंदहून हिंदुस्थानात आला दिल्लीला आल्यानंतर कौकानबेगला मोंगल लष्करात हुद्दा देण्यात आला आणि सरंजाम म्हणून एक परगणा पण देण्यात आला

वरील गोष्टीनंतर एक दोन वर्षांतच नसरुल्लाबेग पैगंबरवासी झाला ह्या सुमारास नवाब अहमदबख्शला इंग्रजांच्याकडून फीरोजपूर झरक्याची जहागीर मिळाली जहागिरीकरिता अहमदबख्शने पंचवीस हजार रुपये दरवर्षी इंग्रज सरकारात भरावयाचे असें ठरलें होतें नसरुल्लाबेगच्या मृत्यूनंतर त्याच्या स्वारांचें पथक तोडण्यात आलें वेळप्रसंगीं पन्नास स्वारांचें पथक हजर करण्याची जबाबदारी अहमदबख्शने आपल्यावर घेतली शिवाय नसरुल्लाबेगच्या मागें राहिलेल्या त्याच्या कुटुंबीयांची व्यवस्था पाहाण्याचेंहि अहमदबख्शने आपल्यावर घेतलें ह्याच्या मोबदल्यात पंचवीस हजार रुपयांचा वार्षिक वसूल इंग्रजांनीं त्याला माफ केला नसरुल्लाबेगला मिळालेले परगणे अहमदबख्शच्या जहागिरींत मिळविण्यात आले ही व्यवस्था इ स १८०६ मध्यें करण्यात आली ह्या व्यवस्थेप्रमाणें स्वारांच्या पथकावर पंधरा हजार आणि नसरुल्लाबेगच्या कुटुंबीयांवर दहा हजार खर्च करण्याची जबाबदारी अहमदबख्शने पत्करली

अहमदबख्शच्या घराण्याला अल्वारच्या महाराजांकडून लोहारूचा परगणा जहागीर म्हणून मिळाला होता अशा रीतीनें फीरोजपूर झरका आणि लोहारूच्या जहागिरीमुळें अहमदबख्शचें घराणें दिल्लींतील उमराव घराण्यात मोडूं लागलें लोहारूचे नवाब ह्या अहमदबख्शच्या वंशातील होत

मिर्झा गालिबचा बाप आणि चुलता ह्यांचा मृत्यु गालिबच्या लहानपणी झाल्यामुळें छोट्या गालिबचा सांभाळ त्याच्या आजोळीं झाला त्याचा आजा गुलाम हुसेन कमीदान ह्याचें घराणें सुखवस्तु लोकांत मोडणारें असल्यामुळें गालिबचें बालपण ऐषआरामात गेलें गालिबचें शिक्षण नजीर अकबराबादी व महमद मोअज्जम ह्या विद्वानांच्या देखरेखीखालीं झालें ह्याशिवाय अब्दुस्समद नावाच्या एका इराणी विद्वानाकडून आपल्याला ज्ञानाचा लाभ झाला असल्याचें गालिबनें नमूद केलें आहे परंतु अब्दुस्समद ही व्यक्ति काल्पनिक असावी असें कित्येकांचें मत आहे हिंदुस्थानातील विद्वानांच्या फारसी ज्ञानाविषयीं गालिबचें मत चांगलें नव्हतें पण आपलें फारशीचें ज्ञान इराणी विद्वानांच्या बरोबरीचें आहे हें दाखविण्याकरिता गालिबनें अब्दुस्समद ह्या इराणी गुरूचें काल्पनिक चित्र उभें केलें असावें असें अनेक संशोधकांचें मत आहे

वयाच्या तेराव्या वर्षी गालिबचें लग्न नवाब अहमदबख्शचा भाऊ इलाहीबख्श ह्याची कन्या उमराव बेगम हिच्याबरोबर झालें वर सांगितल्याप्रमाणें अहमदबख्श हा लोहारू आणि फीरोजपूर झरका ह्या जहागिरींचा नवाब असल्यामुळें ह्या श्रीमंत व प्रतिष्ठित घराण्याशीं गालिबचा विवाहसंबंध म्हणजे गालिबच्या दृष्टीनें सुयोगच होता विवाहानंतर गालिबनें आग्रा सोडून दिल्लीला कायमची वस्ती केली ह्यानंतर वीस-बावीस वर्षांचा होईपर्यंत गालिब हा आग्र्याला आजोळीं जाऊन-येऊन असे आग्र्यातील आपल्या आयुष्यासंबंधीं बरेच उल्लेख

त्यातच अहमदवरशच्या जहागिरीची वांटणी झाली. अहमदवरशला तीन मुलें होतीं. प्रथम पत्नीपासून झालेला शमसुद्दीन आणि द्वितीय पत्नीपासून झालेले अमीनुद्दीन आणि जियाउद्दीन. शमसुद्दीनच्या वांट्याला फीरोजपूर झरका आणि अमीनुद्दीन व जियाउद्दीन ह्यांच्या वाट्याला लोहारूचा परगणा अशी एकंदर इस्टेटीची वाटणी झाली.

गालिबनें आपली पेन्शन वाढून मिळावी असा नवाबापाशीं प्रयत्न केला. परंतु त्यात त्याला यश आलें नाहीं. शेवटीं कलकत्त्याला जाऊन राहत्याचा निकाल आपल्या मनासारखा लावून घ्यावा म्हणून गालिबनें इ. स १८२६ मध्यें दिल्ली सोडली.

दिल्लीहून निघून गालिब प्रथम लखनौला गेला. लखनौला तो जवळ जवळ एक वर्ष-भर होता त्या वेळीं लखनौच्या गादीवर गाजीउद्दीन हैदर हा बादशहा राज्य करीत होता. त्याच्या दरबारात आपली पोंच व्हावी ह्याचा गालिबनें प्रयत्न केला; परतु दरबारी लोकांच्या कुटिलपणामुळे त्यात त्याला यश आलें नाहीं. परतु लखनौचा सुप्रसिद्ध कवि नासिख ह्याच्या-बरोबर गालिबची ओळख झाली. ह्या काळांत त्यानें बऱ्याच फारसी आणि काहीं उर्दू कविता रचलेल्या दिसतात.

गालिबनें २७ जून १८२७ रोजीं लखनौ सोडलें तेथून कानपूर, बादा, अलाहाबाद ह्या मार्गे तो बनारसला पोहोंचला. बनारसचें वातावरण गालिबला आवडलेलें दिसतें आपल्या फारसी गजलांतून त्यानें बनारसचें मोठें आकर्षक वर्णन केलें आहे एका पत्रातून त्यानें असें म्हटलें आहे कीं, 'मी जर तारुण्यात बनारसला गेलों असतों तर तेथून माझा पाय निघाला नसता.'

बनारसहून निघून गालिब पाटणा आणि मुर्शिदाबादच्या मार्गानें २० फेब्रुवारी १८२८ रोजीं कलकत्त्यास पोहोंचला. तिथें पोहोंचल्यावर नबाब अहमदबरशच्या मृत्यूची त्याला बातमी मिळाली. गालिबनें अहमदवरशचा मुलगा नवाब शमसुद्दीन ह्याच्या विरुद्ध खटला चालविला होता. पण गालिबनें आपला अर्ज तत्कालीन गव्हर्नर जनरलपाशीं रुजू झाल्यावर अर्जाची चौकशी दिल्लीच्या एजंटामार्फत व्हावयाला पाहिजे असें दिल्लींतील आपला वकील हीरालाल ह्यास लिहिलें.

गालिबला बरेच दिवस कलकत्त्याला अडकून पडावें लागलें. पण चौकशी निकालात निघण्याचा रंग दिसेना अशा रीतीनें गालिबला आपल्या कामात अपयश मिळण्याचीं चिन्हें दिसू लागलीं. सुदैवानें गालिबला कलकत्त्यातील उर्दू-फारसी विद्वानांच्या मैफिलींतून भाग घेण्याची नामी संधि मिळाली. कलकत्त्यातील मुशायऱ्यातून गालिबनें अनेक उर्दू आणि फारसी कविता म्हटल्या आणि त्याच्या काव्यगुणाबद्दल त्याची सर्वत्र वाहवा झाली. कलकत्त्याला बऱ्याच विद्वानांशीं गालिबचा संबंध आला त्यात अब्दुल कादर रामपुरी, करम हुसेन बिलग्रामी, नेमतअली अजीमाबादी, अकबरअली मुतवल्ली इमामबाडा, सिराज अहमद इत्यादि

प्रमुख होते. विशेषतः सिराज अहमदशी गालिबचा फारसीतून बराच पत्रव्यवहार झाला. सिराज अहमदच्या सांगण्यावरून गालिबनें आपल्या उर्दू आणि फारसी कवितांचा संग्रह एकत्रित केला आणि त्या संग्रहाचें नाव 'गुलेराना' म्हणजे 'विकसित फूल' असें ठेविलें.

कलकत्त्यांत खटल्याचा निकाल लागत नाही हें पाहून गालिब २९ नोव्हेंबर १८२९ रोजीं दिल्लीस परतला. कलकत्त्यांतील दिवसांची गालिबला बरीच आठवण राहिली असें दिसतें. कलकत्त्यासंबंधीं त्यानें वर्णन केलेल्या खालील ओळी तर पहा—

✓ कलकत्तेका जो जिकर किया तूने हमनशीं
एक तीर मेरे सीनेमें मारा के हाये हाये
वो सब्जा जार हाये मुतर्राके है गजब
वो नाज़नीं बुतान खुदआरा के हाये हाये
सब्र आजमा वो उनकी निगाहें के हफ नजर
ताक़त रुबा वो उनका इशारा के हाये हाये
वो मेवा हाये ताजा वो शीरीं के वाहवा
वो बादा हाये नाब गवारा के हाये हाये

हे मित्रा, कलकत्त्याचा तू उल्लेख काय केलास! एक बाण माझ्या उरात मारल्यासारखें झालें आहे. तेथील हिरवळी आणि उद्यानें, तेथील शृंगारलेल्या, नटूनथटून फिरणाऱ्या युवती, त्यांचीं मनें अस्वस्थ करणारी दृष्टि आणि शक्ति हरण करणारे त्याचे संकेत, त्या शहरांतील सुंदर आणि मधुर फळें अन् तेथील उंची दारू! हाय हाय! काय काय म्हणून वर्णन करावें.

दिल्लींत आपल्या पेन्शनीसबंधानें गालिबनें खटपट आरंभली. दहा हजार रुपये वार्षिक ठरले असतांना ती कमी का करण्यात आली हा मुख्य प्रश्न होता. ही रक्कम पाच हजारावर आणण्यांत आली होती. ह्या पाच हजारांपैकीं पधराशें नसरुल्लाबेगच्या कुटुंबियाना आणि पंधराशें गालिब आणि त्याचा भाऊ मिर्झा युसुफ ह्यांना आणि उरलेले दोन हजार रुपये ख्वाजा हाजीखां ह्याच्या वांट्याला अशी विभागणी करण्यात आलेली होती. नवाब शमसुद्दीनचें म्हणणें असें कीं दहा हजारांचे पांच हजार सरजाम माल्कमनें केले. गालिबचें ह्यावर म्हणणें असें कीं फारसींतील तो ह्यासंबंधीं तयार केलेला हुकूमनामा बनावटी होय. पण माल्कम अजून ह्यात होता. त्याला विचारणा केली असता लॉर्ड लेकनें ठरविलेल्या दहा हजाराच्या वर्षासनांत कपात करून पाच हजारांवर रक्कम आणण्याचा हुकूमनामा अगदीं खरा असल्याचें त्यानें सांगितलें आणि त्यामुळें गालिबच्या विरुद्ध निकाल लागून त्याला आजन्म मासिक साडेबासष्ट रुपयांच्या पेन्शनीवर समाधान मानून घ्यावें लागलें.

इकडे शमसुद्दीननें रेसिडेंटचें मन वळवून आपल्या भागाला मिळालेली लोहारुची जाहागीर वर्षासनाच्या मोबदल्यांत परत आपल्या संस्थानांत मिळवून घेतली. ह्याविरुद्ध अमीनुद्दीननें कलकत्त्यांत अपील दाखल केलें. नवीन बदलून आलेला रेसिडेंट फ्रेजर हा अमीनुद्दीनला अनुकूल होता असें दिसतें. गालिबनें पण अमीनुद्दीनला पाठिंबा दिला.

गालिबला आपल्या पेन्शनीच्या कज्ज्यांत कर्ज बरेंच झालें होतें. आपली पेन्शन वाढेल अशी त्याला आशा वाटत होती पण ती आतां साफ खुंटली होती. सावकारांनीं कर्ज-फेडीबद्दल त्याच्यावर खटला भरला आणि त्याच्यावर डिक्री आणली. आपल्याला अटक होईल ह्या भीतीनें गालिबनें कित्येक महिनेपर्यंत घरातून बाहेर जाणें सोडलें होतें.

ह्याच सुमाराम नवीन रेसिडेंट फ्रेजर आणि नबाब शमसुद्दीन ह्यांच्यांतील पूर्वीचे मैत्रीचे संबंध जाऊन त्याऐवजीं बिघाड निर्माण झाला होता. त्यातूनच २२ मार्च १८३५. रोजीं फ्रेजरचा खून झाल्यामुळें दिल्लींत एकच खळबळ माजली. ह्या खूनप्रकरणाची रीतसर चौकशी होऊन त्यांत शमसुद्दीनवर आरोप सिद्ध झाला आणि त्याला ३ ऑक्टोबर १८३५. रोजीं फांशी देण्यांत आलें. नबाब शमसुद्दीनबद्दल दिल्लीतील जनतेंत सहानुभूति असल्यामुळें आणि गालिबचे नि शमसुद्दीनचे संबंध बरे नसल्यामुळें ह्या प्रकरणांतील चौकशींत गालिबचें अंग असावें असा दिल्लीवासियांना संशय आला आणि प्रतिकूल जनमताची झळ अशा प्रकारें गालिबला सोसावी लागली.

वाढतें कर्ज, लोकांची प्रतिकूल टीका ह्यांमुळें गालिबला बराच त्रास सहन करावा लागला. गालिबचें वैवाहिक जीवन विशेष सुखाचें होतें असें दिसत नाहीं. त्याला बरींच मुलें झालीं खरीं पण तीं वर्ष-सहा महिन्यावर जगलीं नाहीत.

तरुण वयांत गालिबचें प्रेम एका नर्तकीवर बसलें होतें. परंतु हा प्रीतिसंबंध फार दिवस टिकला नाहीं. कारण थोड्याच दिवसात त्या नर्तकीचा मृत्यु झाला. ह्या प्रसंगाचा उल्लेख गालिबनें चाळीस-पंचेचाळीस वर्षांनंतर लिहिलेल्या एका पत्रात केला आहे. आपल्या ह्या प्रेयसीच्या मृत्यूवर त्यानें लिहिलेलें शोकगीत खरोखरीच हृदयद्रावक आहे. उदाहरण म्हणून खालील दोनच ओळी पहा —

शरमें रुसवाईसे जा छुपना नकाबे खाकमें
खत्म है उल्फतकी तुझपर पर्दादारी हाये हाये

आपलें प्रेमाचें रहस्य बाहेर पडेल ह्या कल्पनेनें तूं आतां मातीच्या बुरख्याआड (मृत्यु) जाऊन लपलीस. आम्हीं पडदापद्धति पाहिली आहे पण तुझा हा पडदा म्हणजे हद्द झाली!

गालिबला मदिरेचें व्यसन होतें. रोजच्या रोज दारू प्यायला मिळाल्याशिवाय त्याला स्वस्थता वाटत नसे. माझ्यासमोर मदिरापात्र ठेवा आणि मग बघा माझ्या तोंडांतून शब्दसुमनें

७ . . . .

कशीं बाहेर पडतात तीं ! माझ्या हातात शक्ति नसेल पण डोळ्यात तर आहे ना ! मदिरेची सुरई अन् पात्रें माझ्या डोळ्यासमोर अद्याप राहूं द्या कसे ! मदिरासेवनाचा आनद कुणाला हवा आहे ! स्वत ला अन् जगाला विसरुन जाण्यासाठीं मदिरा हवीच — असे कितीतरी उद्गार गालिबच्या काव्यात आढळून येतात

गालिबनें ह्याच सुमारास दिल्लीच्या दरबारात प्रवेश मिळविण्याचा प्रयत्न केला त्या वेळीं अकबरशहा नावाचा बादशहा गादीवर होता 'जफर' हा त्याचा युवराज हाच 'जफ़र' पुढें बहादूरशहा ह्या नावानें दिल्लीच्या गादीवर बसला परतु इ स १८३५ च्या सुमारास त्याचें युवराजपद काढून घेऊन आपला दुसरा मुलगा सलीम ह्याला ते पद मिळावें अशी अकबर शहानें खटपट चालविली होती कवि जौक हा 'जफ़र' चा गुरु होता सलीम युवराज होईल ह्या आशेन गालिबनें एक कसीदा रचून त्यात त्याची स्तुति केली होती परंतु अकबरशहाचे प्रयत्न यशस्वी झाले नाहीत आणि शेवटीं अकबरशहाच्या मृत्यूनतर इ स. १८३७ मध्यें बहादूरशहा गादीवर आला आपण राजपुत्र सलीम गादीवर येईल अशी आशा बाळगीत होतो परतु त्याच्या ऐवजीं बहादूरशहाला गादी मिळाली ह्याची जाणीव होऊन गालिबला बहादूरशहाकडून आता मदत मागण्यास सकोच वाटू लागला

इ. स. १८४१ च्या ऑक्टोबर महिन्यात गालिबचा उर्दू कवितांचा संग्रह सर सैय्यद अहमद (त्या वेळी ते सर झाले नव्हते) आणि त्यांचे बंधू सैय्यद महमदखान ह्यांनी आपल्या सैयदुलमताने ह्या छापखान्यात छापून प्रसिद्ध केला. ह्या संग्रहाच्या प्रकाशनाने गालिबचा लौकिक उभ्या हिंदुस्थानात सर्वत्र पसरला.

इ. स. १८४२ मध्यें दिल्ली कॉलेजमध्ये काही नव्या नेमणुका करण्याचा सरकारने विचार केला. हिंदुस्थान सरकारचे चिटणीस मिस्टर टॉमस हे ह्या कामानिमित्त दिल्लीस आले. गालिबचा लौकिक त्यांच्या कानावर ह्यापूर्वीच गेला होता. त्यामुळें दिल्ली कॉलेजातील फारसीच्या प्राध्यापकाची जागा त्यांनीं गालिबला देऊ केली. गालिब हा टॉमस साहेबांकडे भेटण्यास गेला असता टॉमस आपल्या स्वागतासाठी बाहेर आला नाही ह्याचा विषाद मानून गालिबनें टॉमसनें दिलेली प्राध्यापकाची जागा नाकारली.

ह्या काळातील मुशायऱ्यातून गालिबनें फारसीतून कितीतरी कविता म्हटल्या. इ. स. १८२७ ते १८४७ पर्यंतच्या काळात गालिबची फारसी रचना उर्दूच्या मानानें अधिक भरते. परंतु उर्दूतून काव्यरचना अगदीं बंद होती असे मात्र नव्हे. पण गालिबचा ओढा उर्दूपेक्षा फारसीकडे अधिक होता ह्यात संशय नाहीं. इ. स. १८४५ मध्ये त्याचें फारसी दीर्घ काव्य "अब्रे गोहरबार" (मौक्तिकयुक्त मेघ) रचून झालं होतें. शहानामाच्या धर्तीवर महाकाव्य लिहिण्याची त्याची इच्छा होती पण प्रास्ताविक वंदना, प्रार्थना व साकीला आवाहन ह्याच्या पलीकडे गालिबची रचना गेली नाहीं.

इ० स० १८४७ मध्यें गालिबवर एक दुर्धर प्रसंग ओढवला. जून १८४७ मध्यें जुगार खेळण्याच्या आरोपावरून गालिबवर खटला भरण्यात येऊन त्याला सहा महिन्यांची कैद आणि दोनशे रुपये दंडाची शिक्षा सुनावण्यात आली. शहरचा कोतवाल फैजुल हसनखां हा गालिबचा शत्रु होता. त्यानेंच गालिबवर हें संकट आणलं होतें. गालिब तीन महिने तुरुंगात होता. नंतर इंग्रज अधिकाऱ्याच्या शिफारसीवरून त्याची सुटका करण्यात आली.

ह्या घटनेमुळें गालिबला अत्यंत दुःख झालें. ह्या काळात त्याचे आप्त आणि मित्र म्हणविणारे त्याच्याशी संबंध ठेवीनासे झाले, हे गालिबला विशेष जाणवलें. तत्कालीन सुविख्यात टीकाकार आणि कवि मुस्तफाखां शेफता ह्याने मात्र गालिबची ह्या प्रकरणात मनःपूर्वक विचारणा करून त्याला बहुमोल मदत केली.

इ० स० १८४७ त तुरुंगातून सुटून आल्यावर काले शहा नांवाच्या मौलवी आणि पीराच्या मदतीनें गालिबचा बहादूरशहा ऊर्फ 'जफ़र' च्या दरबारात शिरकाव झाला. काले शहाला बहादुरशहा फार मान देत असे. त्याच्या सांगण्यावरून बादशहानें त्याला आपल्या नोकरीत घेतलें. तारीख ४ जुलै १८५० रोजीं गालिबला मिर्जा नजमोद्दौला दबीरुल्मुल्क

९ . . . .

निजामजंग ही पदवी देऊन तैमुर घराण्याचा इतिहास फारसीमधून लिहिण्याच्या कामावर त्याची नेमणूक करण्यात आली हें काम गालिबला बादशहाचा वजीर हकीम अहसानुल्लाखान ह्याच्या शिफारसीवरून देण्यात आले त्याबद्दल वार्षिक मुशाहिरा सहाशें रुपयाचा ठरला

गालिब आता बादशहा बहादुरशहा ह्याच्या दरबारात येऊ–जाऊ लागला दरबारी मुशायऱ्यातून भाग घेणे, बादशहासमोर स्तुतिगीतें म्हणणें, आणि तैमुर घराण्याचा इतिहास लिहिणें हीं कामें त्याच्याकडे आलीं परंतु हा इतिहास काहीं त्यान लिहून पूर्ण केला नाहीं. 'मेहेरे नीमरोज' (मध्यान्हीचा सूर्य) ह्या नावान त्यानें जो ग्रंथ ह्यासंबधात लिहिलेला आहे त्यात तैमुर घराण्याची सुरवातीची थोडी हकीकत आलेली आहे पुढ ह्या कामासंबधानें बादशहाचें लक्ष साफ उडालें आणि हें काम हळूहळू बंद पडलें.

गालिबचा दरबारात प्रवेश होण्यास जे अनेक अडथळे होते त्यात राजकवि जौक ह्याचाही हात होता जौक हा प्रतिभाशाली कवि होता जौक, मोमिन आणि गालिब ही योग्यतेने समान अशी मंडळी त्याकाळच्या काव्यप्रांतावर आधिपत्य गाजवीत होती असें म्हटल्यास मुळीच अतिशयोक्तीच होणार नाहीं परंतु जौकच्या कवितातून दिल्लीकराच्या वापरातले आणि परिचयाचे शब्द, संकेत आणि वाक्यसंप्रदाय – ज्याना 'रोजमर्रा' म्हणजे नेहमींच्या बोलचालींतले म्हणत असत ते – विपुलतेन आढळतात ह्या उलट गालिबची कविता बरीच फारसी मिश्रित असल्यामुळे बऱ्याच जणाना दुर्बोध वाटे त्याच्या कवितेतील उपमा, अलंकार, वर्णन सहज ध्यानात येत नसत. ह्या सर्व कारणामुळें गालिबची शैली म्हणजे एक टीकेचा विषय बनला होता इ स १८४०–४२ च्या सुमाराम झालेल्या एका मुशायऱ्यात एक हकीम आगाजान ऐश ह्या कवीनें गालिबवर खालील ओळींतून उघड हल्ला चढविला होता

> ✓ "अगर अपना कहा तुम आप समझेमी तो क्या समझे
> मजा कहनेका जब है एक कहे और दूसरा समझे
> कलामे मीर समझे और जबाने मीरजा समझे
> मगर इनका कहा ये आप समझें या खुदा समझें"

जौकला कदाचित् असेंही वाटत असावें कीं गालिबचे महत्त्व जर वाढले तर त्यामानानें आपलें महत्त्व कमीं होईल. ह्या कारणामुळेंच गालिबचा दरबारात प्रवेश होण्यास बरेच दिवस लागले.

गालिबची दरबारात नेमणूक झाल्यावर थोड्याच दिवसात युवराज शहाजादा फतेहुल्मुल्क ह्यानें गालिबला आपला उस्ताद मानलें आणि चारशें रुपये वर्षासन नेमून दिलें

आतापर्यंत गालिबची फारसीकडे ओढ होती. "माझ्या काव्यातील खरापुरा रस अनुभवायचा असेल तर माझें फारसी काव्य वाचा; नीरस उर्दू काव्य कशाला वाचता" अशी गालिबने पुढील ओळींतून सूचना केलेली आहे

"फारसी बीन तानबीनी नक्शहाये रंगारंग
बगुजर अज मजमुए उर्दूके वेरंगे मन अस्त"

परंतु असें जरी असलें तरी दिल्लीच्या दरबारात फारसीवरचें लक्ष कमी होऊन उर्दूचें महत्त्व वाढत होतें फारसी जाणणारी मंडळी कमी होऊं लागली होती खुद्द बहादूरशहा हा 'जफर' ह्या टोपण नावानं उर्दूतून काव्यरचना करी आणि कधि जौकाकडून त्यात सुधारणा करून घेई आता फारसी जाणणारे राहिले नाहींत अशी तक्रारी गालिबने कित्येक ठिकाणीं केलेली आढळते त्याला स्वतःच्या फारसी भाषेवरील अप्रतिम प्रभुत्वाचा भारी गर्व होता आणि त्याच प्रमाणात तो हिंदुस्थानातील फारसी लेखकांना तुच्छ समजत असे ह्या त्याच्या वृत्तीमुळे त्याला पुढं अनेक लेखकांशीं कट्टु वादविवादाचे प्रसंग अनुभवावे लागले

बहादूरशहाशीं संबंध आल्यामुळें गालिबने आपलें लक्ष पुन्हा उर्दूकडे वळविलें जुन्या कवितांवर त्यानें पुन्हा नजर फिरविली दुर्बोध कविता शक्य तितक्या सुबोध करण्याचा प्रयत्न केला आणि आपल्या नवीन कवितांना सुबोध आणि सुटसुटीत वळण लावलें

दरबारात कवी जौकशीं गालिबचे संबंध कांहीं खेळीमेळीचे राहिले नाहींत एखादा प्रसंग उद्भवावा आणि दोघांचे आपसात गैरसमज वाटावे असें अनेक वेळा घडलें राजपुत्र जवानबख्तच्या लग्नाच्या वेळचा प्रसंग येथें नमूद करावासा वाटतो तो असा—

राजपुत्र जवानबख्त ह्याच्या विवाहाच्या वेळी सेहेरागीत रचण्याची वेळ आली आपल्याकडील मंगलाष्टकांप्रमाणें मुसलमान समाजात लग्नप्रसंगीं हे सेहेरागीत रचण्याची पद्धति आहे सेहेरा म्हणजे मुंडावळ त्याची स्तुतिगीतें रचण्यात कवीची परीक्षा होत असे. गालिबनं राजपुत्र जवानबख्त ह्याच्या विवाहप्रसंगीं जो सेहेरा म्हटला त्यात शेवटच्या ओळी खालीलप्रमाणें होत्या—

हम सुखन फहम हैं गालिबके तरफदार नहीं
देखे इस सेहेरेसे कहदे कोई बेहेतर सेहेरा

आम्ही रसिक आहोत गालिबचे पक्षपाती नाहीं आम्हीही पाहू कीं ह्या सेहेऱ्यापेक्षा चांगला सेहेरा कुणी म्हणतो का ते

गालिबने सेहेऱ्यातून मारलेला हा टोमणा जौकला उद्देशून होता असें सर्वांच्या तोंडीं झालें बादशहानें गालिबचा सेहेरा जौकला दाखवून त्याचें उत्तर देण्यास सांगितलं जौकनें त्याचें उत्तरात एक सेहेरा लिहून काढला त्यात कवीन सेहेरा लिहावा तर असा लिहावा अशा प्रकारचा उलट टोमणा जौकनें गालिबला दिला बहादूरशहाचा त्या प्रसंगामुळें आपल्या-

वर राग झाला आहे हें पाहून गालिबनें एका गोड कवितेंत बादशहाची समजूत घातली. आपला उद्देश कुणावर हल्ला करण्याचा नव्हता. आपण पिढीजाद शिपाईगडी आहोंत. काव्य-लेखनावरच कांहीं आपला मानसन्मान अवलंबून नाहीं. आपल्याला बादशहाचे सेवक होणें लाभलें हें भाग्य काय कमी आहे. जौक़शीं मी कशाला वैरें भाडूं ?

उस्तादे शहासे हो मुझे पुरखाशका खियाल
ये ताब, ये मजाल, ये ताक़द नहीं मुझे
किस्मत बुरी सही पे तबीयत् बुरी नहीं
है शुक्रकी जगहके शिकायत नहीं मुझे
सादिक़ हूं अपने कौलमें गालिब खुदा गवाह
कहता हूं सच के झूटकीं आदत नहीं मुझे

असें म्हणून गालिबनें बादशहाची समजूत घातली आणि हें प्रकरण मिटविलें.

इ. स. १८५२ मध्ये गालिबचा मित्र सुप्रसिद्ध कवि मोमिन ह्याचा मृत्यु झाला. त्याच वर्षी गालिबचा प्राणाहून प्रिय असलेला आप्त त्याच्या मेहुणीचा मुलगा जैनुलाबिदीन आरिफ ह्या ऐन तारुण्यांत निवर्तला. गालिबचीं स्वतःचीं मुलें पांच-सहा महिन्यावर अशीं जगलीच नाहींत त्यामुळें आरिफ़वर त्याचें विलक्षण प्रेम होतें. त्याच्या मृत्यूवर गालिबनें अतिशय हृदयस्पर्शी असें शोकगीत रचलें आहे.

लाजिम् थाके देखो मेरा रस्ता कोई दिन और
तनहा गये क्यों अब रहो तनहा कोई दिन और

हे आरिफ, तूं एकटा निघून गेलास. मी बरोबर येण्याची वाट तरी पाहायची होतीस. आतां परलोकांत तुला कांहीं दिवस एकट्यानेंच काढावे लागतील.

ह्या वरील ओळींनीं त्या शोकगीताला सुरवात झालेली आहे. आरिफच्या मृत्यूनंतर त्याचीं लहान मुलें हुसेन शहा अली आणि बाकर अली ह्यांना गालिबनें आपल्या घरीं आणून त्यांचा संभाळ केला.

इ. स. १८५४ मध्यें कवी जौक ह्याचा मृत्यु झाला. आतां दिल्लींतील कविश्रेष्ठांपैकीं गालिबच काय तो एकटा उरला होता. ह्याच सुमारास फ़खरेहकच्या मार्फतीनें गालिबचा रामपूरचे नवाब युसुफ अली ह्यांच्याशीं निकटचा संबंध आला. जौकच्या मृत्यूनंतर बहादूर-शहानें जौकची राजकवीची जागा गालिबला दिली ; आणि स्वतःच्या कविता तो गालिबकडून तपासून घेऊं लागला. बहादूरशहाच्या धार्मिक वृत्तीचा थोडाफार परिणाम गालिबवर झाल्या-शिवाय राहिला नाहीं. गालिबच्या काव्यातून सूफी तत्त्वज्ञानाची जी झांक दिसते त्याचें थोडें तरी श्रेय बहादूरशहाच्या सहवासाला द्यावें लागेल.

राजकवीची जागा लाभल्यानें गालिबला स्वास्थ्य लाभलें. पेन्शनची रक्कम कांहीं वाढली नाहीं तरी बहादूरशहाच्या ह्या नोकरीत त्याला थोडी फार मिळकत होई. रामपुरच्या नवाबाकडूनही त्याला थोडें फार उत्पन्न होत असे. राजकवि म्हणून ह्याशिवाय त्याची चोहोंकडे प्रसिद्धि झाली ती निराळीच. अल्पावधींतच त्याच्या उर्दू आणि फारसी कविता सर्वतोमुखीं होऊन तो कविश्रेष्ठ म्हणून ओळखला जाऊं लागला. आपले कवितासंग्रह प्रसिद्ध झालेले पाहाण्याचें भाग्य त्याला लाभलें.

*परंतु अगदीं ह्याच सुमारास म्हणजे इ० स० १८५७ मध्ये हिंदुस्थानांत प्रचंड आणि* प्रलयंकारी संग्राम उद्भवून दिल्लीच्या राजघराण्याची त्यांत आहुति पडली आणि गालिबच्या भोंवतीं वावरणारें आणि त्याला परिचित असणारें सारें जग हां हां म्हणतां उध्वस्त होऊन गेलें.

इ० स० १८५७ च्या मे महिन्याच्या सुरवातीला मीरतहून आलेल्या शिपायांनीं दिल्ली घेतली आणि बहादूरशहाला तख्तावर बसविलें. तो सम्राट आहे म्हणून त्या शिपायांनीं सर्वत्र दवंडी पिटली. दिल्ली शहरांतील इंग्रजांची क्रूर कत्तल करण्यात आली. चार महिनेपर्यंत दिल्ली शिपायांच्या ताब्यांत होती. सप्टेंबर महिन्यांत दिल्ली इंग्रजांनीं फिरून आपल्या ताब्यांत घेतली. ह्यानंतरच्या झालेल्या लुटमारीनें आणि कत्तलीनें दिल्लींत हाहाःकार उडाला. सम्राट बहादूरशहाची चौकशी करण्यांत येऊन त्याला रंगूनला पाठविण्यांत आलें. त्याच्या मुलांचा अमानुषपणें वध करण्यांत आला. राजघराण्यातील कित्येकाना फांसावर लटकावण्यांत आलें. राजवाड्यातील स्त्रियांची अन्नान्नदशा होऊन अनेक सुशील स्त्रिया देशोधडीला लागल्या, अनेकींनीं सामान्य माणसाबरोबर विवाह केले तर कांहींनीं अनैतिक आयुष्य स्वीकारलें. शहरांत हजारोंची कत्तल करण्यांत आली. कोट्यवधि रुपयांची संपत्ति लुटली गेली. शेकडों इमारती जमीनदोस्त करण्यांत आल्या. अशा रीतीनें दिल्ली गोऱ्यांनीं उध्वस्त करून टाकली.

स्वातंत्र्यसंग्रामाच्या काळांत गालिब हा दिल्लींत होता. त्याचे अनेक आप्त, परिचित आणि मित्र ह्या समरांत ठार मारले गेले होते. त्याचा भाऊ युसूफ मिर्झा हा ह्याच काळात आजारी पडला आणि मरण पावला. गालिबचा भाचा आशूरबेग व त्याचा मुलगा अहमद मिर्झा ह्यांचा वध करण्यांत आला. गालिबचा मित्र फज्लेहक खैराबादी ह्याला काळ्या पाण्यावर पाठविण्यात आलें. खुद्द गालिबचें घर सुरक्षित राहिलें. कारण हकीम महमूदखां ह्याचे पतियाळच्या महाराजांशीं घनिष्ठ संबंध होते आणि हकीमसाहेब ज्या भागांत राहात असत तिथेंच गालिबचें घर होतें. पतियाळाच्या सैनिकांची एक तुकडी ह्या भागाचें रक्षण करण्याकरितां नेमण्यांत आली होती. त्यामुळे तो भाग सुरक्षित राहिला. पण गालिबची चीजवस्त—सोनेनाणें हीं सर्व—शहराच्या दुसऱ्या भागांत ठेवण्यांत आली होती ती मात्र लुटण्यात आली.

१८५७ च्या वरील घटनांसंबंधीं गालिबनें फारसीत एक छोटेखानी पुस्तक लिहिलेलें आहे त्याचें नांव आहे: ‘दस्तंबो’. ह्या पुस्तकात गालिबवर गुदरलेल्या संकटांचें

नि प्रसगाच तपशीलवार वर्णन आहे परतु ह्या पुस्तकांत सर्वच गोष्टी लिहिण्यास गालिबला भीति वाटत असावी हे स्पष्ट दिसतें आपला शिष्य हरगोपाल तफ्ता यास लिहिलेल्या एका पत्रात गालिब म्हणतो, " माझ्या ह्या पुस्तकाचा एक प्रत गव्हर्नर जनरलकडे पाठवीन आणि एक त्याच्या मार्फतीन इग्लडच्या महाराणीकडे ह्यावरून ओळख कीं पुस्तकातील मजकूर कसा असेल तो "

गालिबन कितीही सतोचात हें पुस्तक लिहिलें असल तरी त्यावरून दिल्ली शहराचा दुर्दशा येन्च्या प्रमाणावर भारी होती हें जाणल्याशिवाय राहावत नाहीं

दिल्लींत ११ मे १८५७ रात्रीं नी भयकर कत्तल होऊन त्यात इंग्रज वायकापोरं मारलीं गेलीं ह्याचें गालिबला अत्यत दुःख वाटलें दिल्लींत शिपायाच राज्य होत त्या वेळचा मजकूर गालिबन फार सारांशरूपानें म्हणजे अवघ्या पाच सहा पानातच सागितला आहे पण इंग्रजानीं पुन्हा दिल्ली घेतल्यानंतर घडलेल्या हकीकतीच तपशीलवार वर्णन त्यात आलेलें आहे जिकडे तिकडे दगमार सुरू झाला शहरातील निरनिराळ्या भागातून लोकांचे हाहाकार ऐकू येत गालिबच्या आळींत दहावारा घरं होतीं आळीबाहेर पडण्याची सोय नव्हती जवळपास गोड पाण्याची विहीर नव्हती दोन दिवस आळींतील लोकांनीं कठीण अवस्थेंत खाण्यापिण्या वाचून काढले तिसऱ्या दिवशीं पतियाळाच्या महाराजानीं हकीम महमूदखानाच्या रक्षणा करिता पाठविलेले शिपाइ आले जवळच्या विहिरीवरून पाणी आणण्याची आळींतील लोकाना परवानगी मिळाली पण ती विहीर खाऱ्या पाण्याची होती त्यापलीकडे जाण म्हणजे मृत्यूला

दिल्ली इंग्रजांच्या हातीं आल्यावर हजारों लोक शहर सोडून पळून गेले होते. त्यांना परत येण्याची परवानगी नव्हती. जानेवारी १८५८ मध्यें हिंदूंना शहरात येऊन राहाण्याची परवानगी मिळाली. पण धरपकडीचें सत्र चालूच राहिलें. तें कांहीं थांबलें नाहीं. गालिबच्या मित्रमंडळींचे जे हाल झाले त्याचेंही वर्णन दस्तंबोन गालिबनें केलेलें आहे. . . .

गालिबचे आप्त लोहारूचे नवाबजादे जियाउद्दीन आणि अमीनुद्दीन हे दिल्ली सोडून लोहारूच्या दिशेनें जात असतांना वाटेंत मेहेरौली येथें शिपायांनीं त्यांना अक्षरशः नागविलें आणि त्यांच्यापाशीं असलेली सर्व चीजवस्त लुटली. दिल्लीतील त्यांचा वाडा मोठा प्रेक्षणीय होता. तो पूर्णपणें उध्वस्त करण्यांत आला. जियाउद्दीन ह्याचा ग्रंथसंग्रह मोठा मूल्यवान होता त्याचाही पूर्ण निकाल लावण्यांत आला. त्यांत गालिबचा कवितासंग्रह पण होता. सुदैवानें १८५७ च्या सुरुवातीला गालिबनें ह्या संग्रहाची एक प्रत रामपुरला पाठविली होती. सध्यां प्रसिद्ध असलेल्या गालिबच्या कविता रामपुरच्या प्रतीवरून घेतलेल्या आहेत. ह्याशिवाय गालिब फारसी आणि उर्दू कविता रचून जियाउद्दीनकडे पाठवीत असे. परंतु त्यांचा मात्र कांहीं मागमूस राहिलेला नाहीं.

मुजफ्फरोद्दीन हैदर आणि हुसेन मिर्झा ह्यांच्या घरांना आगी लावण्यात आल्या. त्यांच्यापाशीं गालिबचे बरेच कागदपत्र होते; परंतु अर्थातच ते नष्ट झाले.

गालिबचा मित्र आणि सुप्रसिद्ध टीकाकार नवाब मुस्ताफाखान शेफ्ता ह्याला सात वर्षांची कैदेची शिक्षा झाली होती. अपील केल्यानतर तो सुटला. उर्दू कवींच्यावर ह्याचे परीक्षणात्मक लेख फारसी भाषेंत असून "गुलशने बेखार" (कंटकविरहित उपवन) ह्या नांवानें शेफ्ताचा ग्रंथ विद्वज्जनात मान्यता पावलेला आहे.

गालिबचा दुसरा मित्र मुफ्ती सद्रुद्दीन आजुर्दा हा फारसी भाषेंतील नामांकित कवि आणि अरबी भाषेचा गाढा विद्वान होता. १८५७ त तो बरेच दिवस तुरुंगात खितपत पडला होता. चौकशींत त्याला जीवदान मिळालें खरें परंतु त्याची सर्व मालमत्ता जप्त करण्यात आली. पुढें अपीलमध्यें निम्मी मालमत्ता परत मिळावी असा हुकूम झाला.

फज्लेहक खैराबादी हा अरबी फारसीचा विद्वान आणि उत्तम टीकाकार होता गालिबची सुरवातीची कविता बेदिल कवीच्या काव्याच्या धर्तीवर म्हणजे पेचदार, दुर्बोध आणि रुक्ष होती. ती बदलून सुबोध आणि आकर्षक रचनेकडे गालिबला प्रवृत्त करण्याचें सारें श्रेय फज्लेहक खैराबादीला आहे. १८५७ च्या संघर्षांत खैराबादीला काळ्या पाण्याची शिक्षा झाली होती.

गालिबला पहिले कांहीं दिवस हालअपेष्टांत काढावे लागले. आपल्याला घरांतील कपडे विकून पोट चालवावें लागलें असें त्यानें एक पत्रांत लिहिलेलें आढळतें. लोक अन्न खातात पण आम्ही कपडे खातों अशी त्यानें कोटी केली आहे. ह्या त्याच्या संकटकालात गालिबच्या हिंदु शिष्यांनीं आणि मित्रांनीं त्याला फार मदत केली. मुन्शी हरगोपाल तफ्ता

१५ . . . .

नि प्रसंगांचें तपशीलवार वर्णन आहे. परंतु ह्या पुस्तकांत सर्वच गोष्टी लिहिण्यास गालिबला भीति वाटत असावी हें स्पष्ट दिसतें. आपला शिष्य हरगोपाल तफ्ता ह्यास लिहिलेल्या एका पत्रांत गालिब म्हणतो, " माझ्या ह्या पुस्तकाची एक प्रत गव्हर्नर जनरलकडे पाठवीन आणि एक त्याच्या मार्फतीनें इंग्लंडच्या महाराणीकडे. ह्यावरून ओळखा कीं पुस्तकांतील मजकूर कसा असेल तो. "

गालिबनें कितीही संकोचानें हें पुस्तक लिहिलेलें असलें तरी त्यांतून दिल्ली शहराची दुर्दशा केवढ्या प्रमाणावर झाली होती हें जाणवल्याशिवाय राहावत नाहीं.

दिल्लींत ११ मे १८५७ रोजीं जी भयंकर कत्तल होऊन त्यांत इंग्रज बायकापोरें मारलीं गेलीं ह्याचें गालिबला अत्यंत दुःख वाटलें. दिल्लींत शिपायांचें राज्य होतें त्या वेळचा मजकूर गालिबनें फार सारांशरूपानें म्हणजे अवघ्या पांच सहा पानांतच सांगितला आहे. पण इंग्रजांनीं पुन्हा दिल्ली घेतल्यानंतर घडलेल्या हकीकतींचें तपशीलवार वर्णन त्यांत आलेलें आहे. जिकडे तिकडे लूटमार सुरू झाली. शहरांतील निरनिराळ्या भागांतून लोकांचे हाहाःकार ऐकूं येत. गालिबच्या आळींत दहाबारा घरें होतीं. आळीबाहेर पडण्याची सोय नव्हती. जवळपास गोड पाण्याची विहीर नव्हती. दोन दिवस आळींतील लोकांनीं कठीण अवस्थेत खाण्यापिण्यावांचून काढले. तिसऱ्या दिवशीं पतियाळाच्या महाराजांनीं हकीम महमूदखानच्या रक्षणाकरितां पाठविलेले शिपाई आले. जवळच्या विहिरीवरून पाणी आणण्याची आळींतील लोकांना परवानगी मिळाली पण ती विहीर खाऱ्या पाण्याची होती. त्यापलीकडे जाणें म्हणजे मृत्यूला आमंत्रण देण्यासारखें होतें. त्यामुळें खारट पाण्यावरच लोकांना समाधान मानून घ्यावें लागलें. सुदैवानें दोन-चार दिवसांतच सपाटून पाऊस पडला. लोकांनीं त्या पावसाच्या पाण्यानें भांडीं-कुंडीं भरून घेतलीं. ज्या फकीर काले़शहाच्या मार्फतीनें गालिबची बहादुरशहाच्या दरबारांत वर्णी लागली होती त्याच्याकडे गालिबनें आपली सारी चीजवस्त त्याच्या मठांतील तळघरांत ठेविली होती. परंतु दुर्दैवानें ती सर्वच्या सर्व लुटली गेली.

१५ ऑक्टोबर १८५७ ह्या दिवशीं कांहीं इंग्रज शिपाई गालिबच्या आळींत आले. त्यांनीं लुटालूट कांहीं केली नाहीं, पण आरिफचीं मुलें आणि इतर शेजाऱ्यांना त्यांनीं पकडून नेलें. तत्कालीन अधिकारी कर्नल ब्राऊन ह्यानें थोडीबहुत चौकशी करून गालिबला आणि मुलांना परत जाण्याची परवानगी दिली. एका आख्यायिकेप्रमाणें गालिबनें मोठ्या चतुरपणें आपली सुटका करून घेतली. कर्नलनें त्याला विचारलें कीं, 'तूं मुसलमान आहेस काय ?' गालिबनें म्हटलें, 'हो, मी अर्धा मुसलमान आहें. दारू पितों पण डुकराचें मांस खात नाहीं.' कर्नल हसला आणि त्यानें गालिबला परत जाण्याची परवानगी दिली.

ह्याच काळांत गालिबचा भाऊ मिर्झा युसूफ आजारी पडून वारला. पंचवीस-तीस वर्षांच्या वयापासून त्याचा मेंदू बिघडला होता. तो मरण पावल्यावर दोन चार माणसें गोळा करून त्याचा दफनविधि करण्यारा गालिबला फार श्रम पडले.

दिल्ली इंग्रजांच्या हातीं आल्यावर हजारों लोक शहर सोडून पळून गेले होते त्याना परत येण्याची परवानगी नव्हती जानेवारी १८५८ मध्ये हिंदूंना शहरात येऊन राहण्याला परवानगी मिळाली पण धरपकडीच सत्र चालूच राहिले तें कांहीं थांबलं नाहीं गालिबच्या मित्रमंडळींचे जे हाल झाले त्याचही वर्णन दस्तंबोंत गालिबनं केलेलं आहे

गालिबचे आप्त लोहारूचे नवाबजादे जियाउद्दीन आणि अमीनुद्दीन हे दिल्ली सोडून लोहारूच्या दिशेनें जात असताना वाटेत मेहेरौली येथें शिपायानीं त्याना अक्षरश नागविलं आणि त्याच्यापाशीं असलेली सर्व चीजवस्त लुटली दिल्लींतील त्याचा वाडा मोठा प्रेक्षणीय होता तो पूर्णपणें उध्वस्त करण्यात आला जियाउद्दीन ह्याचा ग्रंथसंग्रह मोठा मूल्यवान होता त्याचाही पूर्ण निकाल लावण्यात आला त्यात गालिबचा कवितासंग्रह पण होता सुदैवान १८५७ च्या सुरुवातीला गालिबन ह्या संग्रहाची एक प्रत रामपुरला पाठविली होती सध्या प्रसिद्ध असलेल्या गालिबच्या कविता रामपुरच्या प्रतीवरून घेतलेल्या आहेत ह्याशिवाय गालिब फारसी आणि उर्दू कविता रचून जियाउद्दीनकडे पाठवीत असे परंतु त्याचा मात्र कांहीं मागमूस राहिलेला नाहीं

मुजफ्फरोद्दीन हैदर आणि हुसेन मिर्जा ह्याच्या घराना आगी लावण्यात आल्या त्याच्यापाशीं गालिबचे बरच कागदपत्र होते, परंतु अर्थातच ते नष्ट झाले

गालिबचा मित्र आणि सुप्रसिद्ध टीकाकार नवाब मुस्तफाखान शेफ्ता ह्याला सात वर्षांची कैदेचा शिक्षा झाली होती अपील केल्यानंतर तो सुटला उर्दू कवींच्यावर ह्याच परीक्षणात्मक लेख फारसी भाषेत असून "गुलशने बेखार' (कटकविरहित उपवन) ह्या नावान शेफ्ताचा ग्रंथ विद्वज्जनात मान्यता पावलेला आहे

गालिबचा दुसरा मित्र मुफ्ती सद्रद्दीन आजुर्दा हा फारसी भाषेतील नामांकित कवि आणि अरबी भाषेचा गाढा विद्वान होता १८५७ त तो बरेच दिवस तुरुंगात खितपत पडला होता चौकशींत त्याला जीवदान मिळाल खर परंतु त्याची सर्व मालमत्ता जप्त करण्यात आली पुढें अपीलमध्यें निम्मी मालमत्ता परत मिळावी असा हुकूम झाला

फजलेहक खैराबादी हा अरबी फारसीचा विद्वान आणि उत्तम टीकाकार होता गालिबची सुरवातीची कविता बेदिल कवीच्या काव्याच्या धर्तीवर म्हणजे पेचदार, दुर्बोध आणि रुक्ष होती ती बदलून सुबोध आणि आकर्षक रचनेकडे गालिबला प्रवृत्त करण्याच सारं श्रेय फजलेहक खैराबादीला आहे १८५७ च्या सबर्पात खैराबादीला काळ्या पाण्याचा शिक्षा झाली होती

गालिबला पहिले कांहीं दिवस हालअपेष्टात काढावे लागले आपल्याला घरातील कपडे विकून पोट चालवावं लागल असें त्यानें एक पत्रात लिहिलेल आढळते लोक अन्न खातात पण आम्ही कपडे खातों अशी त्यानें कोटी केली आहे ह्या त्याच्या संकटकालात गालिबच्या हिंदु शिष्यानीं आणि मित्रानीं त्याला फार मदत केली मुन्शी हरगोपाल तफ्ता

ह्यानें आम्याहून त्याला कपडे आणि कांहीं पैसे पाठविले होते. गालिब हा मदिरेचा अनन्य-भक्त होता. मद्य हें त्याचें रोजचें अन्न होऊन बसलें होतें. त्याचा पुरवठा गालिबचा मित्र महेशदास हा करी. त्याचे इतर मित्र हीरासिंग, शिवजीराम आणि बालमुकुंद हे गालिबची दिवसरात्र विचारपूस करीत. इ० स० १८६० मध्यें गालिब दिल्लीची काय परिस्थिति होती ह्यासंबंधीं एका पत्रात लिहितो—

"परवा मी शहरांत विहिरीची काय स्थिति आहे हें पाहाण्याकरितां शहरांत गेलों होतों. जुम्मामशिदीपासून राजघाटपर्यंत एक वाळवंट आहे. ह्यांत कांहीं अतिशयोक्ति नाहीं. ठिकठिकाणीं विटांचे ढिगारे पडलेले आहेत ते जर उचलण्यांत आले तर सारें ओसाड वाटेल. मिर्झा गोहरच्या बागेजवळची जी खोल जागा आहे ती आतां बागेच्या पातळीबरोबर झाली आहे. राजघाटाचा दरवाजा बंद झाला आहे. तटाचे वरचे भाग तेवढे दिसताहेत नि खालचे भाग बुजले आहेत. कश्मीरी दरवाजाची स्थिति तर तूं पाहिलीच आहेस. आतां रेल्वेचे रूळ घालण्याकरितां म्हणून कलकत्ता दरवाजापासून काबुली दरवाजापर्यंत मोकळें मैदान करण्यांत आलें आहे. पंजाब, कटरा, धोबीवाडा, रामजी गंज, सादतखान, जनेलच्या बिबीची हवेली, रामजीदास गोदामवाल्याचीं घरें, साहेबरामची बाग व हवेली ह्यांपैकीं एकवाही ठावठिकाणा राहिलेला नाहीं. सारांश, शहर साफ ओसाड झालें आहे. आता जर विहिरी बुजविल्या गेल्या आणि गोड पाणी जर दुर्मिळ झालें तर हें मैदान करबल्याचें मैदान होईल. हे परमेश्वरा, दिल्लीचे लोक आपली उर्दू टक्साळी समजत. आतां उर्दू बाजाराची आळी राहिली नाहीं. आतां उर्दू कोठें, दिल्ली कोठे? आता नुसती छावणी शिल्लक राहिली आहे. आतां किल्ला नाहीं. शहर नाहीं की बाजार नाहीं की कालवा नाहीं."

आणखीन् एका पत्रात तो लिहितो–

"अरे बाबा, काय लिहूं? दिल्लीचें वैभव पाच गोष्टींवर अवलंबून होतें. लालकिल्ला, चांदणी चौक, जुम्मा मशिदीची सहल ही रोजची, दर आठवड्यास यमुनेच्या पुलावर फिरणें आणि वर्षांतून एकदा फुलवाल्याचा मेळा ह्या पाची गोष्टी आतां राहिलेल्या नाहींत. आतां सांग, दिल्ली कुठें राहिली ती."

दिल्लींत सगळें स्थिरस्थावर झाल्यानंतर गालिबनें आपलें पेन्शन परत मिळावें म्हणून पुन्हा खटपट सुरू केली. पण दोनतीन वर्षेपर्यंत त्याच्या प्रयत्नाला यश आलें नाहीं. सुदैवानें रामपूरचे नवाब युसूफअली ह्यानीं गालिबला सर्वतोपरी साहाय्य केलें. गालिबनें इ० स० १८६० च्या सुमारास रामपूरला भेट दिली. एकीकडे रामपूरच्या नवाबानीं गालिबला महिना शंभर रुपये चालू केले अन् दुसरीकडे त्याचें सरकारी पेन्शन पुन्हा मिळू लागलें. ह्यामुळें गालिबची खालावलेली आर्थिक स्थिति सुधारूं लागली.

गालिबच्या साहित्यसेवेचा लौकिक खूप दूरवर पसरलेला होता. गालिबच्या पत्रव्यवहारावरून त्याचा संबंध हिंदुस्थानांतील निरनिराळ्या भागांतील थोर आणि नामांकित व्यक्तींशीं आला होता असें दिसतें. अशा व्यक्तींत टीपू सुलतानचा वंशज शहाजादा बशीरुद्दीन, कलकत्त्याचे खान बहादूर अब्दुल गफूर, सुरतेचे नबाब गुलाम बाबाखान, लोहारूचे नबाब अलाउद्दीन आणि जियाउद्दीन, बडोद्याचे सरदार नबाब मीर इब्राहीम अलीखान, अलवारचे महाराज, अलाहाबादचे मुन्शी गुलाम गौस बेखबर वगैरे नामांकित लोक होते.

ह्याच सुमारास 'बुरहान काते' नांवाचा फारशी कोश प्रसिद्ध झाला. त्याच्यावर गालिबनें फार कडक शब्दांत टीका केली. हा टीकाग्रंथ 'काते बुरहान' ह्या नांवानें प्रसिद्ध झाला. त्याला उत्तरें आणि प्रत्युत्तरें देण्याकरितां देशांतील अनेक विद्वान सरसावले. गालिबनें कोशांतील अनेक चुका नजरेस दाखविल्या. त्या चुका योग्यच होत्या ही गोष्ट खरी असली तरी ग्रंथकारावर आणि त्याचें समर्थन करणाऱ्यांवर गालिबनें वाजवीपेक्षां कडक शब्दांत टीका केली. त्यामुळें प्रचंड वादळ उठलें. शिवाय हिंदुस्थानांतील फारसी विद्वानांची फारसींसंबंधींची विद्वत्ता मानण्यास गालिब तयार नव्हता. पण मौज अशी कीं गालिब स्वतः जातीनें तुर्क होता. तो वंशानें इराणी नव्हता. तेव्हां लोकांनीं तुम्हांला तरी असें बोलण्याचा काय अधिकार पोहोचतो असा रोखठोक सवाल केला. गालिबवर प्रखर आणि वैयक्तिक स्वरूपाची टीका झाली. त्यामुळें गालिबनें एका टीकाकारावर कोर्टांत अब्रुनुकसानीची फिर्याद गुदरली. पुढें हा खटला आपसांत मिटविण्यांत आला.

ह्या वादामुळें गालिबला बराच मनस्ताप सहन करावा लागला. त्यांत आजाराची भर पडली. गालिबच्या मदिरासेवनाचा परिणाम त्याची प्रकृति बिघडण्यांत होऊन दोन वर्षेपर्यंत त्याच्या अंगावर फोड आणि इतर व्याधींनीं त्याला नुसतें भंडावून सोडलें. १८६४ च्या सुमारास त्याची ह्या आजारातून सुटका झाली.

इ. स. १८६५ मध्यें रामपूरचे नबाब युसूफअली ह्यांचा मृत्यु होऊन त्यांच्या जागीं कल्बेअली हा गादीवर आला. समारंभाला गालिब रामपुरला गेला होता. त्यानें समारंभाचें मोठें मजेदार वर्णन केलेलें आहे. नबाबाकडून त्या प्रसंगीं गालिबला बरीच आर्थिक मदत झाली.

रामपुराहून परत येतांना वाटेत गालिबचें सगळें सामान गंगेच्या पुरांत वाहून गेलें. गालिबला पांच-सात दिवस आजाराच्या अवस्थेंत मुरादाबाद येथें काढावे लागले. दिल्लीस परत आल्यानंतर गालिब बरेच दिवस अशक्ततेमुळें बिछान्यावर पडून होता. ह्या वेळीं त्याचें वय अडसष्ट वर्षांचें होतें. इ. स. १८६५ सालीं लिहिलेल्या एका पत्रांत तो लिहितो —

१७. . . .

"पूर्वी मी अशक्त होतो आता शरीरात अर्ध प्राण शिल्लक राहिले आहेत पूर्वी कानानें नीटसें ऐकू येत नव्हतें, आता त्यातच भर म्हणून कीं काय डोळ्यांनीं पण दिसत नाहीं चार ओळी लिहिल्या कीं बोटं वाकडीं होतात"

उर्दूचा सुप्रसिद्ध कवि अल्ताफ हुसेन 'हाली' याचा गालिबशीं याच काळात संबंध आला हालीनें पुढें गालिबचें चरित्र लिहिलें तें हाली आणि गालिबच्या निकट सहवासामुळें उत्कृष्ट आणि सरस उतरलें आहे

ह्या काळातील गालिबचें महत्त्वाचें पुस्तक म्हणजे इ स १८५८ च्या ऑक्टोबर महिन्यात प्रसिद्ध झालेला त्याचा पत्रव्यवहार होय 'उदे हिंदी' ह्या नावानें हा ग्रंथ प्रसिद्ध झाला पण ह्या ग्रंथात अनेक चुका आढळून आल्या त्याशिवाय पत्रांची मांडणी अतिशय अव्यवस्थित अशी होती म्हणून गालिबनें पत्रांची व्यवस्थित मांडणी केली त्यांत नव्या पत्रांची भर घातली हा पत्रसंग्रह "उर्दूये मोअल्ला" ह्या नावानें मार्च १८६९ मध्यें प्रसिद्ध झाला ह्या संग्रहाला प्रस्तावना मीर मेहेदी मजरूह आणि ममालाचा ऐश कुरबान अली सालिक ह्यांनीं लिहिलेली आहे हे दोघेही गालिबचे मित्र आणि चाहते होते पण हा पत्रसंग्रह प्रसिद्ध होण्याच्या आधीं म्हणजे १५ फेब्रुवारी १८६९ रोजीं गालिबचा मृत्यु झाला त्या वेळीं गालिबचें वय बहात्तर वर्षांचें होतें गालिबला मूलबाळ नव्हतें पण बाकरअली आणि हुसेनअली हीं आरिफचीं मुलें त्यानें आपलींच मुलें म्हणून सांभाळलीं होतीं गालिबच्या मृत्यूनंतर एक वर्षानें त्याची पत्नी उमराव बेगम हिचा मृत्यु झाला गालिबची स्वतःची अशी औरस संतति शिल्लक राहिली नव्हती, परंतु असें जरी असलें तरी गालिबच्या वाङ्मयामुळें त्याचें नांव उर्दू साहित्यात अमर झालें आहे

आपल्या बहात्तर वर्षांच्या दीर्घ आयुष्यात मिर्झा गालिबने विपुल ग्रंथरचना केली. उर्दू आणि फारसी ह्या दोन्ही भाषांवर त्याचे असामान्य प्रभुत्व होतें. उर्दूतील त्याचे प्रमुख ग्रंथ म्हणजे त्याचा उर्दू कवितांचा संग्रह आणि प्रचंड पत्रव्यवहार हे होत. फारसी साहित्यात त्याने एक कवितासंग्रह, तैमूर घराण्याच्या इतिहासाचा पूर्वभाग मेहेरे नामरोज, फारसी पत्रव्यवहार आणि अठराशे सत्तावनच्या प्रसंगींचा ग्रंथ दस्तंबो हे एवढे लिहून महत्त्वाची भर टाकली आहे. त्याची फारसी काव्यरचना संख्येनें उर्दू कवितांच्या चौपट भरेल इतकी आहे. फारसीत इतकी विपुलरचना गालिबनें केलेली असली तरी गालिबला जी कीर्ति लाभली ती त्याच्या उर्दू कवितांच्यामुळें होय असेच म्हणावे लागेल. उर्दू काव्यात गजल, मसनवी, कसीदा म्हणजे स्तुतिपर कविता, मर्सिया म्हणजे शोकगीतें, नात म्हणजे धार्मिक कविता, रुबाया इत्यादि विविध पद्यप्रकार आहेत. गालिबनें कसादा आणि रुबाया हे प्रकार हाताळले नाहीत असे नाहीं पण त्याच्या गजलांच्या संख्येनें पाहाता इतर प्रकारांतील कविता संख्येनं अत्यल्प आहेत आणि गुणानीं त्या गजलांच्या बरोबरीला येत नाहीत. गालिबच्या काव्याचें खरं वैशिष्ट्य त्याच्या गजलांतून आहे आणि त्या गजल रचनेमुळेंच गालिबला उर्दूतील कविश्रेष्ठ म्हणून ओळखले जाते. गजल ह्या पद्यप्रकाराचा वापर उर्दू साहित्यात सुरवातीपासून आढळतो. उर्दूंत हा प्रकार फारसीपासून आला. डॉ माधवराव पटवर्धन—माधव ज्यूलियन ह्यानीं आपल्या गज्जलांजलीच्या प्रस्तावनेत गजलबद्दल्चीं बरीच चर्चा केली आहे. ते म्हणतात—

"गज्जल हा एक गायनाचा प्रकार वाटतो. मूळ्त हा एक पद्यप्रकार आहे. हा मूळचा अरबी आहे. परंतु मराठीशीं त्याचा परिचय उर्दू पद्याच्या द्वारा झाला आहे. गज्जल आणि कसीदा हे एकयमकीच असावे लागतात म्हणजे पहिल्या, दुसऱ्या व पुढील समचरणांच्या अतीं एकच यमक साधिलें पाहिजे. गज्जलांत द्विपद्यांची संख्या पांचाहून अधिक व सतराहून कमी अशी मर्यादित असते. ... धात्वर्थानें पाहाता गज्जल म्हणजे प्रेमालाप होत. अर्थात् शृंगार हाच गज्जलाचा मुख्य विषय होय.) प्रेमगीतांत स्वाभाविकपणेच विप्रलंभ शृंगाराचा आविष्कार अधिक आढळतो. काहीं गज्जल सृष्टिवर्णनपर, बोधपर व ध्येयस्तुतिपरही असतात. पण गज्जल हा भावगीताप्रमाणें एकपिंडी असतोच असें नाहीं. यमकसूत्रानें गोंवलेला गज्जल हा द्विपदी मुक्ताफळ्यांचा जणू काय सरच होय."

१९. . . .

वर म्हटल्याप्रमाणें गज़लमधून एका द्विपदाचा मागील व पुढील द्विपदाशी संबंध असतोच असे नाहीं. प्रत्येक द्विपदीचा रचना हा स्वतंत्र समजली पाहिजे. केवळ यमकामुळें गज़लतील द्विपद्या एकत्र आलेल्या असतात. त्यामुळे प्रत्येक द्विपदीतील कल्पना स्वतंत्र असून दोन ओळींतच ती कल्पना पूर्ण करणें आवश्यक आहे. ती कल्पना निश्चित मनोरम आणि आकर्षक असेल आणि ती निवडक अर्थपूर्ण शब्दांत मांडली गेली असेल त्यावरच कवीच्या काव्यगुणाची पारख किंवा कसोटी होते. उर्दू काव्यात गज़लचे काय स्थान आहे? यासंबंधी उर्दू साहित्यातील नामांकित टीकाकार इनायत करेल्नी यांनीं सांगोपांग चर्चा केली आहे. गज़ल और तगज़्ज़ुल या त्यांच्या लेखातील सारांश असा :—

गज़लचा प्रकार उर्दू काव्यात प्रारंभापासून दिसून येतो. प्रत्येक काळ्यात उर्दू कवींनी निरनिराळे विषय गज़लच्या द्वारें हाताळले. मग ती शोकगीत म्हणजे मर्सिया असोत की स्तुतिगीत म्हणजे कसीद असोत की तत्त्वज्ञानपर विचार असोत. मर्सिये लिहिणारा शोककवि अनीस किंवा तत्त्वज्ञानी कवि इक्बाल यांनीही गज़लच्या द्वारें आपली काव्यरचना करणें आवश्यक मानले.

गज़लच्या उत्क्रांतीत इराणी संस्कृति आणि रसिकतेचा फार मोठा वाटा आहे. सौंदर्याची अनुभूति आणि त्याची नाजूक आणि आकर्षक पद्धतीने मांडणी हीं इराणी वाङ्मयाची वैशिष्ट्यें होत. त्यात प्रणय आणि प्रणयाराधनाची भर पडल्यामुळे इराणी वाङ्मयात रंग भरला. हाच वैशिष्ट्य उर्दू गज़लने आत्मसात केलें. इराणी संस्कृति आणि रसिकतेची वाढ ज्या समाजात आणि वातावरणात झाली, इराणी समाजाला जी दृश्य आवडत, ज्या ऋतु चक्रानीं त्यांना मोहिनी घातली, ज्या पक्ष्यांच्या गायनात त्यांचे मनोरंजन करीत त्या सान्या गोष्टींचा प्रभाव गज़लवर झालेला दिसून येतो. हिंदुस्थानात स्थापन झालेली तुर्क आणि मोगल राज्य इराणी संस्कृतीने प्रभावित झालीं. त्या प्रभावाने जे वातावरण निर्माण झाले त्यामुळे गज़ल प्रकाराचे समृद्धिकरणच झालें आहे असें म्हणावयास हरकत नाही.

इराणमध्य गज़लची वाढ का झाली याचा विचार केल्यास असे आढळते कीं इराणमध्य अरबी संस्कृतीचा प्रभाव बराच पडला. अरबी समाजजीवन आणि संस्कृतीतील उत्साह व दगदारपणा आणि इराण्यांची सौंदर्योपासना यांचा संगम झाला आणि त्यांतून वाङ्मयप्रांतात गज़ल या पद्यप्रकाराची वाढ झाली. त्यापूर्वी इराणमध्य कसीदा म्हणजे स्तुतिपर कविता ही फारी लोकप्रिय होती. दरबाऱ्यांच्या राजकीय वातावरणामुळे कसीदा या काव्यप्रकाराला चांगला मिळाला. प्रेमगीतसुद्धा या पद्यप्रकारातून लिहिली जात. पण हळूहळू कसीदायापासून हा प्रकार वेगळा होऊन गज़लची स्वतंत्र अशी रचना अस्तित्वात येऊ लागली. या प्रकाराला गुरवान इराणी कवि रुदकी याने केली.

मुख्यतेकरून गज़लचा विषय म्हणजे प्रेम आणि शृंगार हे होत (गज़ल हा शब्द अरबी आहे. त्याचा अर्थ स्त्रियांबरोबर किंवा स्त्रियांसंबंधीं प्रणयगोष्टींच्या गोष्टी करणे असा आहे.)

इराणमध्यें सुरवातीच्या गजला आणि कसीदा ह्यांमध्यें फारसा फरक नव्हता. फरक होता तो वर्ण्यविषयासंबंधीं. कसीदांत नबाब, अमीर, बादशहा ह्यांची स्तुति आढळे. पण गजलांमधून प्रेयसीची भरपूर स्तुति आढळे. त्यांत प्रेयसीचें रूपसौंदर्य, तिचे विभ्रम, तिनें केलेला छळ, तिचा चंचलपणा इत्यादींचीं वर्णनें आटळत.

हा प्रकार बराच काळपर्यंत चालू होता. परंतु मानवाचें जग केवळ सौंदर्य आणि प्रेम ह्यांतच मर्यादित राहूं शकत नाहीं. निसर्ग, जीवन, जीवनाचे विविध प्रश्न, अध्यात्म असे कितीतरी विषय मनुष्याचें लक्ष आपल्याकडे ओढून घेतात. त्यामुळें अध्यात्माची, भक्तिमार्गाची आणि परमेश्वरप्राप्तीची चर्चा करणारा सूफी पंथ अस्तित्वांत आल्यावरोबर त्याचा परिणाम गजलावर होऊं लागला आणि अर्थातच त्याच्या विषयांचा विस्तार पण होऊं लागला. गजलांत पूर्वीपासून असलेले प्रणय आणि सौंदर्याचे संकेत सूफींनीं हाताळले. त्यामुळें एकीकडे धार्मिक आणि रूक्ष विषयांत आकर्षकपणा आला आणि दुसरीकडे गजलांची बैठक केवळ प्रणय आणि सौंदर्याच्या उपासनेंत मर्यादित राहिली नाहीं. मदिरा म्हणजे प्रेम किंवा भक्ति, मदिरा वाटणारा साकी म्हणजे गुरु, मदिरालयांतील मंडळी म्हणजे भक्तगण, बुरख्याआड लपलेला प्रियकर म्हणजे अगम्य परमेश्वर असे गजलांतून आटळणारे संकेत सूफींचे आणि गजलांचे अन्योन्य संबंध दर्शवितात.

गजलला सर्वोच्च स्थान मिळवून देणाऱ्या फारसी कवींत सिनाई, फरीदुद्दीन अत्तार, मौलाना रूम, ईराकी, सादी, खुसरो, हसन, सलेमान, ख्वाजू, हाफिज, फुगानी, शफाई, उर्फी, नजीरी, सायब, जहीरी, गालिब हे प्रमुख होत. त्याचप्रमाणें उर्दू गजलकारामध्यें वली, मीर, सौदा, दर्द, मजहर जानेजाना, मुसहफी, गालिब, मोमिन, शेफ्ता, हाली, दाग हे श्रेष्ठ ठरतात. गजलांच्या उत्क्रांतींत एक गोष्ट लक्षांत ठेवली पाहिजे ती ही कीं तत्कालीन सामाजिक आणि सांस्कृतिक जीवनाचें प्रतिबिंब त्या त्या काळच्या गजलांतून आपल्याला दिसून येतें. प्रणय, प्रेम, तत्त्वज्ञान इत्यादींचीं वर्णनें आपल्याला निरनिराळ्या काळांत दिसून येतात. पण संकेतांत फारसा बदल झालेला नाहीं. फक्त त्यांचे अर्थ मात्र वेळोवेळीं बदलत गेले.

प्रणय हा गजलाचा मुख्य विषय होय. प्रेम आणि प्रणयाच्या विविध अवस्था अनेक तऱ्हातऱ्हांनीं वर्णिलेले प्रसंग गजलांतून आटळतात. प्रेयसीचें सौंदर्य, तिचा चंचलपणा, उत्कंठा, विरह, मीलन, मत्सर, हेवा इत्यादि सर्व प्रकार गजलांतून आढळतात. गजलांतील प्रेमिक प्रेयसीकरिता अनेक संकटें झेलतो, तिच्या घराची धूळ उडवीत फिरतो, तिच्या भिंतीच्या आसऱ्याला तो जाऊन बसतो, तिच्या रखवालदाराची मनधरणी करतो, तिच्याकडून झालेला आपला छळ आणि अवहेलना सहन करतो, इतर प्रतिस्पर्धी सुद्धां त्याचा छळ करतात. प्रेयसीच्या मैफिलींत त्याची टिंगल उडवितात. प्रेमाच्या पूर्तिकरितां तो आपला जीव देतो. पण इतकें झालें तरी प्रेयसी त्याचा छळ करण्याचें सोडीत नाहीं. ती त्याच्या कबरेवर येऊन त्याला शिव्यांची लाखोली वाहते. अशा ह्या प्रेमाच्या गोष्टी गजलकार आपापल्या विशिष्ट

गैरान धणन करतात त्यात वापरण्यात येणारे संकेत म्हणजे गुल आणि बुलबुल म्हणज बुलबुलाचं प्रेम आणि गुल म्हणजे फुलाचा निष्ठुरपणा दुसरें पतंग आणि दीप म्हणजे परवाना आणि शमा निबंध म्हणजे कफ्स, स्वताचे घर म्हणजे आशियाना म्हणजे घरट, छळणारा शत्रु म्हणजे सय्याद (शिकारी) हा अनेकदा काळ किंवा नियति ह्या अर्थाने उल्लेखिला जातो असे कितीतरी संकेत आपल्याला उर्दू गजलातून द्योतत्तास येतात सरूट ओम्वर्ण त्याचा उल्लेख करताना धरव्यावर चीन पडण असा करतात शुद्ध प्रेमाला ते दीपशिखेवर झेप घेणाऱ्या पतंगाची उपमा देतात

वर वर्णिलेले असे अनेक संकेत हे गजलाचा अविभाज्य भाग बनलेले आहेत गजल हा भावगीताचा प्रकार आहे आणि मर्यादित शब्दात कोणतीही गोष्ट वर्णिण आवश्यक असल्यामुळे संकेताचा वापर करणें आवश्यक ठरते

संकेताबरोबर गतकालात होऊन गेलेल्या काहीं व्यक्तींचीं आणि घटनांचीं ठळक उदाहरणें देण्याचा प्रघात गजलातून आहे लैला मजनू, शीरा फरहाद, युसूफ-जुलेखा, तारसन्या पर्वतावर मूसाला साक्षात्कार ही उदाहरणे आपल्याला गजलातून हटकून आढळतात त्याचा उद्देश आणि त्याबरोबरच जीवनाकडे पाहाण्याचा, धर्माकडे आणि अधर्मामिक परंपरेकडे पाहाण्याचा एक निराळाच दृष्टिकोन आपल्याला दिसून येतो ज्ञान आणि भक्ति, बुद्धि आणि श्रद्धा ह्यासंबधां लिहिताना गजलकारानी कर्मठाचा, त्याच्या कमठपणाची, स्वर्गनरकाच्या रूढ कल्पनांची ठिकठिकाणीं दर उडविली आहे गजलातून जाणवणाऱ्या संघर्षाचं प्रतिबिंबही आपल्याला दिसतं त्याबरोबर निराशा आणि अगतिकता ह्याचंही चित्रण आपल्याला आढळतें अलीकडे म्हणजे गल्या पाचपन्नास वर्षांत राजकीय आणि सामाजिक विषयही गजलातून आले आहेत पण संकेताचा ताच वापर अर्थात् निराळ्या अर्थाने दिसून येतो, अशा रीतीने गजलची उत्क्रांति झाली आहे

इनादत वरेलवींनीं केलेल्या वरील विवेचनावरून गजलची कल्पना पूर्णपणे येईल अगदी अलीकडे म्हणजे राष्ट्रीय चळवळीचा उदय झाल्यानंतर गजलकारानी ह्या चळवळीचे चित्रण गजलातून केल असून भारतातल राष्ट्रीय चळवळीच्या काळात वढेवडा ह्या शेकडो गजला लिहिल्या गल्या त्यांचं तानच उदाहरण पाहा—

० करम मेहरबानका है या हुस्नेखल्के नातुवा मेरा
मेरे घरको घर अपना जानता है मेहमान मेरा

हा काय पाहुण्याची कृपा म्हणावी का माझें आदरातिथ्याच दुर्बलपण म्हणाव हा पाहुणा तर माझ्या घराला आपलें घर समजून बसला आहे

खियाल उनका सुखन मेरा, जबान उनकी दहन मेरा
० बहार उनकी, चमन मेरा, गुल उनके गुलिस्ता मेरा

त्याचे विचार, माझी भाषा; त्याची वाणी, माझे सुरा, त्याचे वसंतऋतु, माझी बाग; त्याची फुले अन् फुलवन माझे

वरील ओळींतून इंग्रज राजकर्त्यांबद्दलचे संकेत स्पष्ट दिसून येतात

सबाने जाते जाते जाने क्या सरगोशियाकी हैं
न भूला एक बर्गे गुलभी दर्से इतिशार अबतक

पहाटेच्या वाऱ्यानें बागेंतून जाता जाता फुलांना काय कानमंत्र दिला आहे कुणास ठाऊक कारण कोणत्याही फुलझाडाला भाडखोरपणाचा अद्याप विसर पडलेला नाहीं

इंग्रजांनीं जाता जाता देशात जो कलह माजविला त्याचा संकेत ह्या वरील ओळींतून दिसून येतो.

आमच शाहही होवो पण इंग्रज ह्या देशातून निघून जावोत ह्यासंबंधीच्या काहीं ओळी पाहा —

सितमभी होगा तो देख लेंगे करमका
भाडा तो फुट जाये
ये दोस्तीका तिलस्म् टूटे मेहेरबानीका
झूट जाये

आमच्यावर जुलुम झाले तरी आम्ही पाहून घेऊ, पण त्यांचे (इंग्रजांचे) भ्रम तरी उघडे पडतील ही मैत्री, मोहजाल आणि मेहेरबानीच असत्य हीं तरी उघडी पडतील

✓ बलासे कजाक आके लूटें, ये पासबानोंकी
लूट जाये
उचकले शाहीन तो गम नहीं है, कफसतो
कमबख्त टूट जाये

लुटारूंनी आणि दरोडेखोरांनीं आम्हाला लुटलं, नागवल तरी आम्हाला शोक नाहीं, ह्या रखवालदारानीं चालू ठेवलेली (इंग्रजांनीं) लूट तरी थांबेल गरुडानी आमच्यावर झेप घेऊन आमचं सर्वस्व नेलें तरी हरकत नाहीं, आमचे कारागृह तरी कोलमडून पडेल

अशीं अनेक उदाहरणें देता येतील ह्यावरून उर्दू गजलांतून निरनिराळ्या काळीं निरनिराळे विषय कसे प्रभावी रीतीनें हाताळले गेले हे दिसेल

मागें सांगितल्याप्रमाणें गालिबचा उर्दू काव्यरचनेचा बहुश म्हणजे गजलाच होत त्याच्या गजलाचा संख्या सुमारें सव्वा दोनशे भरेल. त्यातील द्विपदाची संख्या चौदा साडे-चौदाशें भरेल म्हणजे सुमारें अडीच पावणेतीन हजार ओळींत गालिबनें उर्दू काव्य सामावलेले आहे

गालिबच्या काव्याचे विषय प्रेम, प्रेमिक, प्रेयसी, प्रतिस्पर्धी, उत्कटा, विरह, दिया", नीलन हे तर आहेतच पण त्यापेक्षाही महत्त्वाची गोष्ट म्हणजे जीवन, जीवनातील संघर्ष आशा निराशाचे द्वंद्व, सृष्टिविषयक तत्वज्ञान, धर्म आणि धार्मिक रूढीसंबंधी विचार ह्या सर्वांत गालिबच्या गजलाच वैशिष्ट्य दिसून येतें अर्थात् कोणत्याही विषयाचे वर्णन करताना गालिबची प्रतिभा प्रखरतेने चमकलेली दिसते ह्याच कारण म्हणजे त्याचे काव्य कृत्रिम नसून त त्याच्या जीवनातील अनुभवातून आणि आतरिक तळमळींतून निर्माण झालेलें आहे का जेव्हा असेल तरच तें काव्य जिवंत आणि सरस उतरते त्यासंबंधी गालिबचे स्वत चच विचार पाहा--

हुस्ने फरोगे शमये सुखन दूर है असद्
पहले दिले गुदाख्ता पैदा करे कोयी

(काव्याची ज्योत उज्ज्वल करण्यासाठी अमन्यास उत्कट तळमळ असलेले हृदय प्रथम लाभल पाहिजे )

आते हैं गैबसे ये मजामीन् खियालमे
गालिब् सरीरे खामा नवाये सरोश है

काव्याचे विषय माझ्या मनात अनरालातून येतात ते कागदावर उतरत घेताना लेखणीचा ध्वनि होतो तो म्हणजे देवदूताचा सदृश होय

खुलता किसी पे क्यों मेरे दिल्का मुआमिला
शेरोंके इतिखाब्ने रुसवा किया मुझे

माझ्या हृदयातील तळमळ कुणालाही समजली नसती पण माझ्या काव्यानी ती तळमळ उघडकीस आणली

पाते नहीं जब राहतो चढ जाते हैं नाले
रुकती है मेरी तबा तो होती है रवा और

नद्याना वाट सापडली नाहीं तर त्याच पाणी वर चढू लागते त्याचप्रमाणे अतरींची तळमळ मात कोंडून राहिली की तिला काव्याच्या रूपात वाट फुटते

लिखता हू असद सोजिशे दिल से सुखने गरम
ता रख न सके कोयी मेरे हरफपर अगुश्त

अतरींच्या जिव्हाळ्यातून मार्ग तेजस्वी काव्य बाहेर पडते म्हणून माझ्या काव्यावर ते कृत्रिम आहे म्हणून बोट ठेवण्यास नको

गालिबला आपल्या काव्यशक्तीचा मोठा अभिमान होता ह्यासबंधी त्यान जागोजागी आपले विचार प्रकट केले आहेत ह्याच एक उदाहरण तर पाहा –

हैं और भि दुनियामें सुखन्वर बहोत् अच्छे
कहते हं के गालिबका है अंदाज़े बया और

जगात चागले चागले कवि आहेत परंतु गालिबचा काव्यशैली काही औरच आहे असे लोक म्हणतात

गजराम अनुसरून गालिबन प्रेम हा विषय प्रामुख्याने हाताळलेला आहे. प्रेमाशिवाय जीवनात रस नाही. जीवनाला गोडी आणि लज्जत येते ती ह्या प्रेमामुळे. ह्यासंबंधीचे गालिबचे उद्गार असे —

इश्कसे तबीयतने जीस्तका मजा पाया
दर्दकी दवा पायी दर्दे-बेदवा पाया

प्रेमामुळे प्रकृतीला जीवन आस्वाद्य वाटू लागले. व्यथेला औषध मिळाले आणि ज्याला औषध नाही अशा व्यथेचा लाभ झाला

इश्कपर ज़ोर नहीं ये है वो आतिश गालिब
के लगाये न लगे और बुझाये न बने

प्रेमावर कुणाचाच मात्रा चालू शकत नाही. हा एक आग आहे. ती लावू म्हटल्यान लागत नाही आणि विझवू म्हटल्यान विझत नाही. प्रेमिक, प्रेयसी, प्रतिस्पर्धी, छळ, वियोग, विरह, उत्कंठा, निराशा हीं सारी सारी प्रेमात अनुभवाला येतात, ह्यावर गालिबच्या बहुतेक गाजलेल्या कविता मोठ्या बहारीच्या आहेत. त्या मुळातूनच वाचल्या पाहिजेत. तेव्हा त्यांची खरीखुरी लज्जत समजून येईल. राहावत नाही म्हणून काही उदाहरणे खाली देत आहे

नींद उसकी है दिमाग उसका है राते उसकी हैं
जिसके बाज़ूपर तेरी ज़ुल्फें परेशा होगयीं

तुझे केशकलाप ज्याच्या स्कंधावर रुळतात त्याच वैभव काय विचारावे. त्याची सुखनिद्रा, त्याचे विराम, त्याची आनंदकारी रात्र ही अवर्णनीय होत

जब वो जमाले दिलफ़रोज सूरते मेहेरे नीमरोज
आपहि हो नज्जारा सोज पर्देमें मुँह छुपाये क्यों

तिचे सौंदर्य आकर्षक अन् चेहरा मध्यान्हीच्या सूर्यासारखा तेजस्वी आहे. तिच्याकडे पाहणाऱ्याला ती नजरेने जाळू शकते. मग तिने बुरख्याआड मुख का लपवावे?

शब् को किसीके ख्वाब मे आया नहो कहीं
दुखते हैं आज उस् बुते नाजुक बदनके पाव

त्या कोमलांगीचे पाय आज का बरे दुखत आहेत. काल रात्री ती कुणाच्या स्वप्नात तर चालत आली नसेल ना!

जबतकके न देखा था कदे यार का आलम्
मैं मोतकदये फ़ित्नये महशर न हुवा था

कल्पांताच्या दिवशीं प्रलय होतो त्यावर माझा विश्वास नव्हता पण तुझें शरीरसौष्ठव आणि चालणें ह्यानें घडून आलेला प्रलय पाहिल्यावर माझा कल्पांताच्या कल्पनेवर विश्वास बसला

✓साये की तरह साथ फिरे सर्व व सनूबर
तू इसकदे दिल्कश से जो गुल्जारमें आवे

तूं आपला आकर्षक बांधा घेऊन बागेंत आलीस कीं पाहा आपल्या बांध्याचा गर्व करणारीं सुरू आणि सनुवरचीं झाडें तुझ्या मागें मागें मावलीमारखीं फिरूं लागतील.

लैला-मजनू, शिरीं-फरहाद आदि प्रेमिकांच्या प्रेमवेडाचा उल्लेख गालिबनें जागोजागीं केलेला आहे. प्रेमापायीं घरदार सुटलें आणि विशाल वाळवंट आपल्या नशिबीं आलें. पण—

सौगज जमींके बदले बियांबा गिरां नहीं

म्हणजे माझ्या घराच्या शभर गज जमिनीच्या मोबदल्यात हजारों चौरस मैलांचें वाळवंट मिळतें तर हा सौदा महाग कां पडला असे कवि ह्या काव्यपंक्तींतून विचारतो.

✓प्रियेची भेट घेण्यात वाटत असलेला संकोच तर पाहा—

यां वो गुरुरे इज्जो नाज यां ये हिजाबे पासे वज्—
राहमें हम मिलें कहां बज्ममें वो बुलाये क्यों

ती गर्विष्ठ आणि नखरेल अन् आम्ही संकोची आणि स्वाभिमानी. आमची गाठ पडावी तरी कशी आणि तिनें तरी आम्हांला बैठकीत बोलवायाचें कां ?

ये न थी हमारी किस्मत् के विसाले यार होता
अगर और जीते रहते यही इंतेजार होता

✓लेकिन आमच्या नशिबांत नव्हतें हेंच खरें. आम्हांला अधिक आयुष्य मिळालें असतें तर आम्हाला तेंही प्रियेच्या प्रतीक्षेत घालवावें लागलें असतें.

गालिब हा रसिक, दिलदार मनाचा आणि अनेक आकांक्षा मनात बाळगणारा होता. त्यामुळें आकांक्षांची पूर्ति झाली नाहीं कीं त्याची रुखरुख त्याला लागे.

हजारों ख्वाहिशें ऐसी के हर ख्वाहिशपे दम निकले
बहोत निकले मेरे अरमान लेकिन् फिर भी कम निकले

हजारो आकांक्षा मनात येतात अन् प्रत्येक आकांक्षा तापडतोब पुरी व्हावी ह्याची तळमळ लागते. कित्येक आकांक्षा पुऱ्या झाल्या पण अतृप्त आकांक्षांच्या मानाने त्या

प्रिया पुन्हा एकदा आपल्याकडे येणार ह्या उत्कंठेतून निघालेल्या काहीं ओळी तर पाहा. त्या मन स्थितीचे बहारदार वर्णन आहे.

मुद्दत हुयी हैं यार को मेहमां किये हुये
जोशे कदहसे बज्मे चिरागां किये हुये

प्रियेला पाहुणी करून आणि त्यानिमित्त लाल वारुणीच्या मेफिलीची आरास करून अनेक दिवस झाले.

करतां हूं जमा फिर जिगरे लख्त् लख्त को
अरसा हुवा है दावते मिजगां किये हुये

हृदयाचे उडालेले तुकडे मी पुन्हा एकत्र करीत आहे. प्रियेच्या पापण्याना आमंत्रण देऊन बरेच दिवस झाले.

फिर वजे एहतियात्से रुकने लगा हे दम
बरसों हुये हैं चाके गरेबां किये हुये

आता पुन्हा मन स्थिति वेडाकडे ओढ घेऊ लागली आहे. मागे प्रेमवेडात अंगावरचे कपडे फाडून टाकल्याला बरेच दिवस झाले

फिर्‌शौक कर रहा है खरीदार की तलब्
अर्जे मताए अक्ल, दिलो जां किये हुये

रसिकतेला आपली बुद्धि, हृदय आणि जीव ह्याचा लिलाव लावून टाकण्याची ओढ लागली आहे.

मांगे है फिर किसी को लबे बामपर हवस
जुल्फे सियाह रुखपे परेशां किये हुये

आपले केशकलाप मोकळे सोडलेले असे कुणीतरी पुन्हा समोरच्या गच्चीवर येऊन उभे राहावे असे वाटू लागले आहे.

चाहे है फिर किसी को मुकाबिल में आरजू
सुर्मे से तेज दुश्नये मिजगां किये हुये

जिच्या पापण्यांचा खंजीर सुरम्याच्या धारेने अधिक तीक्ष्ण बनला आहे अशी प्रेयसी पुन्हा एकदा आपल्या सन्मुख बसावी अशी ओढ लागली आहे

जी ढूंढता है फिर वही फुर्सत के रातदिन्
बैठे रहे तसव्वुरे जाना किये हुये

रात्रदिवस प्रियेच्या चिंतनात मग्न राहावे असे मनाला पुन्हा वाटू लागले आहे.

प्रेमीजनाचा वियोग हा महत् दु खाचा प्रसग मिर्झा गालिबच्या आयुष्यात प्रेमप्रसग आला होता ऐन तारुण्यात त्याचें एका नर्तकीवर प्रेम बसले होतें ती पण त्याच्यावर अनुरक्त होती पण दुर्दैवानें तिचा लवकरच मृत्यु झाला गालिबला ह्या प्रसगी अपरपार दु ख झालें चाळीस वर्षांनतर एका मित्राला लिहिलेल्या पत्रात गालिबने त्या नर्तकीची आठवण केलेली आहे तिच्या मृत्यूनतर त्यान जें शोकगीत लिहिल त्यातील काहीं ओळी अवश्य वाचण्या मारख्या आहेत

उमर भरका तने पमाने वफा बाधा तो क्या
उमर को भी तो नहीं है पायदारी हाये हाये

जन्मभर आपण एकनिष्ठ राहू असे आपलें ठरल होतें पण आयुष्य तरी कुठे दृढ आहे

शर्म रुसवाईसे जा छुपना नकावे खाकमें
खत्म है उल्फत कि तुझपर पर्दादारी हाये हाये

आपलें प्रेमाच गुपित उघड पडेल ह्या विचारान का तूं मातीच्या बुरख्याआड आपलें तोंड लपविलस ? पडदापद्धतीचा तर तूं कमालच केली आहेस

खाकमें नामोंसे पमाने मोहब्बत मिट गयी
मिट गयी दुनियासे राहो रस्मे यारी हाये हाये

प्रेमाची वचन मातीत मिळून गेली जगातून प्रेमाचा रीतच नाहीशी झाली गालिबच प्रेम ह राहा अगम्य, गूढ, दैवी अशा प्रकारच नाहीं ते जीवन आणि सहृदय माणसाच प्रेम आहे

उत्कंठा, हेवा, मत्सर, विरह, वियोग, मीलन, आशा-निराशाचे द्वंद्व ह्याच सुंदर चित्रण गालिबन केलेल आहे ह्यामुळे वाचकाला गालिबच्या काव्याचा आस्वाद घेताना आपण रगिलेल्या मन स्थितीचा अनुभव घेत आहोंत असे वाटतें

गुल, बुलबुल, सुरूच झाड आणि कुमरा पक्षी, शमा परवाना, पारधी, जाळें, घरटें, तारागार इत्यादि सकेताचा वापर गालिबन आपल्या काव्यातन केलेला आहे

रोग म्हणतें बुलबुलच्या आक्रदनात प्रभाव नाहीं म्हणून निर्दे फुलाचा स्थिति पाहा त्याच्या पाकळ्याचे (कळ्याचें) तुकडे उडून गेले आहेत

आमच्या घरट्याला लागून पारध्यान जाळें लपवून टाकिल आहे उडण्याचा अवकाश की आम्हा जाळ्यात अडकलोच

हे माझ्या सोबत्या, मी तुरुंगात आहे. बागेची काय हालहवाल आहे सांग. अरे गप्प रहा! काल बागेत वीज पडली आहे हे सांगण्याची काळजी कशाला करीत आहेस? अरे सांग, ती वीज माझ्याच घरट्यावर पडली असेल कशावरून.

मदिरेचे उल्लेख इतर कवि करतात. भक्ताला मदिरा, गुलाबी मदिरा पाजणारा साकी अशा उपमा उर्दू काव्यात सर्रास आढळतात. पण गालिब हा मदिरेचा भक्त होता. त्याच्या काव्यातून मदिरेचे, मद्यपानाचे, साकीचे आणि मैफलीचे उल्लेख कमालीचे खुमासदार वाटतात. ते एकत्र करून पुढे देण्यात आलेले आहेत

उर्दू आणि फारसी काव्यात मद्य, मद्यशाला आणि मद्यपानाचे पुष्कळ उल्लेख आढळतात तत्त्वज्ञानपर कवितांतूनही भक्तीच्या आविष्कारासाठी भक्ति म्हणजे मदिरा, भक्तमंडळी म्हणजे मैफिल, गुरु म्हणजे साकी असे संकेत वापरण्याची परंपरा उर्दू आणि फार्सी काव्यातून दिसून येते कर्मठ आणि कट्टर रूढिनिष्ठ माणसें म्हणून शेख, जाहिद (जपजाप्य करणारे), मोहतसिब (लोकांच्या नीतिमत्तेवर देखरेख ठेवणारे अधिकारी) ह्यांची टिंगल उडविण्यात येऊन, त्यांना मदिरालयाला भेट देण्याचं, मदिराप्राशनाचं (अर्थात् कर्मठपणा सोडून देऊन परमेश्वराची खरी भक्ति करण्याचं) आमंत्रण देण्यात येतें कधीं कधी कर्मठपणाची सवय सोडून आम्हीं आता परमेश्वरभक्तीकडे वळलो आहोंत हें सांगण्याकरिता मीरसारखा कवि म्हणतो,

तसवीह को मुद्दतों सभाला हमने
खिर्का गले मे बाधा हमने
आखिर उमरमे मैकी खातिर मीर
सज्जादा गिरवी रखने निकाला हमने

आम्ही जन्मभर जपमाळ ओढली आणि गळ्यात कफनी अडकविली आता आयुष्याच्या शेवटच्या काळात मद्याचा लाभ व्हावा म्हणून नमाज पढण्याचे आसन गहाण टाकण्यास निघालों

येथ सांगण्याचा उद्देश हा कीं जन्मभर कर्मठपणानें वागलो पण त्यात समाधान लाभलें नाहीं शेवटीं परमेश्वराची निस्सीम आराधना करावयाची असेल तर कर्मठपणाची वस्त्र अवश्य टाकून दिलीं पाहिजेत हे पटलें गालिबनेंही म्हटलें आहे कीं,

रात पी जमजम् पे मये और सुबहदम्
धोये धब्बे जामये एहरामके
जमजम ही पे छोडो मुझे क्या तौफे हरमसे
आलूदा बमये जामये एहराम बहोत हैं

जमजमच्या पवित्र विहिरीवर बसून आम्हीं रात्रीं मद्याचें सेवन केलं आणि मक्केचीं एहरामवर (हाजच्या यात्रेकरूंनी परिधान करावयाचे विशिष्ट कपडे) मद्याचे डाग पडलेले आम्हीं

धुंदून टाटले. मला जमजमच्या विहिरीवरच बसून राहू द्या. मला काब्याच्या प्रदक्षिणेशीं काय करावयाचें आहे. माझ्या झग्यावर मद्याचे डाग पुष्कळ पडले आहेत.

स्मेंठ माणमाची गिंगल खालील पद्यपंक्तींत उडविलेली आढळते.

रिंदोंने दरे मैकदा गुस्ताख है जाहिद
जिनहार न होना तरफ इन वे अदबोंसे

हे कर्मठा, मद्यालयाच्या तोंडाशीं किंवा दाराशीं जमलेले हे मद्यपी उद्धट आहेत. त्यांच्या तोंडाशीं न लागलेलें बरें.

क्यों रद्दोकद्दा करें है जाहिद
मये है यह मगस् की कै नहीं है

हा स्मेंठ ( जाहिद ) मागे पुढे का करीत आहे. त्याला सांगा कीं ही मदिरा आहे. मधमाशीचें वमन म्हणजे मध नव्हे.

✓ कहां मैखाने का दरवाजा गालिब और कहॉ वाएज
पर इतना जानते हैं कल वह जाता था के हम निकले

कुठें मद्यालयाचें दार आणि कुठें प्रवचनकार, दोघाचा काय संबंध. पण आम्हांला इतकें माहीत आहे कीं, काल आम्ही मद्यालयाच्या दारातून बाहेर पडत होतो, त्या वेळीं तो आत प्रवेश करीत होता.

✗ मस्जिद के जे़र साया खराबात चाहिये
भौ पास आंख किब्लये हाजात चाहिये

हे प्रवचनकारा, मशिदीच्या शेजारी मद्यालय हवें. अरे, परमेश्वरानें नाहीं का भुवयापाशीं ( मशिदीच्या कमानीसारख्या ) डोळे ( मद्यालयें ) निर्माण केले आहेत.

रखता फिरू हूं खिर्का व सज्जादा रहने मये
मुद्दत हुयी हैं दावते आबो हवा किये

दारू पिऊन पुष्कळ दिवस झाले आतां पुन्हा नमाजाचें आसन आणि आपली फकिरीची गोधडी गहाण ठेवावी झालें.

दिल वदीन नकदला साकीसे गर सौदा किया चाहे
के इस बाजारमें सागर मनायें दस्तगरदां है

अरे, ह्या साकीपाशीं उधारखातें नाहीं. सारा काहीं रोकड मामला आहे. तुला जर येथें मदिरा हवी असेल तर आपला धर्म अन् हृदय हीं साकीच्या हवालीं करून तूं मदिरा संपादन कर.

वाएज न तुम पियो न किसीको पिला सको
क्या बात है तुम्हारी शराबे तहूर की

अरे प्रवचनकारा, ही असली स्वर्गी र तुझी स्वर्गातील सुरेचा बगाड धड तुलाहा ती पिण्यास मिळत नाही अन् दुसऱ्यानाही तू पाजू शकत नाहीस म्हणजे काय?

जाहिर हैके घबराके न भागेंगे नकीरीन
हां, मुंहसे मगर बादाये दोशीना की बू आये

मनुष्य मेल्यानंतर कबरीत त्याच्या पापपुण्याचा झाडा घेण्याकरिता नकीरीन नावाचे दोन दूत येतात अशी श्रद्धा आहे कवि म्हणतो मरणाच्या आधी प्यालेल्या मादरेचा माझ्या तोंडाला येणारा वास पाहून हे देवदूत काही एक हिशेब न मागता पळून जातात

मद्याची उपमा का उपयोगात आणावयाची ह्यासंबंधी गालिब म्हणतो की पूर्वीपासूनच तशी परंपरा चालत आलेली आहे

हरचंद हो मुशाहिदे हककी गुफ्तगू
बनती नहीं है बादा वो सागर कहे बगैर

कोणतीही तत्त्वाची आणि अंतिम सत्याची गोष्ट असो, मद्य आणि मद्याचा पेला ह्या संकेत वापरल्याशिवाय जमतच नाही

पण असा काहा आडपडदा न ठेवता मद्यपानाची केलेली वर्णने काही थोडीथोडकी नाहीत गालिब हा क्या तर मदिरेचा अनन्यभक्त होता त्यामुळे त्यान वरील सांप्रदायातून जाहिद आणि वाएज ह्याची टिंगल उडवात मदिरेची म्हणजे भक्ताची महति गाइला आहे तिथेच त्यान आपल्या स्वत ज्या मदिरामक्तीची उघडउघड कबुली पण दिलेली आहे त्यामुळे त्याची ही मद्यासंबंधीची वर्णने मोठी चमत्कार झालेली आहेत

फिर देखिये अदाजे गुलअफशानीये गुफ्तार
रखदे कोयी पैमाना व सहबा मेरे आगे

माझ्यासमोर मद्याची सुरई अन् चषक ठेवा आणि मग पाहा माझ्या मुखातून शब्दरूपी पुष्पाची वृष्टी कशी काय होते ती!

गो हाथ को जुंबीश नहीं आखोंम तो दम है
रहने दो अभी सागर व मीना मेरे आगे

हातात शक्ति नसली म्हणून काय झाले डोळ्यात तर आहे ना! माझ्यासमोर अजून मद्यसुरई आणि चषक राहू द्यारे

गालिब छुटी शराब पर अब भी कभी कभी
पीता हूं रोजे अब्र व शबे माहतावमें

गालिब म्हणतो, माझी मदिरा सुटली पण अजूनही चांदण्या रात्रींत आणि दिवशीं मी पितोंच

उर्दू काव्यात नदीच्या काठांना नेहमीं तहानलेले असे कल्पितात आता ह्या गालिबच्या खालील ओवी पाहा —

वकद्रे जर्फ है साकी खुमारे तिश्नाकामीभी
जो तू दरियाये मये है तो मैं खिमियाजा हू साहिलका

हे साकी, प्रत्येकाला आपापल्या मगदुराप्रमाणें मदिरा पिण्याची तळमळ असते माझेंच पाहा ना, माझी तहान कितीही मदिरा पिऊन शांत व्हायची नाहीं अरे, तू जर मदिरेचा दर्या असलास तर मी त्या दर्याचा सदा तृषार्त असा काठच आहे असें समज

यह मसायले तसव्वुफ, यह तेरा बयान गालिब
तुझे हमवली समझते जो न बादाखार होता

त्या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी आणि त्याचें वर्णन करण्याची तुझी शैली अरे तू जर दारुड्या नसतास तर आम्ही तुला निश्चित सन्त समजलों असतों

मैं और बज्मे मैसे यौं तिश्ना काम आवू
गर मैंने कीथि तोबा तो साकीको क्या हुवा था

मी असा मद्यालयातून न पिता यावें ? मी दारूचा शपथ घेतली होती तरी साकीला काय झालें होतें ? त्यानं जबरीनं नको होतं का पाजायला मला ?

असदुल्लाखा तमाम हुआ
अये दरेगा वह रिंदे शाहिदबाज

अरेरे तो सौंदर्योपासक आणि मदिरेचा भक्त असदुल्लाखा गालिब मेला

कर्जकी पीते थे मये लेकिन समझते थे कहा
रगलायेगी हमारी फाका मस्ती एक दिन

कर्ज काढून पिणं चालू होतें पण आमची ही फाकेमस्ती कधींना कधीं फळाला आल्याशिवाय राहाणार नाहीं, ह्याची आम्हाला खात्री होती आहे

कलके लिये आज न कर खस्त शराबमें
यह सूयेज़न है साकी ये कौसरके बाबमें

सज्जनाना स्वर्गातील अमृत ( कौसर ) प्यायला मिळतें अशी समजूत आहे गालिब म्हणतो, अरे साकी तर मग आम्हाला भरपूर पान करूं त्यात कसूर मात्र करू नकोस तुला वाटतं आम्हाला स्वर्गात कौसर ( अमृत ) मिळेल की नाहीं अरे काळजी करूं नकोस आमचा स्वर्गातील साकीवर पूर्ण विश्वास आहे त्याच्याबद्दल तू संशय घेऊ नकोस

कोई कहे के शबे माहमें क्या बुराई है
वलासे आज अगर दिन को अब्रोबाद नहीं

आज आभाळ आलेलें नाहीं. मदिरापानाची काय मजा येणार म्हणतात. पण चांदण्या रात्री तर आहेत ना. चांदण्यांतही मदिरापानाची खूप रुज्जत राहील.

आपल्या मदिरापानाचें समर्थन गालिबनें खालील ओळींत केलेलें आहे.

मये से गरज़ निशात है किस रूसियाह को
इक गूना बेखुदी मुझे दिन रात चाहिये

मदिरापानानें आनंद भोगायला कुणा कमनशिबाला हवें आहे. मला तर दिवसरात्र स्वतःला विसरून जाण्यास हवें आहे.

मद्य आणि मद्यालयाच्या वर्णनांत गालिबची प्रतिभा कशी भराऱ्या मारते तें पाहा.

परे परवाना शायद बादबाने किश्तीये मये था
हुई मजलिस की गर्मीसे रवानी दौरे सागर की

मैफिल सुरू झाली. दिवे पेटले आणि दिव्याच्या मागोमाग पतंग आले. त्यांच्या मागोमाग दारूच्या पेल्यानें भरलेली किश्ती ( ट्रे, तबक ) मैफिलींतून फिरू लागली. म्हणजे ह्या किश्तीला ( नावेला ) पतंगाचे पंख बादबान ( शीड ह्याकारणारे ) बनून पुढें नेत आहेत असें वाटतें.

मये परस्तान खुमे मये मुह से लगायेहि बने
एक दिन् गर न हुवा बज्ममें साकी न सही

अरे मद्यप्यांनो, मैफिलींत एक दिवस साकी नसला म्हणून काय झालें. पेले भरून मिळत नसले तर सुरईच लावा तोंडाला कशी ती !

गालिबची काव्यसृष्टीतील प्रिया ही पट्टीची पिणारी दिसते. त्यासंबंधींचे उल्लेख तर पाहा.

मये वह क्यों बहोत पीते बज्मे ग़ैर में यारब
आजही हुवा मंजूर उनको इम्तिहान अपना

मी मदिरा किती पिऊं शकतों हें पाहाण्याकरितां ती परक्यांच्या मैफिलींतून उपस्थित राहून मदिरेचें मनसोक्त प्राशन करीत आहे. अरेरे, आजच तिला ह्या प्रयोग करून पाहाण्याची का इच्छा झाली ? अन् ती पण परक्याच्या मैफिलीत कां ? माझ्यापाशीं कां नाहीं ?

चश्मे मा रौशनके उस बेदर्दका दिल शाद है
दीदये पुरखूं हमारा सागरे सरशारे दोस्त

रक्तानें लाल झालेले आमचे डोळे पाहून प्रियेला काय आनंद होत आहे. तिला वाटतें कीं हे डोळे म्हणजे कांठोकांठ भरलेले वारुणीचे पेलेच होत.

तेरी तरफ़ है व हसरत् नज़्ज़ारये नरगिस्
बकोरिये दिले चश्मे रक़ीब सागर खींच

सुंदर डोळ्यांना नरगिसच्या फुलाची उपमा देतात. हे प्रिये, नर्गिसचें फूल तुझ्याकडे हेव्यानें पाहात आहे म्हणून तूं संकोचानें कां मदिरा पीत नाहींस. अग, त्या फुलाला डोळे ते कुठले अन् त्याला पाहाण्याची शक्ति तरी कुठें आहे ? तूं कांहीं एक संकोच न करतां हवी तितकी मदिरा पी बरं !

साबित हुवा है गरदने मीनापे खूने खल्क
लरजे है मौजे मये तेरी रफ्तार देखकर

मदिरा पिऊन बेहोशींत तूं पावलें टाकीत तरुणांचीं हृदयें चिरडीत चाललीस. त्यांच्या गुनाचा डाग तुझ्या नव्हे, त्या मदिरेच्या पात्राला लागला आहे. हें सगळें आपल्यामुळें घडलें म्हणून पात्रांतील मदिरा बघ तर कशी घाबरून सारखी कांपत आहे.

हमसे खुल जावो बवक्ते मय परस्ती एक दिन्
वर्ना हम छेडेंगे रखकर उजरे मस्ती एक दिन

मद्याची आराधना चालू असतांना रंगांत येऊन आमच्याशीं निःसंकोचपणें वाग बरें. नाहींतर लक्षांत ठेव, आम्हींच मदिरा पिऊन बेहोष झाल्याचें निमित्त करून तुला छेडल्याशिवाय राहाणार नाहीं.

रातके वक्त मये पिये साथ रक़ीब को लिये
आये वह यां खुदा करे पर न करे के यौं

काल रात्रीं माझ्या प्रतिस्पर्ध्याला सोबतीला घेऊन प्रियेनें मदिरेचें सेवन केलं. तिनें माझ्याकडे यावें. पण कसें ? माझ्या प्रतिस्पर्ध्याला बरोबर न आणतां बरं.

मये लेगया है-हुस्ने खुद आरा को बेहिजाब
अये शौक़ यां इजाजते तर्स्लीमें होश है

मदिरेच्या धुंदींत तिनें आपला बुरखा बाजूला सारला आहे. आतां तूं पण आपली शुद्ध तिला अर्पण करून तिच्याशीं बेभानपणें वागण्यास कांहीं हरकत नाहीं.

मैं उन्हें छेडूं और कुछ न कहें
चल निकलते जो मये पिये होते

मीं तिला छेडावें आणि तिनें कांहीं बोलूं नये. तेंच ती प्यालेली असली तर तिनें गहजब उडवून दिला असता. कुठें कवीनें प्रियेला साकी म्हणून संबोधलें आहे. ती बेफिकीरीत परक्यांना पेले भरभरून देते पण आम्हांला मात्र विचारीत सुद्धां नाहीं अशी कागाळी केली आहे.

गैर लें महफ़िलमें बूसे जामके
हम रहे यौं तिश्ना लब पैग़ामके

परक्यांना निच्या मैफिलीत मधुचषक ओष्ठाना लावण्यास मिळावे अन् आम्हीं मात्र तिच्या दोन शब्दासाठीं तहानलेले असावे. हा काय प्रकार आहे.

आतां मद्य, मधुशाला ह्याचे उल्लेख इतर विषयांच्या अनुषंगानें गालिबनें कसे तयार केलेले आहेत ते तर पाहा.

कतरये मये बसके हैरतसे नफ़स परवर हुवा
खते जामे मये सरासर रिश्तये गौहर हुवा

प्रियेचें सौंदर्य पाहून मधुचषकातील दारूचे थेंब पात्राच्या बाहेर जागच्या जागीं थबकून त्याची एक माळच बनलेली आहे.

होती है किस् कदर अरज़ानीये मये जल्वा
के मस्त है तेरे कूचे में हर दर व दीवार

तुझ्या सौंदर्यांच्या आविष्कारापायीं दारू स्वस्त झाली आहे म्हणूनच मी काय तुझ्या परिसरातील घरेंदारेंसुद्धा ह्या मदिरेंत केवळ तुझ्या दर्शनानें धुंद आणि बेहोश होऊन गेलीं आहेत

न पूछ वसअते मयेखानये जुनून गालिब
जहा यह कासये गरदू है यक खाक अंदाज़

वेडाची मद्यशाळा किती विस्तीर्ण आहे म्हणून विचारू नकोस अरे, हें आकाशाचें भांडें आहे ना, ते आमच्या ह्या मद्यशाळेतील कचरा टाकण्याची पेटी आहे असें समज.

क्यों गरदिशे मदामसे घबरा न जाये दिल
इन्सान हू प्याला व सागर नहीं हूं मैं

ह्या चिरकालच्या भ्रमणीनें का बरें मन घाबरून जाणार नाहीं. मी तरी शेवटीं मनुष्यच आहे ना! सारखा फिरत राहणारा, मद्यालयातील पेला तर नव्हे ना!

✓दीदार बादा हौसला साक़ी निगाह मस्त
बज़्मे खियाल मैकदये बेखरोश है

मन म्हणजे गोंगाट नसलेली मद्यशाळाच. प्रियेचें दर्शन पाहायला मिळणें हेंच मद्य. हें कधींच कमी पडत नाहीं आणि प्रत्येकाला त्यांच्या योग्यतेप्रमाणें हें मद्य प्राशन करायला मिळतें.

रहा आबाद आलम् अहले हिम्मतके न होनेसे
भरे है जिसकदर जामो सुबू मैखाना खाली हैं

जगात सर्वत्र महात्मे असते आणि त्यांनी जगाचा त्याग केला असता तर हें जग निर्जन बनलें असतें. पण जग आबाद आहे ह्यावरून तसे महात्मे फार थोडे असले पाहिजेत हेच सिद्ध होतें. पाहा मद्यालयात सुरया आणि पेले काठोकाठ भरले आहेत. ते भरून तसाच अवस्थेत राहाणें म्हणजेच मद्यालयात कुणी मद्यपी नाहीं हें सिद्ध होतें.

गरदिशे सागरे सद् जलवये रंगीन तुझसे
आयीनादारी यक दीदये हैरान मुझसे

तुझें बहुरंगी सौंदर्य मैफिलींतील पेल्यासारखें सारखें फिरत आहे—पसरत आहे. अन तें पाहून माझे नेत्र आरशासारखे अचंब्यात पडले आहेत. ( उर्दू काव्यात अचंबा किंवा आश्चर्य व्यक्त करण्याकरिता नेहमीं आरशाची उपमा देतात )

अशा प्रकारें गालिबने आपल्या काव्यातून मदिरा, मधुचषक, मधुशाला इत्यादींचा उपयोग केलेला आहे. परमेश्वरप्राप्ती, गुरूची कृपा, समाधि इत्यादि तत्त्वज्ञानपर व्यवहारात मद्याची उपमा देण्याचा प्रघात उर्दू फार्सी काव्यात आहे. पण मद्यासंबंधी आलेली प्रत्येक ओळ ही भक्तिपर, प्रत्येक साकी हा गुरु आणि प्रत्येक मधुचषक म्हणजे उपासना असें समजण्याचें कारण नाहीं, काहीं ठिकाणीं प्रियेला साकी कल्पिलेलें आहे तर काहीं ठिकाणीं प्रियेच्या मैफिलींतील साकी हा प्रियकराचा प्रतिस्पर्धी असतो आणि एरवीं मैफिलींत प्रेमिकाला दारू कधीं न देणारा हा साकी जेव्हा पेला प्रेमिकाच्यापुढें करतो त्या वेळीं त्या साकीनें दारूंत काहीं मिसळलें तर नाहींना अशी शंका प्रेमिकाला येते.

मदिरेचें वर्णन करताना गालिबच्या प्रतिभेला जी भरारी आलेली आहे त्यात काव्य-कल्पनेइतकाच मदिरेच्या प्रत्यक्ष अनुभवाचाही वाटा आहे असें म्हणण्यास हरकत नाहीं. पण ही गोष्ट इतकी महत्त्वाची नाहीं. त्यानें केलेलीं वर्णनें हीं हृद्य आणि चटका लावणारीं आहेत हें विशेष महत्त्वाचें आहे. एरवीं गझल म्हणजे निरनिराळे विषय ज्यात आलेले आहेत अशा द्विपदाची पण फक्त यमकाच्या दोरीनें एकत्र आलेली माळच. परतु गालिबनें एक संपूर्ण गझल ' मीज शराब ' म्हणजे मधुलहरी ह्या नावाखालीं रचलेली आहे. त्या गझलाची बहार खालील ओळीत पाहा —

मधुलहरींना पंख फुटण्याचा (हालचाल करण्याचा) काळ (वसन्तऋतु) पुन्हा पातला आहे ह्या मधुलहरी वदकांना (म्हणजे बदकान्या आकाराच्या मदिरेच्या पात्रांना) मैफिलींतून तरंगत जाण्याची शक्ति देवीत (वसन्तऋतूत मदिरेच्या मैफिली झडतात आणि मधुपात्र मैफिलींतून सारखी फिरत असतात त्याला उद्देशून वरील कल्पना आहे)

बागेंतील प्रक्षलता आज इतकी बेहोष का बरें झाली आहे? ह्याच कारण उघड आहे द्राक्षाच्या वेलींतून मादक द्राक्षासवाचा गंध घेऊन वायू हा प्रक्षलतांवरून जात आहे ना हेच ते कारण बर!

मंदिरेंत जो बुडून गेला तो नशिबवान खरा अन् ज्याच्या डोक्यावरून मधुलहरी वाहू लागल्या, त्या मधुलहरी नव्हेत तर ते भाग्योदयसूचक हुमा नावाचे पक्षीच त्याच्या डोक्यावरून चालले आहेत असें समजावे

हा वर्षाऋतु आहे ह्या ऋतूमुळें जलतलहरींचच मधुलहरींत रूपांतर होईल ह्यात काय आश्चर्य!

तुफान उत्साहामुळे चोहोंकडे चार प्रकारच्या लहरी उत्पन्न झालेल्या आहेत पुष्पलहरी (फुलांचा सडा), आकाशात सूर्यास्तसमयीं पसरलेल्या रंगलहरी, मंदमंद पवनाच्या लहरी अन् मधुलहरी ह्या त्या चार लहरी होत

रसिकतेला जितकी तळमळ तितक्याच प्रमाणात मधुलहरी अमृत बनून रसिकतेला भरपूर जीवन देतात

ह्या मधुलहरी द्राक्षवेलींच्या नसानसांतून जीवनरस बनून वाहात आहेत पानांचा लालसर रंग म्हणजे ह्या मधुलहरींच परतच होत

माझ्या कल्पनेच्या पथावर लाल लाल दिव्याची आरासच झाल्यासारखी वाटते आहे लाल मधूच विचार डोक्यात घोळताहेत ह्या मधुलहरी म्हणजे लाल फुलांचा सडाच अन् ह्या लाल रंगाचा इतका खच म्हणजे दिव्यांची ती आरासच नव्हे का?

मधुलहरी मद्रूपंत जाऊन भिडल्या आहेत नशा खूपच चढली आहे ह्या नशेच्या आड़न जणू काय ह्या मधुलहरी माझी बुद्धि अजून किती शाबूत आहे ह्याच निरीक्षण करण्यात गुंतल्या आहेत

जगात सर्वच वस्तूंना बहर आलेला आहे अगदीं हरित् तृणापासून तों थेट मधुलहरीपर्यंत

क्षणिक वसनऋतूच्या अनुभवात आपण क्षणभंगुर जीवनाचा अदाज घेऊ शकतो म्हणजे वसनऋतु हा जीवनावरील थर होय तसेंच मधुलहरींमुळे विस्मृतिसागराचाही अनुभव लाभतो

फुलाचा वहर पाहून हे असद, माझे देहभान हरपत आहे आता मधुलहरींना पख फुटण्याची पुन्हा वेळ आली आहे

गालिबच्या वरील मधुलहरींमुळें त्याच्या एकदर काव्याला लज्जतदार खुमारी आलेली आहे, हें नि सशय होय

गालिबच्या काव्यात जीवन, सृष्टि, परमेश्वर वगैरेसबधीं जे विचार आढळून येतात ते आणि त्याची काव्यमय माडणी हे गालिबचे वैशिष्ट्य इतर कवींच्या काव्यातून इतक्या प्रकर्षाने आढळून येत नाहीं जीवन म्हणजे सघर्ष होय परिस्थितीशीं सतत झगडणें टळत नाहीं जीवनात शोकाचा फार मोठा वाटा आहे, फार काय जीवनाचे बंध आणि शोकाचे बंध हे एक भासण्याइतके निकटचे आहेत एक मरणाशिवाय त्यातून सुटका होत नाहीं सहन करणें, परिस्थितीशीं झगडत राहणें हें आवश्यक आहे कारण त्याशिवाय गत्यतर नाहीं असें गालिबचें मत आहे कधीं कधीं जीवनातील दु खानें गालिब अगदीं कळवळून उठतो आणि मग त्याच्या तोंडून निराशेचे आणि दु खाचे उद्गार निघतात गालिबचे एकंदर आयुष्य दगदगीत आणि त्रासात गेले त्याची आर्थिक स्थिति कधींच चागली नव्हती त्यातच खर्चिकपणा व मदिरेचे व्यसन कौटुबिक जीवनात त्याला सततीवियोगाच दु ख अपार होतें गालिबला एकंदर सात मुल झालीं पण तीं सारीं काहीं महिन्याच्यावर मात्र जगलीं नाहींत आपल्या मेहुणीच्या मुलावर म्हणजे आरिफवर त्यानें जीवापाड प्रेम केल, परतु दुर्दैवान तोपण तरुण वयात मृत्यु पावला १८५७ चा प्रचड वणवा पेटलेला त्यानें डोळ्यान पाहिला होता त्यात त्याच्या भावाची, भाच्याची, प्रियजनाची आणि मित्राची पडलेली आहुति त्यानें प्रत्यक्ष पाहिली होती दिल्लीचें राजघराणें नष्ट आणि देशोधडीला लागलेल त्यान प्रत्यक्ष पाहिलें आपल्या बहात्तर वर्षांच्या आयुष्यात गालिबला जीवनाचा आणि त्यातील सुखदु खाचा जो अनुभव आला तो फारच थोड्याच्या वाट्यास आला असेल ह्यासबधींचे गालिबच्या गजला तर पाहा—

✓ मेरी क़िस्मत में ग़म गर इतना था ०
✓ दिलभी यारब कयी दिये होते

हे परमेश्वरा, माझ्या नशिबात तू इतकीं दु खें लिहिलीं होतींस तर तीं सारीं सहन करण्यास हृदयें तरी अनेक द्यायचीं होतींस एका हृदयान काय काय म्हणून सहन करावें

दिल ही तो है न सग व ख़िश्त दर्दसे भर न आये क्यों
रोयेंगे हम हजार बार कोयी हमें सताये क्यों

हें हृदय हें शेवटीं हृदयच आहे. तें कांहीं दगड नव्हे कीं धोंडा नव्हे. तें व्यथेनें कां बरें भरून येणार नाहीं. आम्ही अनंत वेळां रडूं पण रडूं देण्यांत आम्हांला कुणी कां बरें त्रास द्यावा.

देर नहीं हरम नहीं, दर नहीं आस्तान नहीं
बैठे है रहगुजरपे हम ग़ैर हमें उठाये क्यों

हें कांहीं देऊळ नव्हे कीं मशीद नव्हे, हें कांहीं कुणाचें दार नाहीं कीं कुणाचा उंबरठा नाहीं. आम्ही वाटेवर बसलों आहोंत. आम्हांला काय म्हणून लोकांनीं तेथून उठवावें ?

क्यों गर्दिशे मदामसे घबरा न जाये दिल
इन्सान हूं प्याला व सागर नहीं हूं मैं

ह्या चिरकालच्या भ्रमंतीनें मन कां बरें घाबरून जाणार नाहीं ! मी तर शेवटीं मनुष्यच आहें ना ! सारखा फिरतीनें असलेला मद्यालयांतील पेला तर नव्हे ना !

यारब जमाना मुझको मिटाता है किसलिये
लौहे जहांपे हर्फे मुकर्रर नहीं हूं मैं

हा काळ मला पुसून टाकण्यास कां बरें वचन आहे ? जगाच्या फलकावर मी पुन्हा लिहिलेला आणि म्हणून पुसण्यालायक असलेला शब्द आहें कीं काय ?

जीवन हा एक संघर्ष आहे त्यांतून सुटून जावें म्हटलें तरी तें शक्य नाहीं.

कशाकश हाये हस्तीसे करे क्या सअीये आजादी
हुअी जंजीर मौजे आबको पुरसत रवानी की

ह्या जीवनाच्या संघर्षांतून सुटून जाण्याचा प्रयत्न करण्यांत कांहीं एक अर्थ नाहीं. समुद्राच्या लाटा तर पाहा. किनाऱ्याकडे येत असतांना प्रत्येक लाटेला तर वाटतें कीं आपण समुद्रांतून सुटलों आहोत. परंतु किनाऱ्यापर्यंत पोहोंचता पोहोंचतांच पायांत साखळी घालून ओढल्यासारखें होऊन त्या लाटेला समुद्राकडे परत फिरावें लागतें. तसेंच जीवनाचें पण आहे.

सहन करणें आणि परिस्थितीशीं सतत झगडत राहाणें हेंच गालिबच्या मतें ह्याच्यावर उपाय आहेत.

ताब लायेही बनेगी गालिब्
वाकिया सख्त है और जान अजीज्

गालिब म्हणतो, संकटें सहन करणें हाच एकमेव उपाय आहे. कारण एकीकडे प्रसंग बांका आहे तर दुसरीकडे प्राण प्रत्येकाला प्रिय आहेत.

मरणाशिवाय ह्या जीवनशोकाला मुक्ता नाहीं तेव्हा मृत्यूने मुक्त करीपर्यंत धैर्याने सारें सारें सहन करीत राहाणे आवश्यक आहे.

गमे हस्तीका असद् किस्से हो जुज़ मर्ग इलाज
शमा हररंग में जलती है सहेर होने तक

एक मृत्यूशिवाय ह्या जीवनशोकातून मुक्ता कशी वरें होणार ? तो दिवा पाहा. पहाट होऊन विझून जाईपर्यंत त्याला जळणें प्राप्तच आहे ना.

मरणाने कितीतरी गोष्टींवर पडदा पडतो

ढापा कफ़नने दागे उयूबे बरहनगी
मैं वरना हर लिबासमें नगे वजूद था

कफनानें (प्रेतावरील वस्त्रानें) माझ्या नग्नतेवर पांघरूण घातलें, नाहीतर मी जीवनभरीं कोणताही पोषाख घातला तरी वस्तुत नग्नच होतों.

हे जीवन क्षणभगुर आहे ह्या जीवनाचा वारू तुफान नि अनावर असा आहे. जीवनाचा चढ़र क्षणिक आहे जगत् नाशवत आहे असे विचार गालिबने व्यक्त केलेले आहेत

पढ़ता हू मकतबे गमे दिल्ह में सबक हनोज़
लेकिन यहीके रफ्त गया और बूद था

हृदयशोकाच्या शाळेंत मी पाठ घेत आहे पण दोन शब्दाच्या पुढ प्रगति काहीं झाली नाहीं. एक शब्द रफ्त म्हणजे गेला आणि दुसरा शब्द बूद म्हणजे होता हा होय.

ह्या भूतलावर होऊन गेलेल्या नररत्नाची आठवण होऊन गालिब विचारतो —

मक्दूर हो तो खाकसे पूछू के अये लयीम
तूने वो गज हाये गिरामाया क्या किये

मला शक्य असतें तर मी वसुंधरेला विचारलें असते कीं, हे कृपण स्त्रिये, बोल, इतकीं नररत्ने आपल्यापाशीं साठवून ठेवून तू त्याचं काय करीत आहेस

पण जीवन दु:खपूर्ण आहे हें म्हणणाऱ्याना गालिबचें सागणें आहे सुखदु:खाच्या घटना अपरिहार्य आहेत आणि त्याच्यामुळेंच जीवनाला जिवंतपणा आला आहे.

नगमा हाये गमको भी
अये दिल्ह गनीमत् जानिये
वे सदा हो जायेगा ये साजे हस्ती एक दिन

हे हृदया, ह्या शोकगीतांनाच बरें समज अरे, एक दिवस हें जीवनाचें वाद्य बंद पडून जाईल हें ध्यानात आहे ना!

हवसको है निशाते कार क्या क्या
न हो मरना तो जीनेका मजा क्या

गालिबच्या जीवनाकडे पाहण्याचा असा दृष्टिकोन आहे. जीवन हे सुखदुःखाचे मिश्रण आहे. पण असें जरी असलें तरी तें जगलेंच पाहिजे. त्या मधपींतून सुटका नाहीं. दुःखें अमाप आहेत. पण म्हणून जीवनाचा त्याग करणें शक्य नाहीं आणि इष्ट नाहीं असें गालिबचें म्हणणें आहे. काहीं टीकाकाराच्या मते गालिबच्या गीतांतून निराशेचे सूर निघतात असें म्हणणें आहे. परन्तु गालिबनें गमे हस्ती (जीवनशोक), गमे इश्क (प्रेमशोक), गमे दिल (हृदयशोक), ह्यासंबधीं लिहिलेलें असलें तरी त्याचें तत्त्वज्ञान निराशेचें नाहीं. परिस्थितीला तोंड देऊन झगडणें आणि दुःखें सहन करणें हेंच आवश्यक असतें असें त्याचें म्हणणें आहे. धर्माच्या बाबतींत तर गालिब हा अद्वैती होता.

हस्ती के मत् फरेब में आजाइयो असद्
आलम् तमाम् हल्कये दामे खियाल है

हे असद (कवीचें नाव) या अस्तित्वाचा भ्रम बाळगू नकोस. अरे, ही सृष्टि म्हणजे कल्पनाचें जाळें आहे.

एक परमेश्वर सत्य, बाकी सर्व मिथ्या असा गालिबचा सिद्धांत दिसतो.

न था कुछ तो खुदा था
कुछ न होता तो खुदा होता
डुबोया मुझको होने ने,
न होता मैं तो क्या होता
किंवा — जबके तुझबिन् नहीं कोयी मौजूद
फिर ये हगामा अये खुदा क्या है

हे परमेश्वरा, ह्या जगात तुझ्याशिवाय दुसरें कोणीं नाहीं तर हा सारा गोंधळ कशामुळें झालेला आहे?

परमात्म्याचें स्वरुप कणाकणातून दिसून येतें. हें सर्व परमात्म स्वरुपात विलीन होणार तसें होणें हेंच त्याचें ध्येय आहे.

/ (इश्रते कतरा है दरियामें फना हो जाना
समुद्रात विलीन होऊन जाणें ह्यातच जलबिंदूचें वैभव आहे.)

निष्काम उपासनेची आणि आत्यंतिक भक्तीची गालिबनें जागोजागीं आवश्यकता प्रतिपादन केलेली आहे. स्वर्गांतील सुखें लाभावींत म्हणून केलेली उपासना ही सकाम उपासना होय. त्यात आमीष ठेवण्यात आलेलें आहे. असा स्वर्ग आम्हाला नको.

तो उचलून नरकात झोकून द्या कर्मे असा सवाल गालिबने टाकलेला आहे तुमचा स्वर्ग कसा काय आहे हें आम्हाला माहीत आहे मनाच्या करमणुकीला तो चांगला म्हणून बरा आहे

हम को मालूम हैं जन्नत्‌कि हकीकत लेकिन्
दिल्‌के खुश रखनेको गालिब ये खियाल अच्छा हैं

गालिब हा शियापंथी होता पण त्याची वृत्ति संकुचित नव्हती त्याचे जिवलग मित्र निरनिराळ्या पंथाचे वा धर्माचे होते शिवाय त्याचे हिंदु शिष्य आणि चाहाते अनेक असून त्यांच्याशीं त्याचे अत्यंत जिव्हाळ्याचे संबंध होते

एका पत्रांत तो लिहितो,

"बंदा परवर, मैं तो बनी आदमको ( मनुष्यमात्र ) मुसल्मान हो या हिंदु या नुसरानी ( खिस्ती ) अजीज रखता हूं और अपना भाई गिनता हूं दूसरा माने या न माने "

धर्माचा कर्मकांड गालिबला कधीच मान्य नव्हता त्याची मदिरेची आसक्ति ही एकच गोष्ट त्याची धर्माचरणातील शिथिलता दाखविण्यास पुरेशी आहे रूढिप्रिय आणि कट्टर मुसनिष्ठांची त्यानें जागोजागीं टर उडविली आहे साधासुधा भक्तिमार्ग सोडून रूढ धर्माचरण करणारे, वृत्तीने कट्टर, लोकांना स्वर्गाचीं आमिषें आणि नरकाचें भय दाखविणारे संकुचित वृत्तीचे मुल्ला, मौलवी, जाहिद, वाएज ( प्रवचनकार ), मोहतसीब ( लोकांच्या नीतिमत्तेवर देखरेख टेवणारे ) ह्यांची त्यानें ठिकठिकाणीं हजेरी घेतली आहे

गालिबचें व्यक्तिमत्व अष्टपैलू होतें त्याच्या उर्दू गझलांतून जीवनाचे विविध विषय हाताळण्यांत आले असून गालिबने ते सारे मोठ्या आकर्षक पद्धतीनें हाताळलेले आहेत, मांडलेले आहेत हें विशेष होय गालिबच्या स्वतःच्या अनुभवांतून त्याच्या कविता निर्माण झाल्या असल्यामुळें त्यांत खरा रस उतरलेला दिसून येतो योग्य आणि चित्ताकर्षक उपमा, मोहक रचना, शब्दांची मनोहर पडण ह्यामुळें गालिबच्या कविता गेलीं शंभर वर्षे रसिकांच्या जिभेवर साराख्या खेळत आहेत

✓ "दिले नादान तुझे हुवा क्या है ?
आखिर अिस दर्दकी दवा क्या है ?"
"इश्क मुझको नहीं वहशतही सही
मेरी वहशत तेरी शोहरत ही सही"
"मुद्दत हुयी है यारको मेहमा किये हुये"
"हजारो ख्वाहिशें ऐसी के हर ख्वाहिशपे दम निकले,
बहोत निकले मेरे अरमान फिरभी कम निकले"

"आहको एक उम्र चाहिये असर होने तक
कौन जीता है तेरे जुल्फके सर होने तक"

"कोयी उम्मीद बर नहीं आती,
कोयी सूरत नजर नहीं आती"

"दिलसे तेरी निगाह जिगरतक उतर गयी
दोनोको एक अदामें रजामंद कर गयी"

"दर्दसे मेरे है तुझको बेकरारी हाये हाये
क्या हुयी जालिम् तेरी गफलत शुआरी हाये हाये"

"ये न थी हमारी किस्मतके विसाले यार होता
अगर और जीते रहते यही इंतेजार होता"

गालिबच्या अशा कितीतरी कविता लोकांच्या तोंडीं आहेत गालिबचा मृत्यु इ स. १८६९ मध्ये झाला त्याला आज जवळ जवळ नव्वद वर्षें होत आलीं ह्या काळात उर्दू काव्यक्षेत्रांत हाली, एक्बाल, हसरत मोहानी, जोश, जिगर इत्यादींनी बहुमोलाची उत्कृष्ट भर घातली परंतु असें जरी असल तरी गालिबचं श्रेष्ठपद अद्यापही अढळ राहिलं आहे व तें त्याच्या काव्यगुणामुळें

गालिबच्या उर्दू गजलांचा केलेला हा मराठी अनुवाद रसिकांना आवडेल अशी आशा आहे

१ . . . नक़्श फ़रयादी है किसकी शोख़िये तहरीरका
कागज़ी है पैरहन् हर पैकरे तस्वीरका ॥ १ ॥

कावे कावे सख़्तजानीहाये तनहाई न पूछ
सुबह करना शाम का लाना है जूये शीरका ॥ २ ॥

जज़्बए बेइख़्तियारे शौक़ देखा चाहिये
सीनए शमशीरसे बाहर है दम शमशीरका ॥ ३ ॥

आगही दामे शुनीदन जिस क़दर चाहे बिछाये
मुद्दआ अनक़ा है अपने आलमे तक़रीरका ॥ ४ ॥

बस्के हूं गालिब असीरीमेंभी आतिश् ज़ेरपा
मूये आतिश दीदा है हल्क़ा मेरी जंजीरका ॥ ५ ॥

( १ ) इराणमध्ये आपल्या गाऱ्हाण्याची दाद लावून घेण्याकरितां लोक आपलीं इष्ट तीं गाऱ्हाणीं कागदावर लिहून त्याचा अंगरखा करून वरिष्ठ अधिकाऱ्याकडे जात गालिब म्हणतो, 'माझें अस्तित्व हेंच गाऱ्हाणें आहे कीं, परमेश्वरानें ह्या दुःखमय जीवनांत मला कां आणलें आहे त्या दृष्टीनें प्रत्येक वस्तू जणू परमेश्वरापाशीं दाद मागण्याकरिता कागदाचा अंगरखा धारण केला आहे

( २ ) मित्रा, एकटेपणाच्या रात्रीची मनःस्थिति विचारूं नकोस तरी रात्र कंठणें म्हणजे प्रेमिक फरहादनें कालवा खणून प्रेमवचनाची पूर्ति करूं पाहण्याइतकें अवघड आहे.

( ३ ) आपली भावभक्ति गिळेल पोचली कीं ध्येयपूर्ति ही झालीच पाहिजे बलिदानाची इच्छा उत्कट झाली कीं खड्गाची तीक्ष्णता खड्गाच्या बाहेर येऊन आघात केल्या शिवाय राहणार नाहीं इच्छेची उत्कटता मात्र हवी

( ४ ) माझें लेखन गूढ स्वरूपाचें आहे तुम्ही निरीक्षणाचं जाळें कितीही पसरा माझ्या वाणीतील अर्थ तुम्हाला समजणें अशक्य आहे

(५) माझ्या पायात शृंखला असल्यामुळे मी बंधनात आहे पण अंतरीच्या दाहकते मुळे त्या शृंखला आगीसमोर वस्त्र धरला असता तो जसा वर्तुळाकार आणि निर्जीव बनतो तद्वत् निर्जीव बनल्या आहेत

२ . . . जुज़ क़ैस् और कोई न आया बरूये कार
सहरा मगर बतंगीए चश्मे हुसूद् था ॥ १ ॥
आशुफ्तगीने नक़्शे सवेदा किया दुरस्त
ज़ाहिर हुवा कि दागका सरमाया दूद था ॥ २ ॥
था ख्वाबमें खियालको तुझसे मुआमिला
जब आँख खुलगयी जिया था न सूद था ॥ ३ ॥
लेता हू मक़्तबे गमे दिलमें सबक़् हनोज़
लेकिन यही के रफ़्त गया और बूद था ॥ ४ ॥
ढापा कफ़नने दागे उयूबे बरहनगी
मैं वरना हर लिबासमें नंगे वजूद था ॥ ५ ॥
तेशे बगैर मर न सका कोहकन् असद्
सरगश्तये खुमारे रसूमो कुयूद था ॥ ६ ॥

(१) प्रेमाच्या उत्कटतेत एक, म्हणजे मजनू सोडून कुणी पुढ आला नाहीं एवढें मोठें वाळवंट पण त्यात सुद्धा प्रेम व्यक्त केलें नाहीं जणूं काय आत्यंतिक मत्सरामुळें त्या वाळवंटाचे डोळेही संकुचित बनत होते कवीचा आशय असा कीं इतक मोठ जग पण प्रेम व्यक्त करण्यास असमर्थ ठरलं ते व्यक्त करण्यास अधिकार केवळ एकट्या मजनूचा ठरला

(२) तीव्र अस्वास्थ्यामुळ हृदयावर डाग पडला आहे जसे धुरामुळ काळे डाग पडतात नि ते तसेच राहातात त्याप्रमाणें कवीनें तम्मयीला धूर, आणि हृदयावर पडलेल्या व्रणाला काळ्या डागाची उपमा दिलेली आहे, आणि म्हटल आहे कीं डाग पडण्यास जसा धूर कारणीभूत होतो तसेंच हृदयावर व्रण पडण्यास मनाची आत्यंतिक तळमळ कारणीभूत होते

(३) माझी कल्पनाशक्ति स्वप्नाच्या अवस्थेंत तुझपाशीं हितगुज करीत होती म्हणजे तुझें स्वरूप जाणून घेण्याच्या प्रयत्नात होती परंतु जागृत अवस्थेंत पाहतां तो ह्या हितगुजीचा लाभही झालेला नाहीं अन् तोटाही नाही

(४) हृदयाच्या शोकशाळेंत मी अजून धडेच गिरवत आहें ते धडे कोणते म्हणाल तर दोन शब्दाचे अर्थ एक म्हणजे " गत " अन् दुसरा म्हणजे " होता " कवीचें म्हणणें असं कीं जग म्हणजे शोककथा आहे प्रत्येक वस्तूचा नाश ठेवलेला आहे कोणत्याही वस्तू संबधीं ती एकेकाळीं होती आणि आता गेली हेच ना शब्द वापरावयाचे जगाच्या शोक शाळेतील हेच ते धडे होत

✓ (४) सुंदर स्त्रियांच्या वागणुकीच्या सहजपणामागें खोल अर्थ असतो त्याचा हेतु असा कीं प्रियकराची कठिण परीक्षा घ्यावी, म्हणून, त्याचा सहजपणा हा धूर्तपणा असतो आणि त्यांची बेपर्वाई म्हणजेच त्यांचें चातुर्य होय.

(५) उर्दू काव्यात हृदयाला नेहमीं फुलाच्या गुच्छाची उपमा देतात. कवि म्हणतो कीं माझें हृदय रक्ताच्या रूपानें नेत्रद्वारें वाहत गेलें होतें त्याचा मागमूसही नव्हता. त्याचा आज शोध लागला. वसतऋतूंत उमललेल्या फुलाचा गुच्छ म्हणजेच माझें हृदय होय.

(६) मला माझ्या हृदयाची कल्पना नाहीं इतकें माहित आहे कीं मी पुष्कळ वेळा हृदयाचा शोध केला पण मला त्याचा ठावठिकाणा लागला नाहीं. त्याउलट तुला माझें हृदय कित्येक वेळा हातीं आलें होतें पण तू त्याची पर्वा केली नाहींस.

(७) उपदेशनाच्या बोधान माझ्या जखमेवर मीठ चोळण्याचें काम केलें कुणीं त्याना विचारावें कीं अशा रीतीनें मला त्रास देण्यात तुम्हाला काय आनद वाटला

दिल मेरा सोजे निहासे बे महाबा जलगया
४ . . . आतिशे खामोशके मानिंद गोया जलगया ॥ १ ॥
दिलमें जौके वस्ल व यादे यार् तक् बाकी नहीं
आग इस घरमें लगी ऐसी के जो था जलगया ॥ २ ॥✓
मैं अदमसे भी परेहूं वरना गाफिल बारहा
मेरी आहे आतिशीसे बाले अन्का जलगया ॥ ३ ॥✓
अर्ज कीजे जौहरे अंदेशेकी गरमी कहा
कुछ खियाल आया था वहशत्का के सहरा जलगया ॥ ४ ॥
दिल नहीं तुझको दिखाता वरना दागोंकी बहार
इस चरागाका करु क्या कारफरमा जलगया ॥ ५ ॥
मैं हूं और अफ्सुर्दगीकी आरजू गालिब् के दिल
देखकर तरजे तपाके अहले दुनिया जलगया ॥ ६ ॥✓

(१) माझें हृदय आत लपलेल्या प्रेमाच्या आगीनें बेधडक जळून गेलें आणि त्याचा पत्ताही कुणाला नाहीं जणू काय ही आग आंतल्या आतच पेटत होती

(२) आता हृदयात मीलनाची हौस किंवा प्रियेची आठवण सुद्धा शिल्लक राहिलेली नाहीं कारण ह्या घरात आग इतकी भडकली होती कीं होतें नव्हतें ते सारें सारें काहीं जळून खाक झालें आहे

(३) मी आता अस्ति आणि नास्तीच्याही पलीकडे पोचलों आहे. ह्यापूर्वी माझ्या निश्वासाच्या ज्वालानीं सर्व काहीं होरपळून निघत होतें

(५) एक कफनानच (प्रेतावर घालावयाच कापड) माझ्या दोषावर पांघरूण घातले नाहीं तर जीवनात कितीही कपडे वापरून मी नग्नच होतो नाहीं का ?

(६) सुप्रसिद्ध प्रेमिक फरहादने कुऱ्हाडीने आपली आत्महत्या करून घेतली खरं म्हणजे हे त्याने करावयास नको होते प्रेम अत्युत्कट असले तर मरण आपोआप यावयास हवे होते त्यास कुऱ्हाड कशाला ? प्रेमात कृत्रिमता नको ह्या कुऱ्हाडीमुळेच फरहादच्या प्रेमव्यथेला मर्यादा पडल्यासारखें झालें

कहते हो न देंगे हम दिल अगर पडा पाया

३ . . . दिल कहा के गुम कीजिये हमने मुद्दआ पाया ॥ १ ॥

इश्क़से तबीयतने जीस्तका मज़ा पाया

दर्दकी दवा पायी दर्दे बेदवा पाया ॥ २ ॥

दोस्तदारे दुश्मन् हैं एतेमादे दिल् माऌम्

आह बेअसर देखी नाला नारसा पाया ॥ ३ ॥

सादगी व पुरकारी बेखुदी व हुशियारी

हुस्नको तगाफुल्मे जुर्रत् आजमा पाया ॥ ४ ॥

गुंचा फिर लगा खिलने आज हमने अपना दिल

खून् किया हुवा देखा गुमकिया हुवा पाया ॥ ५ ॥

हाले दिल् नहीं माऌम् लेकिन् इस् कदर यानी

हमने बारहा ढूंडा तुमने बारहा पाया ॥ ६ ॥

शोरे पदे नासेहने जख्मपर नमक छिडका

आपसे कोई पूछे तुमने क्या मज़ा पाया ॥ ७ ॥

(१) तू म्हणतेस की तुझें हृदय मला कुठं आढळल तर मी ते तुला परत देणार नाहीं अग ! मजपाशीं माझे हृदय कुठे शिल्लक राहिल आहे की आढळ्यावर देत नाहीं म्हणून तू म्हणतेस तुझा अर्थ मी समजलो माझें हृदय तुझ्या हातीं आल्यानंतर मला चिडविण्याकरिता तू ह म्हणत आहेस

(२) जीवनात प्रेम नसेल तर मजा नाहीं प्रेमाचा लाभ झाल्यामुळें जीवनाचा खरा-खुरा आनद अनुभवास आला रोगाला औषध मिळाल आणि त्याबरोबर ज्या रोगाला औषध नाही अशी व्यथा पदरीं पडली

(३) माझें हृदय – माझ्या प्रियेकडे झुकल्यामुळें, माझेंच असून मला वैरी बनल आहे, अन् म्हणून तर माझ्या निश्वासाला फळ नाही आणि ह्यामुळेंच की काय माझें रुदन अरण्य-रुदन ठरत आहे

( ४ ) माझी तळमळ, उत्कटता अन् आवेश मी किती वर्णन करूं ? इतकेंच म्हणूं शकेन कीं सर्व काहीं सोडून वणवण भटकण्याची मी इच्छा केली मात्र कीं त्या इच्छेच्या दाहकतेनें अरण्याला आग लागली

( ५ ) हृदयावर ज्या जखमा झाल्या आहेत त्या इतक्या आहेत कीं आतिषबाजीच्या दिव्याचीच उपमा त्याना शोभेल त्या जखमांची बहार मीं तुला दाखविली असती परंतु काय करूं, ज्याच्यावर जखमा आहेत तें हृदय जळून गेलें आहे

( ६ ) जगाची रीत पाहून मन प्रफुल्ल होण्याऐवजीं उदास झालें आहे कारण जगाची रीतच अशी कीं आपलें हृदयही जळून जाव

शौक हर रंग रकीबे सरोसामा निकला
५... वेस् तस्वीरके परदेमे उरिया निकला ॥ १ ॥
जख्मने दाद न दी तंगीये दिलकी यारब्
तीर भी सीनये बिसमिलसे पुरअफशा निकला ॥ २ ॥
बूये गुल नालए दिल दूदे चिरागे महफिल
जो तेरी बज्मसे निकला सो परेशा निकला ॥ ३ ॥
दिल हसरतजदा था मायदये लज्जते दर्द्
काम यारोंका बकद्रे लबो दंदा निकला ॥ ४ ॥
अये नो आमोजे फना हिम्मते दुश्वार पसद
सख्त् मुश्किल हैं के ये कामभी आसान् निकला ॥ ५ ॥
दिलमें फिर गिरियाने एक शोर उठाया गालिब्
आह जो कतरा न निकला था सो तूफान् निकला ॥ ६ ॥

( १ ) निर्मळ प्रेमाला अवडंबराच हरप्रकारें वावडें आहे म्हणूनच मजनूचीं चित्रें पाहा, तीं नग्नच काढतात ना !

( २ ) शरामुळें हृदय विद्ध झालें पण जखमेनें हृदयाची काहीं कदर केली का ? हृदयामधून बाणाला घायाळ करून आरपार निघून जावें लागलें, पण जखम राहिलीच

( ३ ) हे प्रिय, तुझ्या मैफिलींतून जो निघाला तो त्रस्त होऊनच निघाला मग तो फुलाचा सुगंध असो, हृदयाचा आक्रोश असो कीं समईचा धूर असो

( ४ ) माझ्या हृदयव्यथेच्या मेजवानीनें माझ्या मित्राचे योग्यतेनुरूप समाधान होतें म्हणजे माझ्या काव्यरचनेमुळें प्रत्यक्ष रसिकाला आपापल्या योग्यतेप्रमाणें काव्यानंदाचा लाभ होतो

( ५ ) माझी धीरवृत्ति पाहा नष्ट होण्याचे काम वास्तविक किती अवघड ? पण माझ्या वृत्तीनें हें अवघड काम सुद्धा सोपें करून दाखविलें

. . . . ५०

( ६ ) अश्रु ढाळताना मी संयम दाखविला त्या उलट न गळलेला अश्रुबिंदु हृदयाची कालवाकालव करीत आहे जणू काय हा एकच बिंदु म्हणजे तुफानच

६ . . . धमकीमे मरगया जो न बाबे नवर्द था
इश्के नवर्द पेशा तलबगारे मर्द था ॥ १ ॥
थाजिंदगीमे मर्गका खट्का लगा हुवा
उडनेसे पेश्तरभी मेरा रंग जर्द था ॥ २ ॥
तालीफे नुस्खहाये वफा कर रहा था मैं
मज्मूए ख़ियाल अभी फर्द फर्द था ॥ ३ ॥
दिल तो जिगर के साहिल दरियाए खून है अब
इस् रहगुजर्मे जल्वये गुल् आगे गर्द था ॥ ४ ॥
जाती है कोई कश्मकश् अंदोहे इश्क की
दिलभी अगर गया तो वही दिल का दर्द था ॥ ५ ॥
अहबाब चारासाजीए वहशत् न कर् सके
जिंदा मे भी ख़ियाले बियाबा नवर्द था ॥ ६ ॥
ये लाशे बेकफन् असदे खस्ताजाकी है
हक् मगफिरत् करे अजब आजाद मर्द था ॥ ७ ॥

( १ ) आपल्या क्षेत्रात अनभिज्ञ असलेल्या प्रेमिक पहिल्याच धक्क्याला गडगडला प्रेमाचें क्षेत्र इतकें कठिण आहे कीं त्यात उतरणारा अचल चिकाटीचाच हवा

( २ ) जीवनातच मला मृत्यूची नेहमीं धाकधूक लागली होती मरणाच्या अगोदरच माझ्या चेहेऱ्याचा रंग फिक्कट झाला होता म्हणजे मरण येण्याच्या आधींच जणू काहीं मी मरून गेलो होतों

( ३ ) माझ्या विचारांत अजून पोक्तपणा येण्याच्या पूर्वीच म्हणजे सुरवातीपासूनच मी प्रेम आणि निष्ठा ( इश्क आणि वफा ) ह्यांचा गुलाम झालों

( ४ ) हृदयापासून काळजापर्यंत आज रक्ताची नदी वाहात आहे म्हणजे तळमळीचा दर्या उफाळून आला आहे पण एक काळ असा होता कीं ह्या वाटेंत असा वसतऋतु फुलला होता कीं ज्याच्या पुढे बागाचा बहर काहींच नाहीं कवीचा सांगण्याचा हेतु हा कीं पूर्वी मन स्वस्थ आणि आनंदात होते आता प्रेमाचा छंद लागल्यामुळें ते अत्यंत व्यथित झाले आहे

( ५ ) प्रेमाच्या शोकातून मुक्तता अशक्य आहे हृदय आपल्यापाशीं शिल्लक नाहीं पण हृदयाची व्यथा मात्र शिल्लक आहे आणि हृदय हातचे गेल ह्याचा शोक आहे अर्थात् कोणत्याही परिस्थितींत शांति म्हणून नाहीं

( ६ ) माझ्या प्रेमोन्मादाचा इलाज माझे मित्र करू शकले नाहींत. मला त्यांनी बंधनांत ठेवलें तरी माझे विचार आणि भावना स्वैर फिरत होत्या.

( ७ ) कफन नसलेलें हें प्रेत विपन्न स्थितींत असलेल्या 'असद'चे म्हणजे 'गालिब' चें आहे. अरेरे ! काय सांगावें ? हा गालिब किती स्वातंत्र्यप्रिय होता. त्याला आपल्या प्रेतावर कफनाचेंही बंधन आवडलेलें नाहीं. परमेश्वर त्याचेवर दया करो. प्रेताला कफनसुद्धां न मिळणें हें अत्यंत दारिद्र्यावस्थेचें चिन्ह समजतात. गालिबनें ह्याच स्थितीला स्वातंत्र्यप्रियता संबोधून खऱ्या परिस्थितीला निराळें रूप देण्याचा प्रयत्न केला आहे.

७ . . . शुमारे सुब्हा मर्गूबे बुते मुश्किल पसंद् आया
तमाशाये बयक् कफ़् बुर्दने सद्दिल् पसंद आया ॥ १ ॥
बफ़ैजे बेदिली नौमीदीये जावीद् आसां है
कुशाइशको हमारा उक्दये मुश्किल पसंद आया ॥ २ ॥
हवाये सैरे गुल, आयीनए बेमेहरीये क़ातिल
के अंदाज़ बखून् गल्तीदने बिसमिल पसंद् आया ॥ ३ ॥
जराहते तोहफये अल्मास अर्मुग़ाने दाग़े जिगर हद्या
मुबारक् बाद् असद् गम् ख्वारे जाने दरद मंद् आया ॥ ४ ॥

( १ ) माझ्या निर्दय प्रियेला आतां स्मरणी आवडूं लागली आहे. कारण स्मरणी एकदम हातांत घेतली कीं स्मरणींतले शंभर मणी मुठींत येतात. म्हणजे एका झेपेंत शंभर हृदयें ताब्यांत घेण्याची इच्छा तिला झाली आहे. हेंच तिच्या आवडीवरून दिसून येतें आहे.

( २ ) जगाकडून निराशा पदरीं पडल्यामुळें कायमची निराशा सहन करणें सोपें झालें आहे. आतां जगांतील आशा आणि निराशा ह्या दोन्हीं आम्हांला सारख्याच झाल्या आहेत.

( ३ ) बागेंत फुलें वाऱ्यानें डोलत आहेत तीं प्रियेला कां आवडतात म्हणाल तर तीं सुंदर आहेत म्हणून नव्हें, तर वाऱ्यामध्यें डोलणाऱ्या त्या फुलांकडे पाहून निला रक्ताच्या थारोळ्यांत तडफडणाऱ्या हृदयाची आठवण होते.

मैंने चाहाथा के अदोहे जफासे छूट
वो सितमगर् मेरे मरनेपेभी राजी न हुआ ॥ ३ ॥
दिऱ् गुजरगाहे खियाले मये व सागर ही सही
गर नफस् जादये सरे मजिले तक्वा न हुवा ॥ ४ ॥
हू तेरे वादा न करने मे भी राजी के कभी
गोश मिन्नतकशे गुल्बागे तसल्ली न हुआ ॥ ५ ॥
किससे महरूमिये किस्मतकी शिकायत कीजे
हमने चाहा था के मरजाये सो वो भी न हुवा ॥ ६ ॥
मर गया सदमये यक् जुंबिशे लबसे गालिब्
नातुवानीसे हरीफे दमे ईसा न हुवा ॥ ७ ॥

(१) निष्ठेची छाप कपाळावर पडली पण त्यानं मनाचें समाधान काय होणार ? जर ह्या निष्ठेचा कांहीं लाभ नाहीं तर ह्या शब्दांत अर्थच राहात नाहीं

(२) लोक म्हणतात कीं पाचू (जमरूद) सापासमोर धरली तर सर्पाचे डोळे जातात पण तुझे काळेभोर दिसणारे केस इतके नखरेल आहेत कीं तुला पाचूसारखी हिरवी लव येऊन सुद्धा तुझ्या कुरळ्या आणि वक्र कुंतलाला मऊपणा आला नाहीं

(३) मी मनात इच्छा केली कीं आता मरण बरें म्हणजे तिच्याविषयींची निष्ठा आणि त्यामुळें मला होणारं दुःख ह्यातून माझी मुक्तता होईल पण ती कठोरहृदया माझ्या मरणासही संमती देईना न जाणों माझ्या मरणानं जगात तिचा दुर्लौकिक व्हावयाचा

(४) माझे श्वासोच्छ्वास धर्माच्या (कर्मठपणाच्या) वातावरणात चाळले नाहीत तर हरकत नाही माझें हृदय तर मदिरा आणि मदिरेच्या पेल्याचें निवासस्थान आहे ना !

(५) तूं मीलनाचं वचन दिलं नाहींस तरी आनंद आहे नाहींतर ही वचन कानावर आणि हृदयावर पडून त्यांना तुझें ऋणी व्हावें लागलं असतें

(६) भाग्याच्या दरिद्री नशिबानं गाऱ्हाणें कुणापाशीं घेऊन जावें मरणाची इच्छा खूप केली पण तें तरीं कुठे येतंय

(७) येशूच्या फुंकर मारण्यानं रोगी बरे होतात आणि मेलेले जीवंत होतात असें म्हणतात पण मी इतका अशक्त झालो होतों कीं फुंकर मारण्याची वेळच आली नाहीं हजरत ईसाचे (येशूचे) ओठ हलले तोंच माझा (गालिबचा) अंत झाला

सताइशगर् हैं जाहिद् इस् कदर जिस् बागे रिज्वा का
१ ... वो यक् गुलदस्ता है हम् बेखुदोंके ताके निसियाका ॥ १ ॥

उम्रे वामान्दगी ऐ हसरते दिल
नाला करता था जिगर याद आया ॥ ४ ॥
जिन्दगी यों भी गुजर ही जाती
क्यों तेरा राह गुजर याद आया ॥ ५ ॥
क्या ही रिज्वा से लडाई होगी
घर तेरा खुल्द में गर याद आया ॥ ६ ॥
आह वो जुरअते फरयाद कहा
दिलसे तग आके जिगर याद आया ॥ ७ ॥
फिर तेरे कूचे को जाता है खयाल
दिल गुम् गश्ता मगर याद आया ॥ ८ ॥
कोई वीरानी सी वीरानी है
दश्त को देखके घर याद आया ॥ ९ ॥
मैंने मजनूं पे लड़कपन में 'असद'
सग उठाया था के सर याद आया ॥ १० ॥

(१) मला पुन्हा माझे पाणावलेले डोळे आठवले. माझ्या हृदयाला पुन्हा शोकमय अवस्था संपादण्याची हुरहुर लागली.

(२) तू निघून गेलीस. मन बेचैन झालें. थोडा वेळ मन स्वस्थ झालें न झालें तोंच तुझें पुन्हा निघून जाणें आठवलें आणि मग पुन्हा अस्वस्थतेला सुरवात झाली.

(३) माझी मीलनाची वृथा आशा तरी पाहा. ती चंचल नजरेची प्रिया पुन्हा माझ्या आठवणींत आली माझी आशा तरी किती भोळी. त्या चंचलेशीं मीलन अशक्य हें माहीत असूनही तिची आठवण मात्र सारखी येते.

(४) माझ्या हृदया, माझी निराशावस्था पाहा. मला शोक करण्याची इच्छा नव्हती का ? पण काय करूं. काळीज आधींच फाटून चाललें होतें. त्यामुळें दीर्घ निश्वास सोडण्याचा धीर मला होईना.

(५) जीवन कसें तरी सपून गेलें असतें .त्यात तुझ्या येण्याजाण्याच्या वाटेची कां आठवण यावी ? ती आठवण झाली मात्र, दुःखानें मरणच ओढवलें.

(६) स्वर्गांत गेल्यावर हे प्रिये, मला तुझ्या घराची आठवण येईल आणि मी स्वर्गाच्या द्वारपालाला सांगेन कीं या स्वर्गापेक्षा माझ्या प्रियेचें घर चांगलें आहे त्यामुळें त्या द्वारपालाशीं खासें भांडण जुंपेल.

( ७ ) धीर धरण्याची आणि निश्वास सोडण्याची शक्ति कुठ आहे ? हृदयात आता शक्ति नसल्यामुळें मला आता माझें काळीज आठवतें कदाचित् काळजात ही शक्ति शिल्लक राहिली असेल तर असो

( ८ ) मन का बर पुढा तुझ्या निवासस्थानाकडे धाव घेत आहे ? कदाचित् आपलें हरवलेलं हृदय तिकडे सापडेल म्हणून असेल

( ९ ) प्रेमवेडात घर उध्वस्त होऊन वाळवंट नशीबीं आलें आम्ही घरालाच वाळवंट समजत होतों पण हें वाळवंट इतकें भयंकर निघालें कीं, त्यामुळें आमचं घर आम्हाला आठवूं लागलें

( १० ) लहानपणीं, हे असद, इतर मुलांप्रमाणें मी एका प्रेमवेड्यावर मारण्याकरिता दगड हातात घेतला पण एकाएकीं हा विचार आला कीं, पुढ मीही असाच वेडा झालो तर ! मुलें मलाही असेच दगड मारतील हा विचार येताच मी दगडफेक करणें सोडून दिलें

३५ . . . हुई ताख़ीर, तो कुछ बाइसे ताख़ीर भी था
आप आते थे, मगर कोई इनान्‌गीर भी था ॥ १ ॥
तुमसे बेजा है मुझे अपनी तबाही का गिला
इसमें कुछ शायबए ख़ूबिए तक़्दीर भी था ॥ २ ॥
तू मुझे भूल गया हो तो पता बतला दू
कभी फ़ितराक में तेरे कोई नख़्चीर भी था ॥ ३ ॥
क़ैद में थी तेरे वहशी को वही ज़ुल्फ की याद
हा कुछ इक रजे गिराबारिए ज़ंजीर भी था ॥ ४ ॥
बिजली इक कौन्द गई आखो के आगे तो क्या
बात करते के मैं लबू तशनए तक़रीर भी था ॥ ५ ॥
यूसुफ उसको कहू, और कुछ न कहे ख़ैर हुई
गर बिगड बैठे तो मैं लायक़े ताज़ीर भी था ॥ ६ ॥
देखकर ग़ैर को हो क्यों न कलेजा ठण्डा
नाला करता था वले, तालिबे तासीर भी था ॥ ७ ॥
पेशे मे ऐब नहीं रखिये न फ़रहाद को नाम
हम ही आशुफ्ता सरो मे वो जवा 'मीर' भी था ॥ ८ ॥

८३. . . .

हम थे मरने को खडे, पास न आया न सही
आख़िर उस शोख के तरकश में कोई तीर भी था ॥ ९ ॥
पकडे जाते हैं फिरिश्तो के लिखे पर नाहक
आदमी कोई हमारा दमे तहरीर भी था ॥ १० ॥
रेख़ती के तुम्ही उस्ताद नहीं हो 'गालिब'
कहते हैं अगले जमाने में कोई 'मीर' भी था ॥ ११ ॥

(१) प्रिये, तुला येण्यास उशीर झाला ह्या उशीराला तसेंच कारणही असलें पाहिजे कदाचित् माझ्या प्रतिस्पर्ध्यानं (रकीब) मध्ये थांबवून घेतलें असेल नाहींतर उशीर करण्याला कारण काय ?

(२) माझ्या नाशाचें कारण माझें नशीबच होय तू नव्हे पण माझ्या नाशाच गाऱ्हाणें मी तुझ्याजवळ विनाकारण करीत असतों

(३) तूं मला विसरली असशील तर हा बंध मी मागच्या गोष्टीची आठवण (पत्ता) देतों तू एकदा शिकार करून सावज आपल्या शिकारखान्यात धरून ठेविलें होतेस ना ? झालें, ती ओळख पटली ना ?

(४) तुझा प्रेमवेडा (मी) कैदेत आहे तेथें तुझा कुरळ्या केशकलापाची आठवण त्याला होते अर्थात् पायात बेड्या होत्या त्याचीही थोडी जाणीव होत होती पण तुझ्या केशकलापाच्या आठवणीसमोर बेड्याची जाणीव म्हणजे काहींच नव्हे

(५) तू एकाएकीं माझ्या समोर आलीस जणू काय वीज चमकून डोळे दिपून गेले पण स्वस्थपणें समोर येऊन दोन शब्द बोलली असतीस तर ? माझे कान तुझे शब्द ऐकण्यास तहानलेले होते

(६) यूसुफचें सौंदर्य पूर्ण सौंदर्याच्या अर्थानं वाङ्मयात निर्देशिलं जातें मी तिला यूसुफ म्हटलें. बरं झालें ती काहीं बोलली नाहीं यूसुफ गुलाम म्हणून ईजिप्तमध्यें विकला गेला होता आपल्याला हा गुलाम म्हणतो कीं काय असें समजून तिनं शिक्षा केली असती, तर तेंही योग्य झालं असतं पण तिच्या लक्षात तें आलें नाहीं ही खैर झाली

(७) माझा प्रतिस्पर्धी दीर्घ निश्वास सोडीत होता आणि आपल्या प्रयत्नाना फळ यावें असें इच्छीत होता त्याला काहीं यश आलें नाहीं त्याचे निष्फळ निश्वास पाहून मला फार बरें वाटलें

(८) फरहादला तो ध्यानं पाथरवट होता म्हणून नाव ठेवू नका शीरीनच्या प्रेमाकरिता त्यानं कालवा खणण्याचें प्रचंड काम केलें आम्हां प्रेमवेड्याच्या रांगेंतलाच तो एक वीर होता

(९) आम्ही मरणाला तयार होतों. ती कांहीं जवळ आली नाहीं. बरें, तें असो. पण दुरून आमचा वध करायला तिच्या भात्यांत शर नव्हते कीं काय ?

(१०) हा काय परमेश्वराच्या न्यायालयाचा प्रकार ! आम्हांला शिक्षा कशावरून तर चित्रगुप्तांनीं आमच्यासंबंधीं जें कांहीं लिहून ठेविलें असेल, त्यावरूनच. आरोपीला आपल्या बचावाकरितां मुभा तरी याची कीं नाहीं ?

(११) अरे गालिब, उर्दूमध्यें तूंच कांहीं उस्ताद (परिपूर्ण) नाहींस. मागल्या काळांत मीर पण होऊन गेला होता, असे ऐकतों म्हटलें. आपण उर्दूंत उस्ताद (गुरु) आहोंत आणि तेही मीरच्या बरोबरीचे हें ह्या ओळींत गालिबनें मोठ्या खुबीनें सूचित केलें आहे.

३६ . . . लबे खुश्क, दर तश्नगी मुर्दगां का
जियारत् कदा हूं दिल आज़ुर्दगां का ॥ १ ॥
हमा ना उमीदी हमा बदगुमानी
मैं दिल हूं फरेबे वफाख़ुर्दगां का ॥ २ ॥

(१) आकांक्षा अतृप्त राहून जे मेले, त्या सर्वांत मी श्रेष्ठ आहें. ज्यांचीं हृदयें भग्न झालीं आहेत, अशा प्रेमवेड्यांना तर मी पूजास्थान बनलों आहें.

(२) प्रेमांत विश्वासघात झाल्यामुळें मी म्हणजे मूर्तिमंत निराशा आणि दुःख बनलों आहें.

३७ . . . तू दोस्त किसी का भी सितमगर न हुआ था
औरों पे है वो ज़ुल्म के मुझपर न हुआ था ॥ १ ॥
छोड़ा महे नख़शब की तरह दस्ते कज़ा ने
ख़ुर्शीद हनूज़ उसके बराबर न हुआ था ॥ २ ॥
तौफीक बअन्दाज़ए हिम्मत है अज़ल से
आखों में है वो कतरा कि गौहर न हुआ था ॥ ३ ॥
जब तक के न देखा था कदे यार का आलम
मै मोतकिदे फितनए महशर न हुआ था ॥ ४ ॥
मैं सादादिल, आज़ुर्दगीये यार से खुश हूं
यानी सबके शौक मुकर्रर न हुआ था ॥ ५ ॥

दरियाए मआसी तुनुक आबी से हुआ खुश्क
मेरा सरे दामन भी अभी तर न हुआ था॥ ६ ॥

जारी थी 'असद्' दागे जिगर से मेरे तहसील
आतिशकदा, जागीरे समन्दर न हुआ था॥ ७॥

( १ ) हे जुलुमी प्रिये, तूं आजपर्यंत कोणालाही प्रिय म्हटलें नाहींस. माझ्या प्रतिस्पर्ध्यांनाही तूं तन्हेतन्हेनें छळलें आहेस, तितकें मला छळलें नाहींस हा भेद कां बरें? मला ह्या गोष्टीचा हेवा वाटतो.

( २ ) मागें इबने अता नांवाच्या शास्त्रज्ञानें कृत्रिम चंद्र तयार केला होता म्हणतात. त्याचा प्रकाश चार कोसपर्यंत पडत असे. दोन महिने चालू राहून हा कृत्रिम चंद्र तडकून नष्ट झाला. कवि म्हणतो, हे प्रिये, तुझ्या स्वरूपाची बरोबरी करण्याकरितां निसर्गानें सूर्याची घडण केली, पण कृत्रिम चंद्राप्रमाणेंच सूर्याची निर्मिति निष्प्रभ ठरली. सूर्य हा तुझी बरोबरी करूं शकत नाहीं.

( ३ ) आपला निर्धार ज्या प्रमाणांत दृढ त्याच प्रमाणांत योग्यता प्राप्त होते. हें पूर्वीपासूनच चालत आलें आहे. नाहींतर पाण्याच्या एका थेंबाचा निर्धार होता म्हणूनच त्याला डोळ्यांतील अश्रुबिंदु होण्याचें भाग्य लाभलें. तो बिंदु जर अल्पसंतुष्ट असता तर जास्तींत जास्त मोतीं बनून कोणाच्या तरी गळ्यांत जाऊन बसला असता. डोळ्यांतील अश्रूंचें स्थान त्याला लाभलें नसतें.

( ४ ) प्रियेचा उंच बांधा मी जोंपर्यंत पाहिला नव्हता तोंपर्यंत कल्पांताच्या प्रलयावर माझा विश्वास नव्हता. आतां मात्र तो प्रलय कसा असतो ह्याची मला कल्पना आली.

( ५ ) प्रिया मलूल असली तरी मला आनंद वाटतो. कारण मला पुन्हा आपलें प्रेम व्यक्त करून तिला रंजविण्याची संधि मिळते.

( ६ ) मी इतके अपराध केले आहेत कीं अपराधांचा समुद्र आतां कोरडा पडला आहे. तरी अजून अपराध करण्याची माझी इच्छा गेली नाहीं. समुद्र कोरडा पडला पण माझ्या इच्छांचा पदर कांहीं अजून भिजला नाहीं.

( ७ ) हे असद, माझी हृदयांतील जखम म्हणजे धगधगतें अग्निकुंडच. मी त्या अग्नीची आराधना अनेक दिवसांपासून करीत आहें. त्या वेळीं अजून त्यांतून अग्निकीटक ( समंदर ) उत्पन्न झाला नव्हता. समंदर नांवाचा किडा अग्नि बराच काळ धगधगत राहिला तर निर्माण होतो असा कविसंकेत आहे.

३८ . . . शब कि वो मजलिस फ़रोज़े खल्वते नामूस था
रिश्तए हर शमा, ख़ारे किस्वते फ़ानूस था ॥ १ ॥
मशहदे आशिक़ से कोसों तक जो उगती है हिना
किस क़दर यारब ! हलाके हसरते पाबोस था ॥ २ ॥
हासिले उल्फ़त न देखा जुज़ शिकस्ते आरज़ू
दिल बदिल पैवस्ता गोया यक लबे अफसोस था ॥ ३ ॥
क्या कहूं बीमारिए ग़म की फ़राग़त का बयान् !
जो के खाया खूनेदिल बेमिन्नते कैमूस था ॥ ४ ॥

(१) काल रात्रीं प्रियेची जेव्हां गुप्त मैफिल चालली होती, त्या वेळीं त्या मैफिलीतील दिवेसुद्धां संकोचानें अस्वस्थ झाले होते. जणू काय त्यांच्या वातीच त्यांच्या पायांत कांटे बनून त्यांना अस्वस्थ करीत होत्या.

(२) प्रियेच्या मेंदी लावलेल्या पायाचें चुंबन घेण्याची इच्छा तशीच अतृप्त ठेवून प्रेमिक मरून गेला. त्याची फेड म्हणूनच कीं काय प्रेमिकाच्या मृत्युस्थानाजवळ लांबलांबपर्यंत मेंहदीचे मळे फुलले आहेत. कदाचित् आतांतरी तेथील मेंहदी प्रिया आपल्या पायांना लावील आणि प्रेमिकाची अतृप्त आकांक्षा पुरी होण्याचा योग होईल.

(३) प्रेमाचें फळ म्हणजे आकांक्षाभंगच होय हें आम्हांला दिसून आलें. प्रेमिकांचीं हृदयें मिळालीं. त्यांचें रूपांतर हळहळणाऱ्या ओठांत झालें.

(४) प्रेमाच्या दुःखाची मजा काय वर्णावी ? मी गम (दुःख) खातों त्याचें रूपांतर तात्काळतोब रक्तांत होतें. त्याला पचनाची जरूर नाहीं.

३९ . . . आईना देख अपना सा मुंह लेके रह गए
साहब को दिल न देने पे कितना ग़ुरूर था ॥ १ ॥
क़ासिद को अपने हाथ से गर्दन न मारिए
उसकी खता नहीं है यह मेरा क़ुसूर था ॥ २ ॥

(१) प्रिया नेहमीं गर्वानें म्हणे कीं, मी कोणावरही प्रेम करणार नाहीं. पण आरशांतील स्वतःचें प्रतिबिंब पाहून त्यावर ती भाळली. अशा प्रकारें तिचें गर्वहरण झालें.

(२) हे प्रिये, माझा निरोप तुझ्याकडे घेऊन येणाऱ्याचा वध करूं नकोस. तुझ्याकडे त्याला पाठविण्यांत माझी चूक होती. ह्यांत त्याचा काय दोष ? तुझ्या हातून वधिलें जाण्याचा मान मला मिळू दे.

४० . . . अजे नियाजे इश्क के काबिल नहीं रहा
जिस दिल पे नाज था मुझे वो दिल नहीं रहा ॥ १ ॥
जाता हू दागे हसरते हस्ती लिये हुए
हू शम्ए कुश्ता दरखुरे महफिल नहीं रहा ॥ २ ॥
मरने की ऐ दिल और ही तदबीर कर के मैं
शायाने दस्तो बाजुए कातिल नहीं रहा ॥ ३ ॥
बरूये शश जहत दरे आईनाबाज है
या इम्तियाजे नाक़िसो कामिल नहीं रहा ॥ ४ ॥
वा कर दिये हैं शौक ने बन्दे नकाबे हुस्न
गैर अज निगाह अब कोई हायिल नहीं रहा ॥ ५ ॥
गो मैं रहा रहीने सितम हाए रोजगार
लेकिन तेरे खयाल से गाफिल नहीं रहा ॥ ६ ॥
दिल से हवाए किश्ते वफा मिट गई के वा
हासिल सिवाए हसरते हासिल नहीं रहा ॥ ७ ॥
बेदादे इश्क से नहीं डरता मगर 'असद'
जिस दिल पे नाज था मुझे वो दिल नहीं रहा ॥ ८ ॥

(१) प्रेमाचे भार वाहण्यास आता शक्ति राहिली नाहीं ज्या हृदयाबद्दल मला अभिमान वाटत असे तें हृदय आता माझ्यापाशीं राहिलें नाहीं

(२) जीवनाची हुरहुर घेऊन मी ह्या लोकातून जात आहें किंवा असें म्हणाना कीं हा विझलेला दिवा ह्या मैफिलीच्या योग्य राहिला नाहीं

(३) हे हृदया, आता मरणाची वेगळीच सोय पाहा प्रियेच्या हातून वधिले जाण्याची माझी आकांक्षा होती पण आता तिच्या हातून वध व्हावा ह्या योग्यतेचा मी राहिलों नाहीं

(४) काळ म्हणजे आयनेमहालच ह्यात शहाणे, मूर्ख सगळ्यांची मति गुंग झालेली दिसते आरशाच्या नजरेंत चांगलें वाईट हा भेद नाहींच सर्वांचेंच प्रतिबिंब त्यांत पडतें तसें ह्या काळाच्या आयनेमहालात सर्व सारखेच दिसतात कुणालाच निसर्गाचें गूढ उकललेलें दिसत नाहीं

( ५ ) माझ्या रसिकतेनें सौंदर्यावरचे सर्व बुरखे काढून टाकले आहेत. फक्त आमच्या दृष्टीचाच पडदा शिल्लक राहिला आहे. प्रियेचें सौंदर्य पाहाण्यास आमच्या दृष्टींत शक्ति राहिली नाहीं. हें हृदय जागृत झालें तर हें सौंदर्य पाहाण्याची शक्ति डोळ्यांना लाभेल एरव्हीं नाहीं.

( ६ ) जीवनात अनेक संकटें अंगावर येऊन पडलीं पण तुझ्यावरील माझ्या प्रेमाकडे मी कधींच दुर्लक्ष केलें नाहीं.

( ७ ) एकनिष्ठ राहाण्याची इच्छा हृदयातून नष्ट झाली आहे कारण त्यातून निष्फळ हुरहुरीशिवाय कशाचाच लाभ होत नाहीं.

( ८ ) प्रेमात जीं संकटें ओढवतात त्याची मला भीति नाहीं; पण हीं संकटें सहन करण्याची शक्ति आता माझ्या हृदयात राहिली नाहीं ज्याबद्दल मला अभिमान होता तें हृदय आता राहिलें नाहीं.

४१ . . . रश्क कहता है कि " उसका ग़ैर से इख़लास हैफ ! "
अक्ल कहती है, कि वो बेमेह्र किसका आश्ना ? ॥ १ ॥

जर्रा जर्रा सागरे मैख़ानए नेरग है
गर्दिशे मजनूं, बचश्मकहाए लैला आश्ना ॥ २ ॥

शौक है सामा तराज़े नाज़िशे अरबावे अजज़
जर्रा सहरा दस्तगाहो कतरा दरिया आश्ना ॥ ३ ॥

शिकवा सजे रश्के हम दीगर न रहना चाहिये
मेरा ज़ानू मूनिस और आईना तेरा आश्ना ॥ ४ ॥

मैं और इक आफत का टुकडा वह दिले वहशी कि है
आफियत का दुश्मन और आवारगी का आश्ना ॥ ५ ॥

रब्त यक शीराजए वहशत हैं अजजाये वहार
सब्ज़ा बेगाना, सबा आवारा, गुल ना आश्ना ॥ ६ ॥

कोहकन नक्काशे यक तिमसाले शीरीं था ' असद '
संग से सर मारकर होवे न पैदा आश्ना ॥ ७ ॥

(१) मी प्रियेला दुसऱ्यावर प्रेम करताना पाहातों तेव्हा मला हळहळ वाटते. पण पुन्हा असें वाटतें कीं, ही हळहळ व्यर्थच नाहीं का? कारण ती प्रिया कुणाशींही मैत्री करील हें संभवनीय नाहीं प्रेम करण्याचा तिचा स्वभावच दिसत नाहीं

(२) मजनूचें वेड हें लैलाच्या इशाऱ्याच्या आधीन होतें तद्वतच ह्या सृष्टीतील कणनकण काळाच्या मद्यशाळेंतील पेला आणि म्हणून मद्यशाळेच्या आधीन होय

(३) प्रेमिकाचें वैभव प्रेमच वाढवितें ह्या प्रेमामुळेंच लहानगा अणूला विशाल भूप्रदेशाची आणि लहानग्या बिंदूला सागराची योग्यता प्राप्त होते

(४) एक मी आहें आणि एक माझें हृदय हें हृदय असें विचित्र आहे कीं, ह्याला कधीं स्वस्थता नको आहे नेहमीं वेड घेण्याकडे ह्याचा कल ह्यामुळें माझ्यावर जीं संकटें येतील तीं थोडींच

(५) आपल्याला एक दुसऱ्याबद्दल गाऱ्हाणें करण्यास नको कारण निराशेन मी डोकें आपल्या मांडीवर टेकून बसलों आहें आणि तूं आपल्या मांडीवर आरसा ठेवून त्यात आपलें रूप न्याहळीत आहेस (उर्दू काव्यात आरशाला मांडीची उपमा देतात)

(६) वसंतऋतूचे वटक म्हणजे प्रेमवेडानें बहकलेले होत तोच त्याच्यामधला दुवा होय हिरवळ एकाकी, तर प्रभातकाळचा वायु मनसोक्त वागणारा आणि पुरें अनभिज्ञ, असा हा गोंधळ आहे

(७) हे असद, फरहाद काय खरा प्रेमिक होता? तो शीरीनचें चित्र काढणारा एक पाथरवट होता त्याचें प्रेम खरं असतें तर शीरीन त्याला मिळाली नसती का? नुसतें डोकें फोडून घेतल्यामुळें का कुठं प्रियेचा लाभ होतो?

४२ . . . जिक्र उस परीवश का और फिर बयान् अपना
बन गया रकीब आखिर था जो राज़ दा अपना ॥ १ ॥
मैं वो क्यों बहोत पीते बज्मे गैर में यारब
आज ही हुआ मंजूर उनको इम्तिहा अपना ॥ २ ॥
मंजर इक बलन्दी पर और हम बना सकते
अर्श से उधर होता काश के मकां अपना ॥ ३ ॥
दे वो जिस कदर जिल्लत हम हसी में टालेंगे
बारे आश्ना निकला उनका पासबा अपना ॥ ४ ॥
दर्दे दिल लिखूं कब तक? जाऊं उनको दिखलाऊं
उंगलिया फिगार अपनी, खामा खूंचका अपना ॥ ५ ॥

घिसते घिसते मिटही जाता आपने अबस बदला
नंगे सजदे से मेरे, संगे आस्तां अपना ॥ ६ ॥

ता करे न ग़म्माजी कर लिया है दुश्मन को
दोस्त की शिकायत में हमने हमज़बां अपना ॥ ७ ॥

हम कहां के दाना थे, किस हुनर में यक्ता थे
वे सबब हुआ 'गालिब' दुष्मन आस्मां अपना ॥ ८ ॥

(१) आधींच ती [प्रिया] अप्सरा आणि त्यांतून तिचें वर्णन करणारा मी. पण दुर्दैव माझें. ज्या मित्राला मी विश्वासांत घेऊन त्याच्यासमोर तिचें वर्णन केलें, तोच माझा प्रतिस्पर्धी बनला.

(२) परक्यांच्या मैफिलींत आज प्रिया मनसोक्त दारू पीत आहे. आपण किती पिऊं शकतों हें पाहायचें तिनें ठरविलें आहे. पण तिनें हें आजच करण्याचें कां ठरवावें? आणि तेंही परक्यांच्या मैफिलींत? माझ्या कां नको?

(३) आमचें घर ह्या वेळीं आकाशावर आहे. त्याच्यापलीकडे कांहीं नाहींच. आकाशाच्या पलीकडे आमचें घर असतें तर आम्ही तेथून आकाशाची फेरी मारली असती. कवीचा आशय असा कीं, आम्हांला आपल्या स्वत्वाची जाणीव नाहीं. आमच्यावर विस्मृतीचा पडदा पडला आहे.

(४) प्रियेच्या घराचा पहारेकरी तऱ्हेतऱ्हेनें आम्हांला छळतो. पण तो ओळखीचा असल्यामुळें त्याचा छळ ही थट्टामस्करी आहे असें मानून हसण्यावारी टाळणें आम्हांला सुलभ झालें आहे.

(५) माझ्या हृदयाची व्यथा काय आहे, हें लिहितां लिहितां माझ्या बोटांना जखम झाल्या आहेत आणि लेखणींतून रक्त गळूं लागलें आहे. आतां प्रियेपाशीं जाऊन तिला आपली हृदयव्यथा सांगावी हेंच योग्य आहे.

(६) तुझ्या उंबरठ्याच्या दगडावर मी माझें कपाळ टेकीत असें तो दगड तू कां बदलून टाकलास? माझ्यासारख्या उपऱ्यानें तुझ्या घरच्या उंबरठ्याच्या दगडावर डोकें टेकावें ह्याची तुला लाज वाटली होय? पण हें तू व्यर्थ केलेंस. अगे, झिजून झिजून तो दगडच कालांतरानें नाहींसा झाला असता.

(७) माझ्या प्रतिस्पर्ध्यानें प्रियेपाशीं माझी चुगली करूं नये म्हणून मीं त्याला आपला मित्र बनविलें आहे. आम्ही दोघेही प्रियेची गाऱ्हाणीं करीत असतों. आतां तो माझी चहाडी कशी करणार!

( ८ ) योग्य आणि बुद्धिमान माणसालाच जग छळतें. गालिब म्हणतो, आम्ही कुठले योग्य आणि बुद्धिमान् ? काल विनाकारण मला छळीत आहे. काल आपल्याला छळीत आहे, हें सागून गालिबनें आपण योग्य व बुद्धिमान् असल्याचें खुबीनें सुचविले आहे.

सुर्मए मुफ्ते नज़र हूं मेरी कीमत यह है
४३ . . . के रहे चश्मे खरीदार पे एहसान् मेरा ॥ १ ॥
रुख्सते नाला मुझे दे के मबादा ज़ालिम
तेरे चेहरे से हो ज़ाहिर ग़मे पिन्हा मेरा ॥ २ ॥

( १ ) मी डोळ्याला लावायचा सुर्मा आहे त्याची फक्त हीच किंमत कीं, विकत घेणाऱ्याच्या डोळ्यानीं माझें ऋण मानावें. दुसरा आशय हा कीं माझें काव्य अमूल्य आहे आणि अमूल्य असूनही सारेजण त्याचा आस्वाद घेऊं शकतात

( २ ) हे प्रिये, मला माझें दु ख अश्रूवाटें बाहेर काढण्याची परवानगी दे. असें न होवो कीं दु ख आतल्याआत राहिलें आणि त्याचा पश्चात्ताप तुला होऊन तुझ्या चेहेऱ्यावरून लोकाना माझं दु ख समजून येईल ( माझ्या प्रेमाचें रहस्य बाहेर पडेल )

ग़ाफ़िल, बवहमे नाज़ ख़ुद आरा है वर्ना या
४४ . . . बे शानए सबा नहीं तुर्रा गयाह का ॥ १ ॥
बज़्मे कदह से ऐशे तमन्ना न रख के रंग
सैदे ज़दाम जस्ता है इस दामगाह का ॥ २ ॥
रहमत अगर कबूल करे क्या बईद है
शर्मिन्दगी से उज़्र न करना गुनाह का ॥ ३ ॥
मक़तल को किस निशात से जातां हू मै, के है
पुर गुल ख़याले ज़ख्म से दामन निगाह का ॥ ४ ॥
जादर हवाए एक निगहे गर्म है असद
परवाना है वकील, तेरे दाद ख्वाह का ॥ ५ ॥

( १ ) मूर्ख मानव समजत असतो कीं, त्याच्या हातून घडणारें प्रत्येक चागलें कृत्य त्याच्या अक्कलहुशारीचें आणि बुद्धिमत्तेचें फळ आहे पण वास्तविक पाहाता एक पान जरी हलायचें असलें तरी त्याला निसर्गाचें ( परमेश्वराचें ) साहाय्य लागतें

( २ ) मैफिलीतून ( जीवनातून ) आपल्याला सुखें भोगायला मिळतील असें समजू नकोस. अरे, तें सावज कधींचेंच जाळ्यातून निसटून गेलें आहे.

(३) मी माझ्या अपराधामुळें अगदीं शरमिंधा झालों आहें. गुन्हे केले म्हणून सांगण्याचीही लाज वाटते. माझी ही स्थिति पाहून परमेश्वर मला क्षमा करील तर आपला गुन्हा कबूल करणे मला कठीण नाहीं.

(४) वळी जाण्याकरिता मी वधस्थानाकडे किती आनंदानें चाललों पाहा माझ्या दृष्टीच्या पदरांत माझ्या जखमाच्या विचाराचीं फुलें खच्चून भरलीं आहेत

(५) हे प्रिये, हा असद (गालिब) तुझ्या प्रेममय दृष्टीची इच्छा करीत आहे. त्याची वकिली वघ दिव्याच्या एका पेटत्या नजरेंत भस्म होऊं इच्छिणारा पतंगच करीत नाहीं का?

✓ ४५ . . . जोरे से वाज आये पर, वाज आये क्या
कहते हैं 'हम तुमको मुह दिखलायें क्या ॥ १ ॥
रात दिन गर्दिश में हैं सात आस्मां
हो रहेगा कुछ न कुछ, घबराये क्या ॥ २ ॥
लाग हो तो उसको हम समझे लगाव
जब न हो कुछ भी तो धोका खायें क्या ॥ ३ ॥
हो लिये क्यौं नामावर के साथ साथ
यारब ! अपने खत को हम पहुंचायें क्या ॥ ४ ॥
मौजे खून् सर से गुजर ही क्यौं न जाय
आस्तानें यार से उठ जाये क्या ॥ ५ ॥
उम्र भर देखा किये मरने की राह
मर गये पर, देखिए दिखालायें क्या ॥ ६ ॥
पूछते हैं वह के 'गालिब' कौन है
कोई बतलाओ के हम बतलायें क्या ॥ ७ ॥

(१) प्रियेला वाटते कीं, तिने मला फार छळलें आणि म्हणून तुला काय तोंड दाखवूं असें ती म्हणत आहे. आता हा सुद्धा छळ नाहीं का मग मी तुला आता छळणार नाहीं हें म्हणण्यात काय अर्थ आहे ?

(२) अरे, काळाचे चक्र सारखें फिरत असतें मग आज वाईट दिवस आले म्हणून घावरायचें काय ? पुन्हा हें चक्र पालटेलच कीं।

( ३ ) बाहेरून चीड असेल तर आम्ही त्याला अंतरीचें प्रेम समजू. नाहींतर व्यर्थ भ्रमात राहाण्यात काय अर्थ आहे ?

( ४ ) प्रियेला हें पत्र नेऊन दे म्हणून आम्ही तें निरोप्याच्या हवाली केलें पण आमची घाई इतकी कीं, आम्ही त्याच्या ( निरोप्याच्या ) बरोबरच चालूं लागलों मग तें पत्र आम्हींच नेऊन दिलें तर काय बिघडलें ?

( ५ ) आमचा वध झाला तरी चालेल पण आम्ही प्रियेच्या घरच्या उंबरठ्यापासून हलणार नाहीं

( ६ ) जीवनभर आम्हीं मरणाची वाट पाहिली आता मरून गेलों आहोंत बघाव आता परमेश्वर आम्हाला शांति देतो कीं आणखी दुःखात लोटून देतो ?

( ७ ) सगळं आयुष्य तिच्यावर प्रेम करण्यात घालविलें आता ती विचारते कीं, हा गालिब कोण आहे ? तुम्हींच सांगा कीं आता ह्यावर काय बोलावं ?

४६ . . . लताफ़त बे कसाफ़त जल्वा पैदा कर नहीं सकती
चमन जंगार है आईनए बादे बहारी का ॥ १ ॥
हरीफे जोशिशे दरिया नहीं खुद्दारिए साहिल
जहा साक़ी हो तो बातिल है दावा होशयारी का ॥ २ ॥

( १ ) कोणतीही तरल कल्पना व्यक्त व्हायला भौतिक हें हवच वसंतऋतूत्या वाराच घ्या फुललेली बाग म्हणजे त्या वसंतवाताच्या आरशाची धातूमिश्र चौकट नव्हे काय ?

( २ ) नदीचा काठ स्वतःला वाचविण्याचा कितीही प्रयत्न करो पण नदीला पूर आला तर काठाला वाचणें कसें शक्य आहे ? तद्वतच जेथें तूं साकी [ मदिरा पाजणारा ] आहेस तेथें आमची बुद्धि शाबूत राहील हें म्हणणें खोटं आहे

४७ . . . इशरते कतरा है दरिया में फना हो जाना
दर्द का हद से गुजरना है दवा हो जाना ॥ १ ॥
तुझसे, किस्मत मे मेरी, सूरते कुफ्ले अब्जद
था लिखा बात के बनते ही जुदा हो जाना ॥ २ ॥
दिल हुआ कशमकशे चारए जहमत मे तमाम
मिट गया घिसने में इस उक्दे का वा हो जाना ॥ ३ ॥
अब जफा से भी हैं महरूम हम अल्ला अल्ला !
इस कदर दुश्मने अरबाबे वफा हो जाना ॥ ४ ॥

जोफ़ से गिरिया मुबद्दिल व दमे सर्द हुआ
बावर आया हमें पानी का हवा हो जाना ॥ ५ ॥
दिल से मिटना तेरी अगुश्ते हिनाई का खयाल
हो गया, गोश्त से नाखुन का जुदा हो जाना ॥ ६ ॥
है मुझे अब्रे बहारी का बरस कर खुल्ना
रोते रोते गमे फुर्कत मे फना हो जाना ॥ ७ ॥
गर नहीं नकहते गुल को तेरे कूचे की हवस
क्यो है, गर्दे रहे जौलाने सबा हो जाना ॥ ८ ॥
ताकि, तुझपर खुले एजाजे हवाए सैक़ल
देख बरसात में सब्ज आईने का हो जाना ॥ ९ ॥
बख्शे है जल्वए गुल जौक़े तमाशा 'गालिब'
चश्म को चाहिये हर रग में वा हो जाना ॥ १० ॥

(१) जलबिंदूचें सर्वोच्च वैभव म्हणजे समुद्रात मिसळून नाहींसे होणें हेंच आहे तद्वतच माझीं दु खें इतकीं वाढलीं आहेत कीं, त्यामुळें मरण येऊन मी परमेश्वरात विलीन *झालों म्हणजे आजार हद्दीच्या बाहेर जाऊन स्वत च औषध बनल्यासारखें नाहीं का झालें ?*

(२) हे प्रिये, माझें नशीब म्हणजे अक्षरें जुळलीं कीं उघडणारें कुलूप होय तुझें माझें मीलन जुळत आलें होतें पण जुळण्याचा रंग दिसू लागताच अक्षरं जुळून कुलूप जसें मोकळें (वेगळें) होतें तसेंच आपल्यालाही वेगळें व्हावें लागलें

(३) माझें हृदय प्रेमाच्या धडपडींतच नष्ट झाल ही निरगाठ सोडविण्यातच दोरी झिजून नाहींशी झाली

(४) आता ती आमचा छळसुद्धा करीत नाहीं म्हणजे आमच्याकडे छळून का होईना लक्ष देणें तिनें सोडून दिलें आहे अरेरे, प्रेमनिष्ठ लोकाची काय ही दुरवस्था!

(५) पाण्याचें वायूत रूपातर होऊं शकतें हें आम्हाला पटत नव्हतें पण आता खात्री पटली कारण पूर्वी आम्ही अश्रू ढाळीत होतों आता अशक्ततेमुळें फक्त निश्वासच *सोडूं शकतों म्हणजे आमच्यातील अश्रूंच रूपातर वायूत नाहीं का झाल ?*

(६) माझ्या हृदयातून तुझ्या मेहंदी लावलेल्या बोटाची आठवण निघणें दुष्कर आहे नख आणि त्याला चिकटलेलें मास हें वेगळें करण्याइतकेंच तें दुष्कर आहे (गोश्तसे नाखुन का जुदा होना) हा उर्दूंत वाक्संप्रदाय आहे

९५. . . .

(७) विरहात रडतरडत नष्ट होणें आभाळ फुटून पाऊस पडण्याइतकेंच मला मुश्रर आहे

(८) फुलाच्या सुगंधाला जर हे प्रिये, तुझ्या परिसरात येण्याची इच्छा नाहीं तर तो प्रभातकालीन वायूंत समाविष्ट होण्याची इच्छा का बाळगीत आहे ?

(९) तुझ्या बागेची लोखंडी चौकट [फ्रेम] पावसाळ्यात गंजून हिरवी झाली आहे हरितरंग म्हणजे बहर येण्याचा संकेत आहे तुझ्याकडे पाहून त्या चौकटीच्या आकांक्षा तर बहरून आल्या नसतील ना ?

(१०) हे गालिब, मनुष्यानें निसर्गाचं निरीक्षण करीत राहावें म्हणजे त्याची रसिकता प्रगल्भ होते दुसरा अर्थ असा कीं, जीवनाच्या प्रत्येक पैलूचा अनुभव घेतला पाहिजे म्हणजे जीवनाच्या मागील सत्याकडे पाहाण्याची दृष्टि येईल

४८ . . . फिर हुआ वक्त कि हो बाल कुशा मौजे शराब
दे बते मै को दिले दोस्त शना मौजे शराब ॥ १ ॥
पूछ मत वजहे सियह मस्तिए अरबाबे चमन
सायए ताक़ में होती हे हवा मौजे शराब ॥ २ ॥
जो हुआ ग़र्क़ए मै बख्ते रसा रखता है
सर से गुजरे पे भी है बाले हुमा मौजे शराब ॥ ३ ॥
है यह बरसात वो मौसम के अजब क्या है अगर
मौजे हस्ती को करे फ़ैज़े हवा मौजे शराब ॥ ४ ॥
चार मौज उठनी है तूफ़ाने तरब से हरसू
मौजे गुल, मौजे शफ़क़, मौजे सबा, मौजे शराब ॥ ५ ॥
जिस कदर रूह बनाती है जिगर तशनए नाज़
दे हैं तस्कीन ब दमे आबे बका मौजे शराब ॥ ६ ॥
बस्के दोडे है रगे ताक़ में खू हो हो कर
शहपरे रग से है बाल कुशा मौजे शराब ॥ ७ ॥
मौजए गुल से चिरागा है गुज़र गाहे ख़याल
है तसव्वुर में जबस जल्वानुमा मौजे शराब ॥ ८ ॥
नशे के पर्दे मे है महवे तमाशाए दिमाग
बस्के रखती है सरे नशो नुमा मौजे शराब ॥ ९ ॥

एक आलम पे हैं तूफ़ानिए कैफ़ीयते फ़स्ल
मौजए सब्जए नौखेज से ता मौजे शराब ॥ १० ॥

शरहे हंगामए हस्ती है जहे मौसमे गुल
रहबरे कतरा बदरिया है खुशा मौजे शराब ॥ ११ ॥

होश उडते हैं मेरे जल्वए गुल देख 'असद'
फिर हुआ वक्त के हो बालकुशा मौजे शराब ॥ १२ ॥

( १ ) पुन्हा योग्य वेळ आली आहे. मधुलहरींना जणू पंख फुटले आहेत. आतां बदकांना ( बदकाच्या आकाराची मदिरेची सुरई ) ह्या मधुलहरींनी पोहण्याची शक्ति द्यावी. अर्थात् मैफिलींतून आतां हीं मधुपात्रें सारखीं फिरत राहावीं.

( २ ) अरे, बागेंतील फुलवेली इतक्या बेहोश कां झाल्या आहेत? ह्यांत आश्चर्य तें काय? तो पाहा वारा. द्राक्षाच्या वेलीकडून बागेंत आला त्यामुळें द्राक्षासवाचा ( मधुलहरींचा ) गंध त्यांत मिसळला. त्या वायूच्या सेवनानें ह्या फुलवेली बेहोश झाल्या आहेत.

( ३ ) जो मदिरेंत बुडून गेला तो खरोखरच भाग्यवान् होय. फार काय, त्याच्या डोक्यावरून मधुलहरी जाऊं लागल्या तर त्या शुभसूचक आणि भाग्यनिदर्शक असा हुमा पक्षी समजावा.

( ४ ) हा वर्षाऋतु ( वर्षर्तु ) आहे. ह्या ऋतूंत जीवन हें अक्षरशः मधुलहरींमध्ये रूपांतरित होईल ह्यांत काय आश्चर्य?

( ५ ) तुफान रसिकतेमुळें चार प्रकारच्या लहरी निर्माण झाल्याचा प्रत्यय येतो. फुलांच्या लहरी ( फुलांचा खच ); संध्याराग ( आकाशांत सूर्यास्तसमयीं पसरणाऱ्या रंगलहरी ), सुगंध वायूच्या लहरी आणि मधुलहरी. म्हणजे जिकडेतिकडे आनंदीआनंद आहे. बागेंत फुलांचा सडा पडला आहे. आकाशांत संध्यारागाची शोभा अवर्णनीय आहे. मंद आणि सुगंधी वायूनें चित्ताल्हाद होत आहे. आणि मदिरेचे पेल्यावर पेले रिकामे होत आहेत.

( ६ ) रसिकतेला उसळून बाहेर यावेसें वाटतें. त्याच प्रमाणांत मदिरेचे घोट रसिकतेला अमृताचा साक्षात्कार करून देतात.

( ७ ) मधुलहरी द्राक्षाच्या नसांनसांतून जीवनरस बनून [ उडत ] वाहात आहेत *आणि द्राक्षांच्या पानांतून नवीन रंग धारण करून दृग्गोचर होताहेत.*

( ८ ) माझ्या हृदयांत मधुलहरी दौडत आहेत. ही लाल मधु लाल गुलाबासारखी असल्यामुळें अनेक मधुलहरी म्हणजे लाल गुलाबांचा खचच. ह्या ताबड्या रंगामुळें माझ्या हृदयांत लाल दिव्याची आरासच झाल्यासारखी भासते.

( ९ ) ह्या मधुलहरी माझ्या मेंदूपर्यंत जाऊन भिडल्या आहेत त्यांनीं मला वेढोप केलें आहे जणू नशेच्या पडद्यामागून त्या माझ्या बुद्धीच निरीक्षण करीत आहत

( १० ) जगात प्रत्येक गोष्टीला बहर आला आहे अगदीं हिरव्या तृणापासून मधुलहरीपर्यंत

( ११ ) हा अल्पकाळ टिकणारा वसतऋतु म्हणजे आपल्या क्षणभंगुर जीवनावरच भाष्यच होय मधुलहरी तरी काय अजब आहेत पाहा क्षणिक वसतऋतूनें जशी आपल्याला जीवनाची ओळख होते तशीच मदिरेच्या एका थेंबात मनुष्याला समाधीच्या अवस्थेंत नेऊन पोंहोंचविण्याची शक्ति आहे

( १२ ) हे असद, फलफुलाना बहर आलेला पाहून माझें देहभान हरपत आहे आता मधुलहरींना पंख फुटून फिरण्याची पुन्हा वेळ आली आहे

४९ . . . अफसोस के दीदा का किया रिज्क फल्क ने
जिन लोगो के थे दरखुरे अक्दे गुहर अगुश्त ॥ १ ॥
काफी है निशानी तेरे छल्ले का न देना
खाली मुझे दिखलाके बवक्ते सफर अगुश्त ॥ २ ॥
लिखता हू ' असद ' सोजिशे दिल से सुखनेगर्म
ता रख न सके कोई मेरे हर्फ पे अगुश्त ॥ ३ ॥

( १ ) अरेरे ! काळाचा तडाखा पाहा ज्यांचीं नाजुक बोटें म्हणजे मोत्याच्या अगठ्याना योग्य होत, तीं आज किड्याच भक्ष्यस्थान बनलीं आहेत

( २ ) प्रवासाला निघताना तू आठवणाची आगठी द्यायला हवी होतीस ती दिली नाहींस करगुळी दाखवून आगठी नाहीं म्हणालीस हरकत नाही नखऱ्यान तू नुसती करगुळी जी मला दाखविलीस तीच आठवण मला पुरेशी आहे

( ३ ) अतरींच्या तळमळीनच मी माझ जिवंत काव्य लिहीत आहें म्हणजे कोणी माझ्या शब्दावर बोट ठेवायला नको [ नीरस म्हणून टीका करायला नको ]

५० . . . रहा गर कोई ता कियामत सलामत
फिर इक रोज मरना है हजरत सलामत ॥ १ ॥
जिगर को मेरे इश्के खूनाबा मशरब
लिखे है खुदावदे नेमत सलामत ॥ २ ॥
अलज्जोम दुश्मन शहीदे वफा हू
मुबारक मुबारक सलामत सलामत ॥ ३ ॥

नहीं गर सर्व वर्गे इदराके मानी
तमाशाए नैरंगे सूरत सलामत ॥ ४ ॥
मुन्द गईं खोल्ते ही खोल्ते आखें "गालिब"
यार लाये मेरे बालीन् पे उसे, पर, किस वक्त ! ॥ ५ ॥

( १ ) कल्पातपर्यंतच आयुष्य कुणाला मिळाल तरी त्यालासुद्धा मरण येणें प्राप्त आहे.

( २ ) प्रेमाचं अन्न म्हणजे माझ्या हृदयाचें रक्तच मग प्रेमाला हृदयाबद्दल प्रेम आणि आदर का वाटणार नाहीं ?

( ३ ) वाहवा ! मी किती धन्य आहे ? निष्ठेला आणि प्रेमाला माझे प्रतिस्पर्धी बळी गेले; नाहींत तो मान मला मिळाला

( ४ ) निसर्गाचें रहस्य जाणण्याची शक्ति नसेल, तर नसो निसर्गाचें प्रत्यक्ष स्वरूप निरीक्षण करण्यास मिळालें तरी पुरे

( ५ ) प्रियेची वाट मीं शेवटच्या घटकेपर्यंत पाहिली माझ्या मित्रांनीं शेवटीं तिला माझ्या उशागीं आणिली तिला पाहण्याकरिता मी कसेबसे डोळे उघडले न उघडले तोंच ते कायमचेच मिटले अरेरे ! मित्रांनीं कोणत्या अवेळीं तिला माझ्याकडे आणिली !

आमदे खत से हुआ है सर्द जो बाजारे दोस्त
५१ . . . दूदे शम्ए कुश्ता था शायद खते रुख़सारे दोस्त ॥ १ ॥
ऐ दिले ना आकिबतअन्देश जब्ते शौक़ कर
कौन ला सकता है ताबे जल्वए दीदारे दोस्त ॥ २ ॥
खाना वीरा साज़िए हैरत तमाशा कीजिये
सूरते नक्शे कदम हूं रुफ्तए रफ्तारे दोस्त ॥ ३ ॥
इश्क में बेदाद रश्के गैर ने मारा मुझे
कुश्तए दुश्मन हूं आख़िर गरचे था बीमारे दोस्त ॥ ४ ॥
चश्मे मा रौशन के उस बेदर्द का दिल शाद है
दीदए पुरखूं हमारा सागरे सरशारे दोस्त ॥ ५ ॥
गैर यौं करता है मेरी पुरसिश उसके हिज्र में
बेतकल्लुफ दोस्त हो जैसे कोई गमख्वारे दोस्त ॥ ६ ॥
ताकि मैं जानू के है उसकी रसाई वा तलक
मुझको देता है पयामे वादए दीदारे दोस्त ॥ ७ ॥

जबके मैं करता हूं अपना शिकवए ज़ोफ़ दिमाग़
सर करे है वो हदीसे ज़ुल्फ़े अम्बरे यार दोस्त ॥ ८ ॥
चुपके चुपके मुझको रोते देख पाता है अगर
हंस के करता है बयाने शोख़िए गुफ्तारे दोस्त ॥ ९ ॥
मेहरबानी हाये दुश्मन की शिकायत कीजिये
या बयां कीजे सिपासे लज़्ज़ते आज़ारे दोस्त ॥ १० ॥
यह गजल अपनी मुझे जी से पसन्द आती है आप
है रदीफ़े शेर में 'ग़ालिब', जबस् तकरारे दोस्त ॥ ११ ॥

( १ ) प्रियेच्या ओठावर लव दिसूं लागली आहे. त्यामुळें प्रेमिकांची पांगापांग झाली आहे. म्हणजे ही लव म्हणजे तिच्या आत विझलेल्या दिव्याचा काळा धूर तर नव्हे.

( २ ) अरे मूढ हृदया, आपल्या आसक्तीला आवर घर. अरे, प्रियेचें सौंदर्यतेज झेलण्यास कोण समर्थ आहे ?

( ३ ) पाहा, पाहा. प्रेमवेडानें माझें घर कसें उध्वस्त करून टाकलें तें. प्रियेच्या हंसगतीकडे पाहून मी मोहित झालों. पथिकाचीं पदचिन्हें जशीं उमटतात आणि पुन्हा पुसलीं जातात तसा मी प्रभावितही झालों आणि पुसलाही गेलों. ( उध्वस्त झालों. )

( ४ ) मी प्रेमपीडित होतों. त्या पीडेनें मरण यावें कीं नाहीं ? पण हाय ! माझें दुर्दैव ! मी प्रतिस्पर्ध्यांच्या मत्सरांत आणि हेव्यात हत झालों.

( ५ ) आज त्या कठोर प्रियेला काय आनंद होत आहे ? हें पाहून आम्ही धन्य झालों. कारण आमचे रक्तानें भरलेले डोळे पाहून तिला वाटतें कीं हे डोळे नव्हेत. कांठोकांठ भरलेले लाल वारुणीचे पेलेच होत.

( ६ ) मी प्रियेच्या विरहानें पीडित आणि माझा प्रतिस्पर्धी माझी चौकशी करण्यास निघाला आहे. जणू काय एक जीवश्चकंठश्च मित्रच दुसऱ्याशीं सहानुभूति दाखवीत आहे.

( ७ ) ह्यात हेतु काय तर की आपली पोंहोच प्रियेपर्यंत आहे हें दाखविणें. वर मला म्हणतो काय कीं चल, मी तुला प्रियेचें दर्शन घडवितों.

( ८ ) तो माझा पाठलाग सोडीत नाहीं. तुझें बोलणें ऐकण्याची मला शक्ति नाहीं. बोलणें आटोपतें घे म्हटले कीं तो खट्याळपणानें प्रियेच्या सुगंधी केशकलापांचें वर्णन करूं लागतो. अशक्तावस्थेंत मेंदूला सुगंध कुठला आवडायला. पण प्रियेच्या केशकलापाचा सुगंध ना ? मला गप्प बसावें लागतें. कारण, तो सुगंध कुणाला आवडणार नाहीं ?

( ९ ) मला रडताना पाहून माझा प्रतिस्पर्धी मुद्दाम प्रियेच्या नखरेल बोलण्याचा विषय काढतो. पण त्यानें आनंद होण्याच्या ऐवजीं मी आतल्याआत कुढतों मात्र.

(१०) अशा स्थितीत मी काय करावे? मित्राचे गान्हाणें गावे का त्याला माझ्या प्रियेचें प्रेम लाभल म्हणून धन्य समजावे?

(११) गालिब, आपल्याला ही गजल फार आवडली कारण ह्यातील प्रत्येक ओळीच्या शेवटीं दोस्त (प्रिया) हा शब्द आला आहे. आणि हा दोस्त (प्रिया) तर मला फार प्रिय आहे

५२... गुलशन में बंदोबस्त बरगे दिगर है आज
कुमरी का तौक़ हल्क़ाए बेरूने दर है आज ॥ १ ॥
आता है एक पारए दिल हर फुगा के साथ
तारे नफस कमन्दे शिकारे असर है आज ॥ २ ॥
ऐ आफियत किनारा कर ऐ इन्तिज़ाम चल
सैलावे गिरिया दरपए दीवारो दर है आज ॥ ३ ॥

(१) आज बागेमध्ये औरच रंग दिसतो प्रिया बागेत येणार म्हणून कुणालाच आत जाण्याची परवानगी नाहीं कुमरी (बुलबुल) पक्षालाही बाहेर ठेवण्यात आले आहे

(२) माझ्या प्रत्येक निश्वासावरोवर हृदयाचा एक तुकडा आज बाहेर निघत आहे कदाचित् आज माझ्या निश्वासाना प्रभाव लाभला आहे

(३) हे स्वस्थते, हे सुव्यवस्थे, तुम्ही आता घर सोडून चालायला लागा पाहू कारण माझ्या अश्रुपुरानीं आज माझं घरदार वाहून जाणार आहे

५३... नफस न अंजुमने आरज़ू से बाहर खेंच
अगर शराब नहीं इन्तिज़ारे सागर खेंच ॥ १ ॥
कमाले गर्मिए सईए तलाशे दीद न पूछ
बरगे खार मिरे आईने से जोहर खेंच ॥ २ ॥
तुझे बहानए राहत हैं, इन्तिज़ार ऐ दिल
किया हैं किसने इशारा के तारे बिस्तर खेंच ॥ ३ ॥
तेरी तरफ़ हैं बहसरत, नज़ारए नर्गिस
बकोरिए दिलो चश्मे रकीब सागर खेंच ॥ ४ ॥
बनीम गमज़ा अदा कर हके वदीअते नाज
नयामे पर्दए ज़ख्मे जिगर से खंज़र खेंच ॥ ५ ॥
मेरे कदह मे है सहबाए आतिशे पिन्हा
बरूए सफरा, कबाबे दिले समन्दर खेंच ॥ ६ ॥

(१) कोणत्याही परिस्थितींत इच्छा करणें सोडूं नकोस. इच्छेच्या मैफिलींतून निघू नकोस मदिरा मिळत नसेल तर साकीची तरी प्रतीक्षा कर. साराश, इच्छेचा त्याग करणें बरें नव्हे

(२) प्रियेच्या दर्शनाकरिता मीं इतकी धडपड केली कीं, विचारता सोय नाहीं माझ्या दृष्टिरूपी आरशात तुम्हाला काचेचे तुकडे दिसणार नाहींत. काटे दिसतील

(३) हे हृदया, शय्येवर प्रियेची प्रतिक्षा करीत पडून राहाणें निरर्थक आहे. तुला आराम आणि चैन हवीं आहेत म्हणून तू शय्येची आराधना करीत आहेस तुला प्रियेचा लाभ हवा असेल तर हीं सुखें सोडून दे.

(४) हे प्रिये, नरगिसचे फूल (डोळ्याना नरगिसच्या फुलाची उपमा देतात) तुझ्याकडे हेव्याने पाहात आहे, म्हणून का तू सकोचाने मदिरेचे सेवन करीत नाहींस पण तसें करण्याचे कारण नाहीं नर्गिसला काय डोळे आहेत तिन पाहायला? तू नि सकोचपणें पी

(५) हे प्रिये, मी तुझा नाज (विभ्रम, नखरा) रूपी खंजीर हृदयात जखमेत बाळगला आहे ती वस्तु तुला परत हवी असेल तर मोकदला म्हणून माझ्याकडे पुन्हा अर्धोन्मीलित कटाक्ष फेंक बरे।

(६) माझ्या पेल्यात प्रेमाग्नीची मदिरा आहे. जर प्यायला अग्नि आहे तर त्यावरोबर खाण्याकरिता मला समंदरच हवा

समदर (अग्निकीट) नावाचा किडा धगधगत्या अग्नींत निर्माण होतो असा समजूत आहे.

५४ . . . हुस्न गम्जे की कशाकश से छुटा मेरे बाद
वारे आराम से हैं अहले जफा मेरे बाद ॥ १ ॥
मन्सबे शेफ्तगी के कोई काबिल न रहा
हुई माजूलिए अन्दाजो अदा मेरे बाद ॥ २ ॥
शम्अ बुझती है तो उसमें से धुवा उठता है
शोलए इश्क सियह पोश हुआ मेरे बाद ॥ ३ ॥
खू है दिल खाक में अहवाले बुता पर यानी
उनके नाखुन हुए मोहताजे हिना मेरे बाद ॥ ४ ॥
दरखुरे अर्ज नहीं, जौहरे बेदाद को, जा
निगहे नाज है सुरमे से खफा मेरे बाद ॥ ५ ॥
है जुनू, अहले जुनू के लिये आगोशे विदा
चाक होता है गरेबा से जुदा मेरे बाद ॥ ६ ॥

कौन होता है हरीफे मए मर्द अफगने इश्क़
है मुकर्रर लबे साक़ी पे सला मेरे बाद ॥ ७ ॥
ग़म से मरता हूं के इतना नहीं दुनिया में कोई
के करे ताजियते मेहरो वफा मेरे बाद ॥ ८ ॥
आये है बेकसीए इश्क़ पे रोना 'ग़ालिब'
किसके घर जायगा सैलाबे बला मेरे बाद ॥ ९ ॥

(१) माझ्या मृत्युमुळें सौंदर्याच्या मागची कटकट नाहींशी झाली. माझा छळ करणारी प्रिया आता आपल्या मागची पीडा गेली म्हणून आरामात आहे.

(२) माझ्यानंतर खरा प्रेमिक राहिला नाहीं. आणि त्यामुळे प्रेयसींचे विभ्रम, नाच, नखरे इत्यादींनाही खंड पडला.

(३) *दिवा विझताना त्यातून धूर निघतो त्याप्रमाणे माझ्या मृत्यूनंतर प्रीतीच्या दिव्याला [ विझल्यामुळें ] धुरामुळें कृष्णवस्त्रें नशिबीं आलीं.*

(४) अरेरे मी मेल्यानंतर माझ्या प्रियेची केविलवाणी स्थिति पाहून हृदयाचें पाणी पाणी झाले आहे. मी जीवंत होतों तोपर्यंत माझी प्रिया माझ्या हृद्रक्तामध्ये आपलीं नखें रंगवून घेत असे. आता तो नखराग तिला कोठून लाभावा? तिला आता मेहंदी लावायची वेळ आली आहे.

(५) मी जीवंत होतों तोंपयन प्रियेचें लक्ष, दुर्लक्ष ह्या दोन्हींची ना जबरदारी साभाळीत होतों. माझ्यानतर हें अशक्य झाले म्हणून की काय प्रियेनें डोळ्यात काजळ घालणें सोडून दिले आहे.

(६) *मीच एक प्रेमवेडा होतों आणि वेडाच्या भरांत आपले कपडे फाडून टाकीत* असें. माझ्यानंतर ही वेडाची रीत राहिली नाहीं. वेडानें प्रेमिकाचा शेवटचा निरोप घेतला आहे आणि कपडे चिरफाडीपासून अलिप्त झाले आहेत.

(७) प्रेममदिरा पिणारा कोणी प्रेमवीर आता राहिला आहे का? असें [ प्रिया ] साकी [ माझ्या मृत्यूनंतर ] पुन्हा पुन्हा विचारीत आहे.

(८) माझ्यानतर प्रेमनिष्ठा इत्यादींबद्दल हळहळ करणारा कोणी राहाणार नाहीं. ह्या दु:खानेंच मी मरून चाललो आहें.

(९) प्रेमभावाला आता वाईट दिवस आले (माझ्या मृत्यूमुळें) ह्याची हळहळ वाटते. बघावे आता माझ्यानतर ह्या प्रेमभावनेचा पूर कुठें वाहूं लागतो तें.

५५... बला से हैं, जो ये पेशे नजर दरोदीवार
निगाहे शौक़ को हैं, बालो पर दरो दीवार ॥ १ ॥
वफ़रे अश्क ने काशाने का किया यह रंग
के हो गये मेरे दीवारो दर, दरो दीवार ॥ २ ॥
नहीं है साया कि सुनकर नवीदे मक़दमे यार
गये हैं चन्द क़दम पेश्तर दरो दीवार ॥ ३ ॥
हुई है किस क़दर अरज़ानीये मये जल्वा
के मस्त हैं तेरे कूचे में हर दरो दीवार ॥ ४ ॥
जो है तुझे सरे सौदाए इन्तिज़ार तो, आ
के हैं दुकाने मताए नजर दरो दीवार ॥ ५ ॥
हुजमे गिरिया का सामान कब किया मैने ?
के गिर पडे न मेरे पाव पर दरो दीवार ॥ ६ ॥
वह आरहा मेरे हमसाए में तो साये से
हुए फिदा दरो दीवार पर दरो दीवार ॥ ७ ॥
नजर में खटके है बिन तेरे घर की आबादी
हमेशा रोते हैं हम देखकर दरो दीवार ॥ ८ ॥
न पूछ बेखुदीए ऐशे मक़दमे सैलाब
के नाचते हैं पडे सरबसर दरो दीवार ॥ ९ ॥
न कह किसी से के 'गालिब' नहीं जमाने में
हरीफे राजे मुहब्बत मगर दरो दीवार ॥ १० ॥

(१) तुला पाहावे म्हटले तर तुझ्या घराच्या भिंती आणि दरवाजे आड येतात. पण खरेच का ते आड येनात ? मला तर वाटतें ह्या भिंती आणि कवाडे माझ्या कल्पनाशक्तीला पंख बनून तुझ्यापर्यंत पोहोचण्यास मदतच करीत आहेत

(२) माझ्या नेत्रातून वाहणाऱ्या अश्रूंच्या पुरामुळें घरची काय स्थिति झाली आहे ही ! पुरामुळें दार पडून त्याचीच भिंत झाली आहे आणि भिंतीला भगदाडें पडून तेथें दरवाजे बनले आहेत.

(३) माझ्या घरादाराच्या सावल्या ज्या दिसताहेत त्या सावल्या नाहींत प्रियेच्या आगमनाप्रीत्यर्थ तिच्या स्वागताकरिता माझें घरच सावलीच्या रुपानें पुढें सरकत आहे असें वाटतें.

(४) तुझ्या घरच्या परिसरांत तुझ्या स्वरूपाची मदिरा किती तरी स्वस्त झाली आहे. म्हणूनच तुझ्या आळीतील घरेंदारें सुद्धां नशेमध्यें चूर दिसताहेत.

(५) प्रतीक्षा कशी असते हें तुला पहायचें आहे ना ? तर-ये आणि पाहा. प्रेमिक प्रियेच्या प्रतीक्षेत घरादाराकडे सारखे डोळे लावून बसला आहे. आणि त्यामुळें तें (घरदार) जणू काय स्वतःच प्रतीक्षेचें दुकान बनून राहिलें आहे असें वाटतें.

(६) प्रेमशोकात मुक्तकंठानें अश्रू ढाळण्याचा मीं विचार केला मात्र, त्या विचारानेंच घरच्या भिंती आणि दरवाजे कोसळून माझ्या पायाशीं खालीं पडलीं. मग अश्रूंचा पूर वाहिला असता तर सगळें घर वाहूनच गेलें असतें.

(७) प्रिया माझ्या शेजारी आली जणूं काय माझ्या घरादाराच्या सावल्या तिच्या घरादाराच्या सावल्यांच्याजवळ येऊन एकमेकांना भेटल्या.

(८) हे प्रिये, तूं घरांत नाहींस त्यामुळें ह्या घरांतील प्रत्येक वस्तु डोळ्यांत खटकते आहे. माझ्या घराकडे मी जेव्हा पाहातों तेव्हां अशी वृत्ति होऊन डोळ्यांतून पाणी वाहूं लागतें.

(९) आतां अश्रूंचा पूर वाहूं लागणार म्हणून प्रेमाच्या वेडोपींत माझीं घरेंदारें सुद्धां नाचूं लागलीं आहेत. प्रेमाच्या ह्या वेडेपणाचें वैभव काय वर्णावें ?

(१०) गालिब, तूं आपलें प्रेमरहस्य कुणालाच सांगूं नकोस. अगदीं राहावत नसेल तर घरच्या भिंतींना सांग. कारण ह्या भिंती तुझ्या कथा ऐकून घेऊं शकतील पण वाच्यता करण्याची शक्ति त्यांच्यांत नाहीं.

५६ . . . घर जब बना लिया तेरे दर पर, कहे बग़ैर
जानेगा अब भी तू न मेरा घर, कहे बग़ैर ॥ १ ॥
कहते हैं, जब रही न मुझे ताक़ते सुख़न
"जानूं किसी के दिल की मैं क्योंकर कहे बग़ैर" ॥ २ ॥
काम उससे आ पड़ा है कि जिसका जहान मे
लेवे न कोई नाम "सितमगर" कहे बग़ैर ॥ ३ ॥
जी ही में कुछ नहीं है हमारे वगरना हम
सर जाये या रहे न रहें पर कहे बग़ैर ॥ ४ ॥
छोड़ूंगा मैं न उस बुते काफ़िर का पूजना
छोड़े न ख़ल्क़ गो मुझे काफ़िर कहे बग़ैर ॥ ५ ॥
मक़सद है नाज़ो ग़म्ज़ा वले गुफ़्तगू में काम
चलता नहीं है दश्नओ ख़ंजर कहे बग़ैर ॥ ६ ॥

हर चन्द हो मुशाहिदए हक की गुफ्तगू
बनती नहीं है बादा ओ सागर कहे बग़ैर ॥ ७ ॥
बहरा हूं मैं तो चाहिये दूना हो इल्तिफ़ात
सुनता नहीं हूं बात मुकर्रर कहे बग़ैर ॥ ८ ॥
'ग़ालिब' न कर हुजूर में तू बार बार अर्ज़
ज़ाहिर है तेरा हाल सब उन पर कहे बग़ैर ॥ ९ ॥

(१) माझ्याकडे ये म्हणून हे प्रिये, मीं तुला सांगितलें. त्या वेळीं तुझें घर मला माहीत नाहीं असें तू म्हणालीस. आता पाहा तुझ्या घरच्या उंबरठ्यावरच मी आपली पथारी पसरली आहे. आता मी न सांगताही तुला माझा ठावठिकाणा कळण्यासारखा आहे.

(२) विनवण्या करून करून माझ्या दाताच्या कण्या झाल्या. आतां बोलण्याची शक्ति पार नाहींशी झाली. आता प्रिया म्हणते कीं, कोणी तोंड उघडून बोलल्याशिवाय मनुष्याचें मन तरी कसें समजावें ? माझ्या ह्या स्थितीला आता काय करावें ?

(३) जिच्या नावामागें छळणारी म्हणून शब्द जोडल्याशिवाय कोणी जिचें नाव घेत नाहींत त्या प्रियेशींच आमचा संबंध आला आहे. आमची ही अशी विचित्र परिस्थिति झाली आहे.

(४) आमच्या मनांतच काहीं बोलण्यासारखें नाहीं म्हणून. नाहींतर प्राण जावोत अगर राहोत, आम्ही बोलल्याशिवाय राहाणारीं माणमें नाहीत.

(५) मी त्या तरुणीची आराधना केल्याशिवाय राहणार नाहीं. मग हा परमेश्वराची आराधना सोडून भलत्याच्याच मागें लागला सबब हा काफ़र आहे असें जग म्हणो. त्याची मला पर्वा नाहीं.

(६) आम्हाला प्रियेचा चंचलपणा, तिचे विभ्रम आणि नखरे वर्णन करणें आहे. पण वर्णनांत खंजीर, कट्यार इत्यादींचे संकेत वापरल्याशिवाय चालतच नाहीं.

(७) तत्त्वज्ञानाच्या लाख गोष्टी असोत त्यांच्या वर्णनात मधु आणि मधुचषक यांचे संकेत वापरणें अपरिहाय आहे.

(८) मला ऐकूं येत नाहीं म्हणतेस ना ? मग बरें झालें. तुला काय सांगायचें आहे तें तुला पुन्हा पुन्हा सांगावें लागतें. म्हणजे आमच्यावर तुझी कृपा दुप्पट झाली म्हणण्यास हरकत नाहीं.

(९) गालिब, तूं बादशाहापाशीं (बहादूरशहा) पुन्हा पुन्हा कां विनवणी करतोस ? अरे, तूं न सांगतांच त्यांना सर्व काहीं माहीत आहे.

५७... क्यों जल गया न ताब रुख़ यार देखकर
जलता हूं अपनी ताक़ते दीदार देखकर ॥ १ ॥
आतिश परस्त कहते हैं अहले जहां मुझे
सरगर्मे नालाहाए शरर बार देखकर ॥ २ ॥
क्या आबरूए इश्क़ जहां आम हो जफ़ा
रुकता हूं तुमको बे सबब आज़ार देखकर ॥ ३ ॥
आता है मेरे क़त्ल को पुरजोश रश्क से
मरता हूं उसके हाथ में तलवार देखकर ॥ ४ ॥
साबित हुआ है गर्दने मीना पे ख़ूने ख़ल्क़
लरज़े है मौंजे मै तेरी रफ़्तार देखकर ॥ ५ ॥
वा हसरता के यार ने खेंचा सितम से हाथ
हमको हरीसे लज़्ज़ते आज़ार देखकर ॥ ६ ॥
बिक जाते हैं हम आप मताए सुखन के साथ
लेकिन अयारे तब्ए ख़रीदार देखकर ॥ ७ ॥
ज़ुन्नार बांध सुबहे सद् दाना तोड़ डाल
रहरौ चले है राह को हमवार देखकर ॥ ८ ॥
इन आबलों से पांव के घबरा गया था मैं
जी ख़ुश हुआ है राह को पुरख़ार देखकर ॥ ९ ॥
क्या बदगुमां है मुझसे के आईने में मेरे
तूती का अक्स समझे है ज़ंगार देखकर ॥ १० ॥
गिरनी थी हम पे बर्क़े तजल्ली, न तूर पर
देते हैं बादा ज़र्फ़े क़दह ख़्वार देखकर ॥ ११ ॥
सर फोड़ना वो 'ग़ालिबे' शोरीदा हाल का
याद आ गया मुझे तेरी दीवार देखकर ॥ १२ ॥

(१) प्रियेचा तेजस्वी चेहरा पाहून माझे डोळे कां गेले नाहींत ? ते धड राहिले ह्याचा मला राग येतो. असली कसली शक्ति माझ्या डोळ्यात आली आहे ही !

(२) माझ्या हृदयांत आगीच्या ठिणग्या उडताहेत. आणि मी सारखे उष्ण निश्वास सोडीत आहें. त्यामुळें लोक मला अग्निपूजक समजूं लागले आहेत.

(३) छळ सोसणें हा आम्हा प्रेमिकांचा धर्म आहे पण तू आत्मपोकी आणि गुलहौशी लोकानाही छळूं लागलीस हें पाहून वाईट वाटते खरा छळ हा प्रेमिकांचाच मान व अधिकार आहे इतराचा नव्हे प्रेम इतकें स्वस्त झालें, तर त्याची अदू काय राहिली ?

(४) ती माझा वध करण्याकरिता येत आहे तिच्या हातून मला मृत्यु येणार म्हणून मला आनंद मानावयास पाहिजे पण तिच्या हातात तलवार पाहून मला हेवा वाटतो कीं, ह्या तलवारीला प्रियेच्या सहवासाचें भाग्य लाभल ह्या हेव्यानच मला मरण येईल असं वाटते

(५) हे प्रिये, मदिरेच्या धुंदीत पावल टाकीत किरयेकांची हृदयें चिरडून टाकलीस त्याच्या खुनाचा डाग तुझ्यावर नाहीं ह्या मधुचषकावर आहे आणि आपल्यामुळ हें सगळें घडलें हें पाहून चषकातील मदिरा पहा कशी भीतीनें थरथर कापते आहे

(६) अरेरे ! काय माझें दुर्दैव ! प्रियेन केलेला छळ आम्हाला आवडतो हें लक्षात येताच तिन आमचा छळ करणेंही सोडून दिल म्हणजे आम्ही आता तिच्या छळालाही मुकलों

(७) रसिकावरून मी स्वत ला आणि माझ्या काव्याला ओवाळून टाकण्यास तयार आहें पण अट ही कीं, तो खराखुरा रसिक हवा

(८) धर्माची स्मरणी टाकून दे आण निधर्मीपणाच जानव गळ्यात घाल स्मरणींतले मणि लहानमोठे आहत ती हाताळण्यास अवघड त्या उलट जानव्याच आहे हेतु हा कीं, धर्माचरणाची वाट अवघड आह त्या उलट निधर्मीपणाची वाट सपाट आणि सुकर आहे

(९) प्रवासात पायाला फोड आले म्हणून घाबरून गेलों होतों पण रस्त्यात काटे पाहिल्यावर आनंद झाला म्हणजे हे काटे लागून फोड फुटतील म्हणजे आणखी त्रास होइल प्रेमात जितका त्रास अधिक तितकेंच समाधान अधिक लाभेल

(१०) माझ्या हृदयाच्या आरशात दु खामुळें गंज चढून हिरवा रंग झाला आहे प्रियेला वाटतें कीं, हा गंज नव्हे तर हा हिरवा पोपट असावा आणि त्याला मीं हृदयात बाळगलें आहे म्हणजे मीं हृदयात प्रियेच्या ऐवजीं दुसऱ्या कुणाला तरी स्थान दिल आहे म्हणून माझ्यावर प्रिया शंका घेत आहे (उर्दू वाङ्मयात बुल्बुल पक्षाला फुलाचा प्रेमिक समजतात तसेंच पोपटाला आरशाचा प्रेमिक समजतात )

(११) तारस पर्वतावर मुसा असताना त्याच्यावर परमेश्वरी रूपेची वीज पडली जड पदार्थांवर (पर्वतावर) ही वीज पडण्यापेक्षा आमच्याकडे तिची दृष्टि का वळू नये ? साकी तरी प्रत्येकाची योग्यता पाहूनच ना त्या त्या प्रमाणात त्याला मदिरा पाजतो मग आमची योग्यता पर्वतासारख्या निर्जीव पदार्थांपेक्षां अधिक नव्हती का ?

(१२) प्रिये, तुझ्या घरच्या भिंती पाहिल्यावर मला त्या भिंतीशीं प्रेमवेडा 'गालिब' डोकें कसें फोडून घेत होता ह्याची आठवण झाली

५८... लरजता है मेरा दिल, जहमते मेह्रे दरख्शा पर
मैं हूं वो क़तरए शबनम, जो हो खार बियाबा पर ॥ १ ॥
न छोडी हजरते यूसुफने या भी खाना आराई
सफेदी दीदए याकूब की फिरती हैं ज़िन्दा पर ॥ २ ॥
फना तालीमे दर्से बेखुदी हूं उस जमाने से
के मजनूं लाम अलिफ लिखता था दीवारे दबिस्ता पर ॥ ३ ॥
फरागत किस कदर रहती मुझे तशवीशे मरहम से
बहम गर सुल्ह करते पारहाए दिल नमकदा पर ॥ ४ ॥
नहीं इक्लीम उल्फत मे कोई तूमारे नाज ऐसा
के पुश्ते चश्म से जिसके न होवे मुह्र उनवा पर ॥ ५ ॥
मुझे अब देखकर अब्रे शफक आलूदा याद आया
के फुर्कत में तेरी, आतिश बरसती थी गुलिस्ता पर ॥ ६ ॥
बजुज़ परवाज शौके नाज़ क्या बाकी रहा होगा
क़ियामत इक हवाए तुन्द है खाके शहीदा पर ॥ ७ ॥
न लड नासेह से 'गालिब' क्या हुआ गर उसने शिद्दत की
हमारा भी तो आखिर ज़ोर चलता है गरेबा पर ॥ ८ ॥

(१) मी म्हणजे अरण्यातील काटेरी झुडुपावर असलेला एक दंवबिंदु होय त्यात वर सूर्याचें तळपतें उन्ह पाहून मला धडकी भरली आहे आधींच काट्याच्या झुडुपावर माझें स्थान म्हणजे मी केव्हा नष्ट होईन ह्याचा नेम नाहीं त्यातून सूर्याची मला नष्ट करण्याची धडपड मला इतक्या त्वरेनें नष्ट करण्याचा त्याचा अट्टाहास का असावा ?

(२) यूसुफ मिश्र देशात तुरुंगात असताना त्याच्या तुरुंगाच्या भिंतीसुद्धा लखलख करीत आहेत कारण यूसुफाच्या बापाची (याकूबची) तेजस्वी दृष्टि पुत्राच्या आठवणीमुळें तुरुंगाच्या भिंतीवर सारखी फिरत राहून त्याना उजाळा देत आहे यूसुफला उर्दू वाङ्मयात सौंदर्याचा पुतळा समजतात तुरुंगातसुद्धा यूसुफला आपलं निवासस्थान सुंदर व आकर्षक करावेंसें वाटलं आणि त्यामुळें तेथील भिंती उजळून निघाल्या असं कवीने म्हटलें आहे

(३) प्रेमवेडा मजनूसुद्धा माझ्यासमोरचें पोर आहे जेव्हा तो अजून विस्मृती (बेखुदी) चे पहिले पाठ घेत होता तेव्हा मी बेखुदीच्या (विस्मृतीच्या) समुद्रात बुडून गेलों होतों खुदी म्हणजे अहंता आणि बेखुदी म्हणजे अहंभावनेचा नाश

( ४ ) माझें हृदय आपल्या जखमांवर प्रियेकडून मीठ चोळून घेण्यास कबूल झालें असतें तर मला जखमेकरितां औषध शोधण्याची जरुर पडली नसती. कारण प्रियेनें छळ करावा हेंच माझ्या जखमेला औषध होय.

( ५ ) प्रेमाच्या कचेरींत कोणताही कागद असा सांपडणार नाहीं कीं, ज्याच्यावर प्रियेच्या विभ्रमाचा, चंचलपणाचा व दुर्लक्षाचा शिक्का पडलेला नाहीं ?

( ६ ) संध्यारागानीं युक्त असे ढग पाहिल्यावर मला आठवतें कीं, तुझ्या विरहांत असें वाटे कीं, तांबडे ढग म्हणजे खालीं उपवनावर जणू काय अग्निवर्षाव करीत आहेत.

( ७ ) कल्पांताच्या दिवशीं आणखी काय होणार आहे ? मेलेलीं माणसें जीवंत होतील म्हणतात. तुझ्या कारणीं मेलेल्या लोकात शिल्लक काय राहिलें आहे ? फक्त इकडे तिकडे भटकण्याची हौस शिल्लक आहे. कल्पांताच्या दिवशी वारे जोरानें वाहूं लागतील आणि ह्या शहीदांची धूळ प्रथमपासूनच उडते आहे ती आणखी जास्त उडूं लागेल.

( ८ ) हे गालिब, उपदेशकांनीं तुला प्रेमवेड सोडून देण्याचा उपदेश केला तर त्यांच्यापाशीं भांडूं नकोस. कारण आपलाही प्रभाव आहेच कीं, त्यांनीं फारच आग्रह धरला तर वेडांत फाडायला आपले कपडे तरी आपल्यापाशीं शिल्लक आहेत ना ?

५९. . . है बस्के हर इक उनके इशारे में निशा और
करते हैं मुहब्बत, तो गुज़रता है गुमां और ॥ १ ॥
यारब, वो न समझे हैं न समझेंगे मेरी बात
दे और दिल उनको जो न दे मुझको ज़बां और ॥ २ ॥
अबरू से है क्या उस निगहे नाज को पैवन्द
है तीर मुकर्रर, मगर उसकी है कमा और ॥ ३ ॥
तुम शहर में हो तो हमें क्या ग़म जब उठेंगे
ले आयेंगे बाजार से जाकर दिलो जां और ॥ ४ ॥
हर चंद सबुक दस्त हुए बुत शिकनी में
हम हैं तो अभी राह में है संगे गिरा और ॥ ५ ॥
है खूने जिगर जोश में दिल खोल के रोता
होते जो कई दीदए खूनाबा फ़िशा और ॥ ६ ॥
मरता हूं इस आवाज पे हर चन्द सर उडजाय
जल्लाद को लेकिन वो कहे जाय के " हां और " ॥ ७ ॥

लोगो को है खुर्शीदे जहा ताब का धोका
हर रोज़ दिखाता हू मैं इक दाग़े निहा और ॥ ८ ॥
लेता न अगर दिल तुम्हे देता कोई दम चैन
करता, जो न मरता, कोई दिन, आहो फुगा और ॥ ९ ॥
पाते नहीं जब राह तो, चढ जाते हैं नाले
रुकती है मेरी तबा तो होती है रवा और ॥ १० ॥
हैं और भी दुनिया में सुख़नवर बहुत अच्छे
कहते है के 'गालिब' का है अन्दाजे बया और ॥ ११ ॥

(१) प्रियेच्या प्रत्येक सकेतातून अनेक अर्थ निघतात म्हणून ती प्रेम करू लागते, तेव्हा मला वेगळाच सशय येतो

(२) प्रियेला कितीही समजवा तिला अवबोध होत नाहीं आणि होणारही नाहीं हे परमेश्वरा, मला दुसरी वाणी दे आणि ते शक्य नसेल तर तिला वेगळें तरी हृदय दे

(३) तिच्या चंचल डोळ्याचा कमानदार भुवयाशी काय सबंध? तिच्या नयनाचेच शर होत पण त्याचे धनुष्य भुवयात नाहीं तर हृदयात आहे

(४) तू या नगरात आली आहेस आणि माझ हृदय हरण केलेंस त्याची काळजी नाहीं कारण तू आल्यापासून ह्या नगरात कित्येक हृदयाची दवधेव चालली आहे त्यापैकींच एक आम्ही जरूर लागेल तेव्हा बाजारात जाऊन घेऊन येऊं

(५) मूर्तिभजनात आम्ही तन्न झालो असलों तरी सर्वांत कठीण मूर्ति म्हणजे अहंतेचा भंग आमच्या हातून अद्याप होणें आहे

(६) ह्या वेळीं माझ्या काळजातील रक्त उसळत आहे तरी दोनच डोळे लाभले आहेत त्यापेक्षा जास्त डोळे असते तर मनसोक्त रडून अनेक नेत्रावाटे काळजातील रक्ताला वाट करून दिली असती

(७) माझा शिरच्छेद झाला तरी त्याची मला पर्वा नाहीं ह! अजून आघात कर, अजून एक वार कर, असें प्रियेने माझ्या वधकर्त्याला उद्देशून म्हटलेले शब्द ऐकण्यासाठीं मी प्राण द्यायला तयार आहे

(८) माझ्या हृदयातील गुप्त जखमाचा एकेक व्रण मी लोकाना दाखवितों तर त्याना तप्त सूर्य पाहिल्याचा भास होतो

(९) तुला मीं माझें हृदय दिले नसते तर स्वस्थता मिळाली नसती आणि माझा मृत्यु झाला नसता तर अजून काही दिवस मी उष्ण निश्वास सोडण्यात घालविले असते

(१०) नद्यांना वाहाण्यास वाट मिळाली नाहीं तर त्यांचे पाणी चढूं लागतें. तसेंच हृदयशोकाला दावण्याचा प्रयत्न केला कीं, तो वर चढत मुखावाटे निश्वासाच्या, काव्याच्या रूपानें बाहेर पडूं लागतो.

(११) जगांत पुष्कळ चांगले कवि आहेत. पण गालिबची काव्यशैली कांहीं वेगळीच आहे असें लोक म्हणतात.

६०. . . सफ़ायीये हैरते आईना है सामाने जंग आख़िर
तग़य्युर आबे बरजा मान्दा का, पाता है रंग आखिर ॥ १ ॥
न की सामाने ऐशोजाह ने तदबीर वहशत की
हुआ जामे ज़मुर्रूद भी मुझे दागे पलंग आख़िर ॥ २ ॥

(१) सांठलेल्या पाण्यावर घाण साचते आणि पुष्कळ दिवस विनवापरतां ठेवलेल्या आरशावर गंज चढतो तसेच निष्क्रिय लोक नाश पावतात.

(२) वैभव लाभलें तरी माझ्या वेडावर उतारा मिळाला नाही जमरुदचे (रत्नाचे) पेले म्हणजे वैभवाचीं चिन्हें असतांत पण माझ्या बाबतींत ते जणूं वाघाच्या पाठीवरचे पिवळे पट्टेच माझें वेड वाढविण्यास कारण ठरले.

६१. . . जुनू की दस्तगीरी किससे हो गर हो न उर्यानी
गरेबां चाक का हक़ हो गया है मेरी गर्दन पर ॥ १ ॥
वरंगे काग़जे आतिशज़दा नैरंगे बेताबी
हज़ार आईना दिल बाधे है बाले यक तपीदन पर ॥ २ ॥
फ़लक से हमको ऐशे रफ्ता का क्या क्या तक़ाज़ा है
मताए बुर्दा को समझे हुए हैं कर्ज रहज़न पर ॥ ३ ॥
हम और वो बेसबब रंजआश्ना दुष्मन के रखता है
शुआए मेहरसे तोहमत निगह की चष्मे रौज़न पर ॥ ४ ॥
फ़ना को सौंप गर, मुश्ताक़ है अपनी हक़ीक़त का
फ़रोग़े ताळेए ख़ाशाक है मौकूफ़ गळख़न पर ॥ ५ ॥
'असद' बिस्मिल है किस अदाज का क़ातिलसे कहता है
के मश्क़े नाज कर ख़ूने दोआलम मेरी गर्दन पर ॥ ६ ॥

(१) प्रेमवेडाच्या भरात मी अगावरचे कपडे फाडून दिगंबर अवस्था धारण केली आहे. म्हणजे माझ्या चिंध्या झालेल्या कपड्यानीं माझें वेड उघडे केलें ह्याबद्दल मी त्याचा ऋणी आहें.

(२) मजकूर लिहिलेला कागद जळूं लागला म्हणजे त्या कागदावरील शब्द चमकदार दिसतात तद्वतच माझ्या स्वस्थतेच्या आगीमुळें माझ्या हृदयासमोर आरसे धरल्यासारखें होऊन माझ्या हृदयांतील काल्पनिकत्व स्पष्टपणें दिसत आहे

(३) गतवैभवाबद्दल काळापाशीं गाऱ्हाणें करणें म्हणजे लुटीच्या मालाचें ऋण लुटारूवर आहे म्हटल्यासारखें आहे गाऱ्हाणे केल्यान चोर लुटीचा माल परत का देणार आहे? तसेंच काळापाशीं गाऱ्हाणे केल्यान गतवैभव परत का मिळणार आहे?

(४) माझ्या प्रियेला काय म्हणाव? विनाकारण माझ्यावर चिडते साध्या साध्या गोष्टीवर संशय घेते अहो भिंतीच्या फटींतून सूर्याचा किरण तिच्या खोलींत आला तर तिला वाटते कीं, मीच फटींतून तिला पहात आहे आणि म्हणून ती माझ्यावर संशय घेते

(५) तुला सत्यज्ञान हवे असेल तर अहंतेला नष्ट करून टाक गवताला तरी तेज आगींत पडल्यामुळेंच लाभतें ना? (जळण्यामुळें)

(६) कवि असद तरी विचित्रच आहे तो पाहा, प्रियेला म्हणत आहे कीं, प्रिये, तुला वध करण्याचे प्रयोग करावयाचे आहेत ना? माझ्यावर प्रयोग कर मी राजी आहें मग माझ्या वधाचा आरोप तुझ्यावर येणार नाहीं

६२ . . .

लाज़िम था के देखो मेरा रस्ता कोई दिन और
तन्हा गये क्यों? अब रहो तन्हा कोई दिन और ॥ १ ॥
मिट जायगा सर, गर तेरा पत्थर न घिसेगा
हूं दर पे तेरे नासिया फ़र्सा कोई दिन और ॥ २ ॥
आये हो कल और आज ही कहते हो कि जाऊं
माना के हमेशा नहीं अच्छा, कोई दिन और ॥ ३ ॥
जाते हुए कहते हो क़ियामत को मिलेंगे
क्या खूब! क़ियामत का है गोया कोई दिन और ॥ ४ ॥
हां ऐ फ़लके पीर जवां था अभी 'आरिफ़'
क्या तेरा बिगड़ता जो न मरता कोई दिन और ॥ ५ ॥
तुम माहे शबे चार दहुम थे मेरे घर के
फिर क्यों न रहा घर का वो नक़्शा कोई दिन और ॥ ६ ॥
तुम कौन से ऐसे थे खरे दादो सितद के
करता मलकुल्‌मौत तक़ाज़ा कोई दिन और ॥ ७ ॥

मुझसे तुम्हे नफ़रत सही, नैयर से लड़ाई
बच्चो का भी देखा न तमाशा कोई दिन और ॥ ८ ॥

गुजरी न बहर हाल यह मुद्दत खुशो नाखुश
करना था जवां मर्ग गुज़ारा कोई दिन और ॥ ९ ॥

नादां हो जो कहते हो के क्यों जीते हैं 'ग़ालिब'
किस्मत में है मरने की तमन्ना कोई दिन और ॥ १० ॥

आरिफ हा गालिबचा मेव्हणीचा म्हणजे बायकोच्या बहिणीचा मुलगा, आणि गालिबला आपल्या मुलासारखा प्रिय होता. त्याच्या अकाली मृत्यूवर ही कविता लिहिली आहे.

(१) हे आरिफ़, ह्या लोकांतून निघून जाण्यापूर्वी तूं माझी वाट पाहायची असती आता एकटाच निघून गेलास ना? मग काहीं दिवस तुला परलोकांत एकटेंच राहावें लागेल.

(२) अजून काहीं दिवस तुझ्या कबरीच्या दगडावर डोकें आपटून घेणें नशिबीं आहे. एक तर डोकें आपटून आपटून दगड तरी झिजून जाईल किंवा माझें डोकें तरी फुटून मला मृत्यु येईल.

(३) कालच तूं ह्या जगात आलास आणि आजच जातों म्हणतोस हें काय? कां 'आजचा मुहूर्त चांगला होता? मला माहीत आहे कीं प्रत्येक दिवशीं काहीं मुहूर्त चांगला नसतो पण आजच निघून जाण्याची काय घाई होती?

(४) निघून जाण्याच्या दिवशीं तूं म्हणतोस कीं आपण कल्पांताच्या दिवशीं (त्या दिवशीं परमेश्वर सर्वांचा न्यायनिवाडा करतो अशी समजूत आहे) भेटूं. जणूं काय कल्पांत म्हणनात तो काहीं वेगळाच प्रकार आहे. तूं आम्हाला सोडून चाललास हाच कल्पांत आहे

(५) अरे काळा, आरिफ अजून तरुण होता. तूं अजून काहीं दिवस वाट पाहिली असती तर काय बरें तुझें विघडलें असतें?

(६) अरे आरिफ, तूं तर माझ्या घरचा चतुर्दशीचा चंद्र होतास. माझ्या घरचें हें स्वरूप काहीं दिवस असेंच राहिलें असतें तर काय बिघडलें असतें?

(७) अरे असा काय तूं सचोटीचा होतास म्हणून मृत्यूनें आपल्या कराराचा तगादा केल्यावर तूं त्याच्या हाकेला ओ दिलीस? त्याला अजून काहीं दिवस तरी टाळायचें असतेंस.

(८) बरें, मी आणि नय्यर (गालिबचा नातेवाईक आणि कवि) तुला आवडत नसूं. पण घरातील पोराबाळांचें अजून काहीं दिवस कातुक पाहायला तुला काय झालें होतें?

(९) इतके दिवस सुखदुःखांत तूं काळ घालविलास. असेच अजून कांहीं दिवस चालवायचे असतेस.

(१०) लोक विचारतात कीं, आरिफ़ मेला आणि गालिब तूं कसा जिवंत राहिलास ? अरे मंदबुद्धींना काय सांगावें ? माझ्या नशीबांत मृत्यूचें आमंत्रण अजून कांहीं दिवस लिहिलेलें दिसत नाहीं हेच म्हणावें, दुसरें काय ?

६३ . . . फ़ारिग़ मुझे न जान कि मानिन्दे सुब्हो मेहर
है दाग़े इश्क़ ज़ीनते जेबे कफ़न हनूज़ ॥ १ ॥
है नाज़े मुफ़लिसां ज़रे दस्त रफ़्ता पर
हूं गुलफ़रोशे शोखिए दाग़े कुहन हनूज़ ॥ २ ॥
मैख़ानए जिगर में यहां ख़ाक भी नहीं
ख़मयाज़ा खेंचे है बुते बेदादो फ़न हनूज़ ॥ ३ ॥

(१) मृत्यूनंतर मी प्रेमाच्या शोकांतून मुक्त झालों असें समजूं नकोस. माझ्या कफनावर प्रेमाचा जो डाग आहे तो पाहा पहांटेच्या सूर्यासारखा चकाकत आहे.

(२) गतवैभवाचा एखादा कंगाल माणसानें अभिमान धरावा त्याप्रमाणें मी पण माझ्या प्रेमाच्या जुन्या आठवणीचा अभिमान बाळगीत आहें.

(३) माझ्या काळजाच्या मद्यशाळेंत आतां मदिरेचा एक थेंबसुद्धां शिल्लक राहिला नाहीं. तरी ही पाहा माझी प्रिया आपल्याला मदिरा अजून हवी म्हणून कशी बेचैन झाली आहे.

६४ . . . हरीफ़े मतलबे मुश्किल नहीं फ़ुसूने नियाज़
दुआ क़बूल हो यारब के उम्रे ख़िज्र दराज़ ॥ १ ॥
न हो ब हरज़ा बियाबां नवर्दे वहमे वजूद
हनूज़ तेरे तसव्वुर मे हैं नशेबो फ़राज़ ॥ २ ॥
विसाले जल्वा तमाशा हैं पर दिमाग़ कहां
कि दीजे आईनए इन्तिज़ार को परवाज़ ॥ ३ ॥
हर एक ज़र्रए आशिक़ है आफ़ताब परस्त
गई न ख़ाक हुए पर, हवाए जल्वए नाज़ ॥ ४ ॥
न पूछ वुसअते मैख़ानए जुनूं 'ग़ालिब'
जहां यह कासए गर्दूं है एक ख़ाक अन्दाज़ ॥ ५ ॥

( १ ) अजीजीनें आणि लाचारीनें कोणतीही मागणी पुरी होत नाहीं. आतां परमेश्वरानें ज्या गोष्टी आधींच देऊन टाकल्या आहेत, त्याच पुन्हा मागाव्या झालें. जी गोष्ट होणें शक्य नाहीं त्याकरितां विनवणी करण्यांत काय अर्थ आहे?

( २ ) हा संसार सत्य आहे. हें अस्तित्व खरें आहे. अशा वृथा भावनेंत फसू नकोस. तुझ्या विचारक्षेत्रांत अद्याप पुष्कळ चढउतार आहेत. तुझी विचारशक्ति अद्याप प्रगल्भ झालेली नाहीं.

✓( ३ ) मीलनानें सौंदर्यप्रतीति होते हें खरें आहे. पण प्रतीक्षेशिवाय मीलन नाहीं आणि येथें प्रतीक्षारूपी आरशाला साफसूफ करण्याची ( प्रतीक्षा करण्याची ) शक्ति कुणापाशीं आहे?

✓( ४ ) प्रेमिक मेल्यानंतरही त्याची प्रियादर्शनाची इच्छा नाहींशी होत नाहीं. त्याच्या शरीराची माती झाली पण ह्या मातीचा कणन्‌कण उडून सूर्याच्या तेजांत कसा चमकत आहे. प्रियेच्या स्वरूपाला सूर्याच्या तेजाची उपमा दिली आहे.

( ५ ) गालिब, वेडाची मयशाळा किती विस्तीर्ण आहे हें विचारूं नकोस. अरे, हें आकाश आहे ना? हें म्हणजे ह्या मयशाळेंतील कचरा टाकण्याची पेटी समज.

६५ . . . वुसअते सइए करम देख के सर ता सर ख़ाक
गुज़रे है आबला पा अब्रे गुहर बार हनूज़ ॥ १ ॥

यक क़लम काग़ज़े आतिशज़दा है सफहे दश्त
नक्शे पा में है तपे गर्मीए रफ़्तार हनूज़ ॥ २ ॥

( १ ) परमेश्वरी कृपेचा मेघवर्षाव ह्या पृथ्वीवर किती होतो तें पाहा. मेघांत जलबिंदु असतात. त्यांना वाट चालून चालून पायाला येणाऱ्या फोडाची उपमा दिली आहे. परमेश्वरी कृपा म्हणजे जणू काय मेघ आणि ह्या मेघाला भ्रमण करून करून पायांला फोड ( जलबिंदु ) आले तरी तो पृथ्वीवर पाण्याचा वर्षाव करून त्याचें सिंचन करतो. तद्वतच भगवंताच्या कृपावृष्टीचें आहे.

( २ ) माझ्या हृदयांत धगधगणाऱ्या अग्नीचा दाहकपणा माझ्या भटकण्यांत रस्त्यावर उमटणाऱ्या पायाच्या ठशांतही व्यक्त झाला आहे. हे ठसे म्हणजे जळजळीत निखारेच होत आणि त्यामुळें अरण्याला आग लागून सारा प्रदेश आगींत जळणाऱ्या कागदाच्या तुकड्यासारखा वेडावांकडा होत आहे.

६६ . . . क्योंकर रखूं उस बुत से जान अज़ीज़
क्या नहीं है मुझे ईमान अज़ीज़ ॥ १ ॥
दिल से निकला पै न निकला दिल से
है तेरे तीर का पैकान अज़ीज़ ॥ २ ॥
ताब लाए ही बनेगी 'ग़ालिब'
वाक़या सख़्त है और जान अज़ीज़ ॥ ३ ॥

(१) प्रियेपेक्षां मला माझा जीव कांहीं प्यारा नाहीं असें मी समजू लागलों. तर ती माझें सत्त्व (इमान) हरण केल्याशिवाय राहणार नाहीं म्हणून माझें इमान सुरक्षित ठेवण्याकरितां तरी मला आपला जीव तिच्यावरून ओवाळून टाकण्यास हवा.

(२) तुझे शर माझ्या हृदयांतून आरपार निघून गेले, तरी पण ते खरोखरच गेले का? कारण ते शर हृदयांत रुतून बसल्यासारखे आहेत आणि म्हणून मला हवेहवेसे वाटतात.

(३) अरे गालिब, सहन करण्याशिवाय गत्यंतर नाहीं. कारण, एकीकडे प्रसंग निर्वाणीचा तर दुसरीकडे आपला जीव आपल्याला प्यारा आहे. ह्यामुळें सहन करण्याशिवाय दुसरा मार्ग नाहीं.

६७ . . . न गुले नग़मा हूं न पर्दए साज़
मैं हूं अपनी शिकस्त की आवाज़ ॥ १ ॥
तू और आराइशे ख़मे काकुल
मैं और अन्देशा हाए दूरो दराज़ ॥ २ ॥
लाफ़े तमकीं फ़रेबे सादा दिली
हम हैं और राज़हाए सीना गुदाज़ ॥ ३ ॥
हूं गिरफ़्तारे उल्फ़ते सैयाद
वरना बाक़ी है ताक़ते परवाज़ ॥ ४ ॥
वो भी दिन हो कि उस सितमगर से
नाज़ खेंचूं बजाय हसरते नाज़ ॥ ५ ॥
नहीं दिल में मेरे वो कतरए खूं
जिससे मिज़गां हुई न हो गुलबाज़ ॥ ६ ॥

ऐ तेरा ग़म्जा यक कलम अंगेज़
ऐ तेरा ज़ुल्म सर्र बसर अन्दाज़ ॥ ७ ॥
तू हुआ जल्वागर मुबारक हो
रेज़िशे सजदए जबीने नियाज़ ॥ ८ ॥
मुझको पूछा तो कुछ ग़ज़ब न हुआ
मैं ग़रीब और तू ग़रीब नवाज़ ॥ ९ ॥
' असद उल्ला खां ' तमाम हुआ
ऐ दरेग़ा वो रिन्दे शाहिद बाज़ ॥ १० ॥

( १ ) माझें जीवन कांहीं सुरेल वाद्य नाहीं. माझी वाणी म्हणजे माझ्या व्यथित आणि भग्न हृदयाचा ध्वनि होय. गोड आणि सुरस गीतांशीं मला कांहीं कर्तव्य नाहीं.

( २ ) प्रिये, काय सांगावें, तिकडे तूं आपल्या केशविरचनांत गुंग आहेस आणि इकडे मी निरनिराळ्या शंका-कुशंकांत गुरफटलों आहें.

( ३ ) प्रेम, आणि त्यांत स्वस्थता ! केवळ अशक्य प्रेमांत स्वस्थता लाभूं शकते म्हणून वढाई मारणारे भ्रमात आहेत. प्रेमिकाच्या हृदयांत तर दाहक रहस्यें लपलेलीं असतात. त्यांना स्वस्थता कुठली लाभायला ?

( ४ ) पारध्यांच्या जाळ्यांतून मला उडून जातां येत नाहीं, असें समजूं नकोस. पण काय करूं ? मी जाळ्यांत अडकून पडलों नाहीं, पारध्याच्या प्रेमांत अडकून पडलों आहें.

( ५ ) प्रियेचे नाच नखरे आपल्या वाटेला यावेत ही उत्कट इच्छा आहे. ही इच्छा कधीं तरी पूर्ण होवो.

( ६ ) माझ्या हृदयांतील रक्ताच्या बिंदूबिंदूबरोबर माझ्या पापण्या खेळून चुकल्या आहेत ( परिचित झाल्या आहेत. ) माझें सारें रक्त नेत्रांच्या द्वारें बाहेर गेलें आहे. आतां कांहीं शिल्लक राहिलें नाहीं.

( ७ ) हे प्रिये, तुझ्या एका कटाक्षानें आम्हांला जीवनाचा लाभ होतो. तर तुझ्या छळामुळें आमचे प्राण जातात. ह्या दोन्ही परस्पर विरोधी गोष्टी (जीवनदान आणि प्राणहरण) तुझ्यांत सामावल्या आहेत.

( ८ ) तू आलीस, बरें झालें. आतां माझ्या कपाळाचे शेंकडों सिजदे ( नमाजाच्या वेळीं कपाळ जमिनीवर टेकण्याला सिजदा म्हणतात. ) तुझ्या चरणीं रुजू होवोत.

( ९ ) माझी तूं विचारपूस केलीस ह्यांत काय बिघडलें ? अगे, मी गरीब तर तूं गरीबनवाज ( गरिबावर कृपा करणारी ) नाहींस का ?

( १० ) अरेरे, असदुल्लाखान आटोपला. तो सौंदर्योपासक मद्यपि काय भला माणूस होता !

६८ . . . मुज़्दा ऐ जौक़े असीरी के नजर आता है
दाम खाली कफसे मुर्गे गिरफ्तार के पास ॥ १ ॥

जिगरे तश्नए आज़ार तसल्ली न हुआ
जूए खू हमने बहाई बुने हरखार के पास ॥ २ ॥

मुन्द गई खोलते ही खोलते आंखें है है
खूब वक्त आये तुम इस आशिके बीमार के पास ॥ ३ ॥

मैं भी रुक रुक के न मरता जो ज़बां के बदले
दश्ना इक तेज़ सा होता मेरे ग़मख्वार के पास ॥ ४ ॥

दहने शेर में जा बैठिए लेकिन ऐ दिल
न खड़े होजिये खूबाने दिल आजार के पास ॥ ५ ॥

देखकर तुझको चमन बसके नमू करता है
खुद बखुद पहुंचे है गुल गोशए दस्तार के पास ॥ ६ ॥

मरगया फोड़के सर 'ग़ालिबे' वहशी है ! है !
बैठना उसका वो आकर तेरी दीवार के पास ॥ ७ ॥

(१) पक्षी पकडणारे पारधी सावज धरण्याच्या जागेजवळ एक पिंजरा ठेवून त्यात एक पाळलेला पक्षी ठेवतात. त्या पक्षाच्या आवाजानें आकर्षित होऊन सावज जवळ येतें आणि पसरून ठेवलेल्या जाळ्यांत अडकतें. कवि म्हणतो, तुला जाळ्यांत अडकण्याची इच्छा आहे ना ? बघ. तुझी इच्छा पूर्ण होण्याची वेळ आली आहे. ते बघ पाळलेल्या पक्षाच्या पिंजऱ्याला लागूनच मोकळें जाळें पसरून ठेवलेलें दिसत आहे. मग चल तर आणि स्वतःला जाळ्यांत अडकवून घे.

(२) प्रेमवेडांत भटकतांना अरण्यातील प्रत्येक काटेरी झुडुपाचें आम्हीं रक्ताचे कालवे वाहून सिंचन केलं. तरीपण हृदयांतील व्यथा कमी झाली नाहीं. प्रेमिक प्रेमवेडांत वणवण भटकत असतां पायांना काटे बोंचून भळभळ रक्त वाहूं लागते त्याला उद्देशून वरील कल्पना आहे.

(३) हे प्रिये, माझ्या आयुष्याच्या अगदीं शेवटच्या घडीला तूं मला भेटण्यास आलीस. तूं आलीस म्हणून मी मोठ्या कष्टानें डोळे उघडले न उघडले तोंच ते कायमचे मिटले. हीच वेळ कां तूं माझ्यासमोर येण्याची शोधून काढलीस ? तुला डोळे भरून पाहणेंही शक्य झालें नाहीं.

११९ . . . .

७१ . . . बीमे रकीब से नहीं करते विदाए होश
मजबूर यां तलक हुए, ऐ इख्तियार हैफ ! ॥ १ ॥
जलता है दिल, कि क्यों न हम इक बार जल गए
ऐ नातमामिए नफसे शोला बार हैफ ! ॥ २ ॥

( १ ) प्रेमांत देहभान हरपून जाणें ह्यापरती कोणती गोष्ट हवी असूं शकेल ? पण तेंही आम्हांला शक्य होत नाहीं. कारण आमचें देहभान हरपलें कीं आमच्या ह्या अवस्थेचा लाभ घेऊन आमचा प्रतिस्पर्धी प्रियाराधन करूं लागायचा. ह्या भीतीनें आम्ही शुद्ध हरूं देत नाहीं आणि अशा रीतीनें आम्हाला प्रिय आणि हव्या असलेल्या अवस्थेला मुकत आहोंत.

( २ ) हे निश्वासांनो, तुम्ही तावडतोब मला आपल्या दाहकतेनें जाळून नष्ट करून कां टाकलें नाहीं ? हें हळूहळू जळणें माझ्या नशीबीं काय म्हणून आलें आहे ?

७२ . . . ज़ख्म पर छिडकें कहां तिफ्लाने बेपरवा नमक
क्या मज़ा होता अगर पत्थर में भी होता नमक ॥ १ ॥
गर्दे राहे यार है सामाने नाज़े ज़ख्मे दिल
वरना होता है जहां में किस कदर पैदा नमक ॥ २ ॥
मुझको अरज़ानी रहे तुझको मुबारिक हो, जियो
नालए बुल्बुलका दर्द और खन्दए गुलका नमक ॥ ३ ॥
शोरे जौलां था कनारे बहर पर किसका के आज
गर्दे साहिल है बज़ख्मे मौज़ए दरिया नमक ॥ ४ ॥
दाद देता है मिरे ज़ख्मे जिगर की वाह वाह
याद करता है मुझे देखे है वो जिस जा नमक ॥ ५ ॥
छोडकर जाना तने मजरूहे आशिक हैफ है
दिल तलब करता है ज़ख्म और मांगें हैं आज़ा नमक ॥ ६ ॥
ग़ैर की मिन्नत न खेंचूंगा, पए तौकीरे दर्द
ज़ख्म मिस्ले खन्दए कातिल है सर ता पा नमक ॥ ७ ॥
याद हैं वो दिन तुझे 'गालिब,' के वज्दे जोक़ में
ज़ख्म से गिरता तो मैं पलकों से चुनता था नमक ॥ ८ ॥

(१) वेड लागलेल्या माणसाला मुलें रस्त्यांतून दगड मारतात त्यास उद्देशून कवि म्हणतो कीं, मुलें दगड मारतात पण त्यामुळें जखमावर मीठ चोळलें जात नाहीं. दगडांत मीठ असतें तर दोन्ही गोष्टी एकदमच साधल्या असत्या. म्हणजे वेडाच्या भरांत दगडाचा मार आणि जखमांना मिठाचा लाभ ह्या दोन्ही गोष्टी मिळून मनाला समाधान झाले असतें. प्रेमांत जितकीं दुःखें जास्त तितकें समाधान अधिक अशी कल्पना आहे.

(२) जखमावरून मीठ चोळण्याकरितां जगांत हवें तेवढें मीठ सापडतें. पण माझें मीठ म्हणजे तें नव्हे. प्रियेच्या घरच्या परिसरांतील धूळ हेंच माझ्या हृदयावरील जखमांवर चोळण्यायोग्य मीठ होय.

(३) माझ्या वांट्याला बुलबुलचें आक्रंदन आलें आहे. त्यांतच मी धन्य आहें. आणि हे प्रिये, तुझ्या वांट्याला फुलांचें कुटिल हास्याचें मीठ भरपूर आलें आहे. तें तुला लखलाभ होवो. निर्दय फूल म्हणजे प्रेयसी आणि बुलबुल म्हणजे प्रेमिक असा उर्दू काव्यांत संकेत आहे.

(४) माझ्या प्रियेनें समुद्राच्या कांठावरून फिरतांना आपल्या चंचलपणानें समुद्राच्या लाटांनाही मागें सारलें. त्या जललहरींना त्यांचा हेवा वाटून त्या व्यथित झाल्या आणि प्रियेच्या पायाखालची समुद्रकांठची धूळ जणूं मीठ बनून त्या लाटांच्या व्यथांना अधिक तीव्र करीत आहे.

(५) माझ्या हृदयव्यथेचें प्रिया कौतुकच करीत आहे असें म्हटलें पाहिजे. कारण तिला कोठेंही मीठ आढळलें कीं तिला माझी हटकून आठवण होऊं लागली आहे.

(६) हे प्रिये, आपल्या व्यथित प्रियकराला सोडून जाणें योग्य नाहीं. अजून थोडा वेळ थांब म्हणजे माझ्या जखमांवर तुला मीठ चोळायला मिळून माझ्या व्यथेची लज्जत आणखी वाढेल.

(७) मी माझ्या जखमांवर मीठ चोळ असें प्रियेशिवाय कुणालाही म्हणणार नाहीं. मला दुसऱ्याचे उपकार नकोत आणि प्रिया जखमांवर मीठ शिंपडत नसेल तरी हरकत नाहीं. भळभळ वाहणाऱ्या ह्या तीव्र जखमा म्हणजे अंतर्बाह्य मीठच नव्हेत काय ?

(८) स्त्रियांची समजूत आहे कीं, मीठ जमिनीवर सांडलें तर तें पापण्यांनींच टिपलें पाहिजे. हलगर्जीपणानें मीठ सांडणें फार वाईट अशी समजूत आहे. कवि म्हणतो, हे गालिब, तुला ते दिवस आठवत नाहींत का ? कीं जेव्हां तुझ्या जखमांवरचें मीठ खालीं पडत होतें त्या वेळीं तू प्रेमाच्या आत्यंतिक अवस्थेत अक्षरशः पापण्यांनीं तें मीठ टिपून घेत होतास.

७३ . . . आह को चाहिये इक उम्र असर होने तक
कौन जीता है तेरी जुल्फ के सर होने तक ॥ १ ॥
दाम हर मौज में है हल्कए सदकाम निहंग
देखें क्या गुजरे है कतरे पे गुहर होने तक ॥ २ ॥
आशिकी सब्र तलब और तमन्ना बेताब
दिल का क्या रंग करू खूने जिगर होने तक ॥ ३ ॥
हमने माना के तगाफुल न करोगे लेकिन
खाक हो जायेंगे हम तुमको खबर होने तक ॥ ४ ॥
परतवे खूर से है शबनम को फना की तालीम
मैं भी हू एक इनायत की नजर होने तक ॥ ५ ॥
यक नजर बेश नहीं फुर्सते हस्ती गाफिल
गर्मीए बज्म है इक रक्से शरर होने तक ॥ ६ ॥
गमे हस्ती का 'असद' किससे हो जुज मर्ग इलाज
शम्अ हर रंग में जलती है सहर होने तक ॥ ७ ॥

(१) निश्वासाना फळ यण्यास एक युग लागतें तू मला वश होइपर्यंत मी जिवंत राहीन ह्याची खात्री काय ?

(२) समुद्राच्या प्रत्यक लाटेंतून शेंकडों सकर आहेत ह्यातून पार होऊन मोतीं बनणाऱ्या जलबिंदूवर काय काय संकटें कोसळत नसतील कोणी सागाव ?

(३) प्रेमाला सहनशीलता हवी आणि इकडे तर आकांक्षा बेचैन आहेत ह्या दोन्हींच्या संघर्षांत रक्ताच पाणी होतें आहे तोंपर्यंत माझ्या हृदयाला कसें साभाळून ठेवू ?

(४) तू दुर्लक्ष करणार नाहीं हें जरी मानल तरी तुझ्यापाशीं आमची दाद लागेपर्यंत आम्ही मातींत मिळून जाऊं ह्याची वाट काय ?

(५) सूर्याचें ऊन म्हणजे दंवबिंदूला नाश होण्याचा धडाच होय तुझ्या प्रेमाची नजर म्हणजे सूर्याचे किरण आणि मी म्हणजे दंवबिंदू होय

(६) अरे मूर्खा, हें जीवन म्हणजे क्षणभंगुर आहे वीज चमकून नाहींशी होईपर्यंतच ही मैफिल सजलेली आहे असें समज

(७) हे असद, जीवनाच्या शोकाला एक मृत्यूशिवाय दुसरा इलाज नाहीं मृत्यु येइपर्यंत हें सारं सहन करणें भाग आहे तो दिवा पाहा, अरुणोदय होताच तो दिवा विझून जाईल तोंपर्यंत कोणत्या ना कोणत्या स्थितींत का होइना त्याला जळत राहाणें प्राप्तच आहे ना ?

७४ . . . गर तुझको है यकीने इजाबत दुआ न माग
यानी बगैर यक दिले बे मुद्‌आ न माग ॥ १ ॥
आता है दागे हसरते दिल का शुमार याद
मुझसे मेरे गुनह का हिसाब ऐ खुदा न माग ॥ २ ॥

(१) तुझी प्रार्थना रुजू होइल असें वाटत असेल तर परमेश्वरापाशीं तू फक्त एवढच माग कीं, त्यान तुला निरिच्छ हृदय द्यावें तें लाभल म्हणजे तुला परमेश्वरापाशीं काहीं मागायची इच्छाच राहाणार नाहीं

(२) परमेश्वरा, माझ्याकडून घडलेल्या अपराधाचा हिशेब तू मागू नकोस तो हिशेब मी देईन तरी कसा ? कारण अपराधाची यादी करण्यास बसलों कीं, माझ्या हृदयावर पडलेल्या शेंकडों आघाताची सख्या मला आठवू लागते मी अपराध केले असतील, पण माझ्यावर गुदरलेल्या सकटाची सख्या पण तितकीच नव्हे काय ?

७५ . . . है किस कदर हलाके फरेबे वफाए गुल
बुलबुल के कारोबार पे हैं खंदहाये गुल ॥ १ ॥
आजादीये नसीम मुबारक के हर तरफ
टूटे पडे हैं हल्कए दामे हवाए गुल ॥ २ ॥
जो था सो मौजे रग के धोके में मर गया
ऐ वाए नालए लबे खूनीं नवाए गुल ॥ ३ ॥
खुशहाल उस हरीफे सियह मस्त का के जो
रखता हो, मिस्ले सायए गुल सर ब पाये गुल ॥ ४ ॥
ईजाद करती है उसे तेरे लिये बहार
मेरा रकीब है नफसे इत्रे साए गुल ॥ ५ ॥
शर्मिन्दा रखते हैं मुझे बादे बहार से
मीनाए बेशराबो दिले बेहवाए गुल ॥ ६ ॥
सत्वत से तेरे जल्वये हुस्ने गयूर की
खून हैं मेरी निगाह मे रगे अदाये गुल ॥ ७ ॥
तेरे ही जल्वे का है यह धोका कि आज तक
बेइख्तियार दौडे है गुल दर कफाए गुल ॥ ८ ॥
'गालिब' मुझे है उससे हम आगोशी आरजू
जिसका खयाल है गुले जेबे कबाए गुल ॥ ९ ॥

७८ . . . ह्र वामे वख्ते सुफ्ता से यक ख्वाबे खुश व ले
'ग़ालिब' यह ख़ौफ है के कहां से अदा करूं ॥ १ ॥
वो फिराक़ और वो विसाल, कहा
वो शबो रोज, माहो साल कहा ॥ १ ॥
फुर्सते कारोबारे शौक़ किसे
ज़ौक़े नज्ज़ारए जमाल कहा ॥ २ ॥
दिल तो दिल वो दिमाग भी न रहा
शोरे सौदाए ख़त्तो ख़ाल कहा ॥ ३ ॥
थी वो इक शख्स के तसव्वुर से
अब वो रानाइए ख़याल कहा ॥ ४ ॥
ऐसा आसा नहीं लहू रोना
दिल में ताकत जिगर मे हाल कहा ॥ ५ ॥
हमसे छूटा क़मार ख़ानए इश्क़
वा जो जावें गिरह में माल कहा ॥ ६ ॥
फ़िक्रे दुनियामे सर खपाता हू
मैं कहा और ये वबाल कहा ॥ ७ ॥
मुज़महिल हो गये क़वा 'ग़ालिब'
वो अनासर मे एतिदाल कहा ॥ ८ ॥

(१) माझें दैव झोंपलें आहे आणि मला झोंप येत नाहीं एखादें गोड स्वप्न दैवानें माझ्या वाट्याला यावें असें वाटतें पण माझी निद्रा नाहींशी झाली आहे तर तें गोड स्वप्न तरी माझ्या वाट्याला कोठून येणार ?

गतकाळाची आठवण

(१) तें मीलन, तो विरह, ते दिवस, त्या रात्री आता परत कोठून येणार ?

(२) प्रेमव्यथा लावून घ्यायला आता कोणाला अवकाश आहे ? आता सौंदर्यदर्शनाचा लाभ कोठें ?

(३) हृदयाचें जाऊं दे आता ती विचारशक्ति कुठें ? आणि याच गोष्टी नसतील तर प्रेमाचं वेड कुठलें ?

(४) हृदयातील सारे रंग त्या प्रियेमुळें होते आता तीच नाहींशी झाल्यावर शिल्लक काय राहिलें आहे ?

(५) रक्ताचे अश्रु वाहविणें आता सोपें नाहीं आता हृदयात ती शक्ति नाहीं आणि काळजाची ती अवस्था नाहीं

(६) प्रेमाचा जुगारखाना आम्हीं सोडून दिला आहे तेथ बाजी लावण्यास आमच्या-पाशीं माल कुठे शिल्लक आहे ?

(७) तसें पाहिलें तर मी स्वच्छंदी आणि स्वतंत्र वृत्तीचा जीवनातील प्रश्नाशीं माझा काय संबंध ? पण नेमकं त्यातच डोकें पिकून जाण्याची वेळ आली आहे

(८) 'गालिब', साऱ्या शक्ति आता विगलित झाल्या आहेत त्यांमध्ये मागचा जोम कोठून राहाणार ?

७९ . . . की वफा हमसे तो गैर उसको जफा कहते हैं
होती आई है के अच्छों को बुरा कहते हैं ॥ १ ॥
आज हम अपनी परीशानीये खातिर उनसे
कहने जाते तो हैं पर देखिए क्या कहते हैं ॥ २ ॥
अगले वक्तो के हैं ये लोग इन्हे कुछ न कहो
जो मये व नग्मे को अन्दोह रुबा कहते हैं ॥ ३ ॥
दिल मे आजाये है होती है जो फुर्सत गश से
और फिर कौन से नाले को रसा कहते हैं ॥ ४ ॥
है परे सरहदे इदराक से अपना मस्जूद
किब्ले को अहले नजर किब्ला नुमा कहते हैं ॥ ५ ॥
पाए अफगार पे जब से तुझे रहम आया है
खारे रहको तिरे हम मेहरे गया कहते हैं ॥ ६ ॥
इक शरर दिल में है उससे कोई घबरायेगा क्या
आग मतलूब है हमको जो हवा कहते हैं ॥ ७ ॥
देखिए लाती है उस शोख की निख्वत क्या रंग
उसकी हर बात पे हम नामे खुदा कहते हैं ॥ ८ ॥
'वहशत' व 'शेफ्ता' अब मरसिया कहदें शायद
"मर गया 'गालिबे' आशुफ्ता नवा" कहते हैं ॥ ९ ॥

(१) प्रिया माझ्याशीं एकनिष्ठ राहूं लागली कीं, माझे प्रतिस्पर्धी म्हणतात कीं तिनं आपला छळ चालविला आहे नाहीतरी कोणत्याही चांगल्या गोष्टीला नांवें ठेवण्याची जगाची रीतच आहे

(२) आज आपली प्रेमकहाणी प्रियेला सांगावी असा आम्ही निश्चय केला आहे पण तिच्या नजरेला नजर भिडल्यानंतर ही कहाणी आम्ही सांगू शकतों का आणखी काहीं तोंडावाटे बाहेर पडतें ह्याची परीक्षा आहे

(३) हे गतकाळचे लोक आहेत ह्यांना वाटतें कीं, मद्य आणि संगीत म्हणजे शोकहारी आहेत ह्यांना काय माहीत कीं, ह्याच्यामुळें आमचीं दु खें अजून तीव्र होतात पण हे जुने लोक साधेभोळे आहेत ह्यांना नांव ठेवू नका

(४) विरहांत प्रेमिकाचं सारखें आक्रंदन चालू आहे इकडे त्याचें आक्रंदन प्रियेच्या कानावर पडलं आणि तिकडे प्रेमिकाची शुद्ध गेली शुद्धीवर आल्यावर प्रेमिकाला वाटतें कीं, आपलें आक्रंदन प्रियेच्या कानावर गेलं जर हें जाणार नाहीं तर सफळ आक्रंदन म्हणायचें कशाला ?

(५) माझें प्रार्थनास्थळ बुद्धीच्याही पलीकडे आहे लोक ज्याला किब्ला (मक्का) म्हणतात तो तर माझ्या प्रार्थनागृहाची वाट दाखविणारी खूण आहे

(६) काट्याकुट्यांनीं रक्ताळलेल्या माझ्या पायांवर तुला दया आली हे प्रिये, त्या दिवसापासून आम्हाला ते काटे म्हणजे औषधाच्या वाडी वाटू लागल्या आहेत

(७) आमच्या हृदयांत आगीच्या ठिणग्या आहेत त्यांना भ्यायची काय आवश्यकता आहे ? उलट आमच्या श्वासोच्छ्वासानें ती आग आणखी गरम होत आहे हं आम्हाला हवेंच आहे

(८) प्रियेच्या प्रत्येक विभ्रमाला आम्ही मोहून धन्य धन्य म्हणत आहोंत ह्या स्तुतीनें भारून ती अजून काय नवीन नवीन रंग दाखविते ते पाहूं या

(९) वेडाचीं गीतें गाणारा गालिब मेला कदाचित् त्याचे कविमित्र वहशत आणि शेफ्ता त्याच्यावर शोकगीतें रचतील.

आबरू क्या खाक उस गुल की के गुल्शन मे नहीं
८० . . . हे गरेबा नगे पेराहन जो दामन में नहीं ॥ १ ॥
जोफ से ऐ गिरिया कुछ बाकी मेरे तन मे नहीं
रंग होकर उड गया, जो खू के दामन में नहीं ॥ २ ॥

हो गये हैं जम्अ अजज़ाए निगाहे आफताब
ज़र्रे उसके घर के दीवारो के रौज़न में नहीं ॥ ३ ॥
क्या कहूं तारीकिए ज़िन्दाने गम अंधेर है
पम्बा नूरे सुबह से कम जिसके रौज़न में नहीं ॥ ४ ॥
रौनके हस्ती है इश्के खाना वीरां साज़ से
अंजुमन बे शम्अ है गर वर्क़ खिरमन में नहीं ॥ ५ ॥
ज़ख्म सिलवाने से मुझपर चारा जोई का है तान
गैर समझा है के लज़्ज़त ज़ख्मे सोज़न में नहीं ॥ ६ ॥
बस्के हैं हम इक बहारे नाज़ के मारे हुए
जल्वए गुल के सिवा गर्द अपने मदफन में नहीं ॥ ७ ॥
कतरा कतरा इक हयूला है नये नासूर का
खूं भी ज़ौक़े दर्द से फारिग मेरे तन में नहीं ॥ ८ ॥
लेगई साकी की निख़वत कल्ज़ुम आशामी मेरी
मौजे मै की आज रग मीना की गर्दन में नहीं ॥ ९ ॥
हो फिशारे ज़ोफ मैं क्या नातुवानी की नमूद ?
कद के झुकने की भी गुजाइश मेरे तन में नहीं ॥ १० ॥
थी वतन में शान क्या 'गालिब' के हो गुर्बत में कद्र
बेतकल्लुफ हू वो मुश्ते खस के गल्ख़न में नहीं ॥ ११ ॥

) जें फूल बागेंत नाहीं ते फूल तुच्छ होय. आणि जें कापड प्रेमवेडात फाडलें तें तुच्छ होय.

(२) हे अश्रूंनो, आत्यंतिक निःशक्ततेमुळें माझ्या आगात कांहीं राहिलें नाहीं. अगांतील सारें रक्त अश्रूंच्या रूपानें वाहून गेलें आणि उरलेलें वाळून उडून गेलें (अशक्ततेमुळें चेहरा फिक्कट होतो. निरोगी अवस्थेंत चेहेऱ्याचा लाल रग होता तो उडून गेला.)

(३) हे प्रिये, तुझ्या घरच्या भिंतीच्या फटींतून सूर्याच्या किरणाबरोबर जे हजारों कण उडत येताना दिसत आहेत, ते कण नव्हेत, तर सूर्यच तुझ्या दर्शनाच्या इच्छेनें घरात प्रवेश करीत आहे.

(४) माझ्या हृदयाच्या शोकागारात इतका अंधार पसरला आहे कीं, भिंतीच्या फटींत कापसाचा एक तुकडा ठेवला तरी उजेड आल्याचा भास होतो.

(५) जगात जो रस आणि रंग दिसतो तो केवळ प्रेमामुळें ही वीन जीवनात नसेल तर तें दिव्यावाचून असलेल्या मैफिलीसारखें आहे

(६) मी जखमातून टाके लावून घेत आह हें पाहून प्रतिस्पर्ध्याला वाटते कीं माचें प्रेम खरें नाहीं नाहीतर जखमा शिवून घेण्याच कारण काय ? जखमा शिवून घेताना सुईच्या टोंचण्यामुळें जी लज्जत येते, त्याची कल्पना त्याला नाहीं म्हणून तो असा संशय घेतो जखमा भराव्या म्हणून मी टाके लावून घेत नाहीं तर सुई टोंचण्याचा आनंद अनुभवावा हा माझा हेतु आहे

(७) आम्ही तर प्रेयसीच्या हातून मृत्युमुखीं पडलेले रसिक मग आमच्या थडग्यात धुळीच्या ऐवजीं फुलाचा खच पडलेला दिसणार यात काय आश्चर्य ?

(८) माझ्या रक्ताचा प्रत्येक बिंदु म्हणजे एक जखमेचा फोडच म्हणजे माझ्या रक्ताला व्यथेची आणि व्रणाची किती आसक्ति आहे ह समजून येईल

(९) साकीला वाटे कीं, आपण हवी तितकी दारू पाजू शकू पण माझ्या पिण्यापुढें त्यान हात टेकले मदिरेच्या सुरईवरही आता गर्वाचा आणि अहंकाराचा मागमूस दिसत नाहीं

(१०) निःशक्ततेनें मला चहूंकडून इतकें दाबून धरलें आहे कीं, फोंक काढून वाकणेंही मला अशक्य होऊन बसलें आहे (दावण ह्या शब्दावरून शरीर झुकणेंही अशक्य झालें अशी कल्पना केली आहे)

(११) मी परदेशात आहें येथें माझी कदर कोण करणार ? अतिशयोक्ति नाहीं मी म्हणजे पानपाचोळा आणि तोही आगींत न सापडलेला म्हणजे दग्ध होण्याचेंही नशीबीं नसलेला

८१ . . . अहदे से मदहे नाज़ के बाहर न आसका
गर इक अदा हो तो उसे अपनी कज़ा कहूं ॥ १ ॥

हल्के हैं चश्महाये कुशादा ब सूए दिल
हर तारे जुल्फ को निगहे सुरमा सा कहूं ॥ २ ॥

मैं और सद हज़ार नवाए जिगर खराश
तू और एक वो न शुनीदन के क्या कहूं ॥ ३ ॥

ज़ालिम मेरे गुमा से मुझे मुनफइल न चाह
है है खुदा न करदा, तुझे बेवफा कहूं ॥ ४ ॥

( १ ) प्रियेच्या विविध लीलाची स्तुति करणें माझ्या आवाक्याबाहेरचें आहे तिचा एखादा विभ्रम असता तर त्याच्यावर जीव ओवाळून टाकीन असें म्हणून स्तुति केली असती परंतु तिच्या शेंकडों विभ्रमाची तारीफ करण्यास मी असमर्थ ठरलों

( २ ) तिच कुटिल कुंतल म्हणजे माझ्या हृदयावर ताव गाजविण्याकरिता टक लावून पाहात असलेले डोळेच आणि तिच्या कलापाचा एकेक केस म्हणजे त्या डोळ्याची काजळच

( ३ ) मी म्हणजे हृदय फाटून निघतील अशीं असंख्य आक्रंदनें करणारा आणि तू म्हणजे एक सुद्धा ऐकून न घेणारी, ह्याला काय म्हणावें ?

( ४ ) माझें हृदय म्हणत कीं, प्रिया निष्ठारहित आहे पण मन म्हणतें कीं, नाहीं ती माझ्याशीं एकनिष्ठ आहे पण हे प्रिये, ह्यामुळें तू गैरसमज होऊं देऊं नकोस मी तुला निष्ठारहित म्हणून म्हणणे शक्यतरी आहे का ?

८२ . . . मेहरबा होके बुलालो मुझे चाहो जिस वक्त
में गया वक्त नहीं हू के फिर आभी न सकू ॥ १ ॥
जोफ में तानए अगयार का शिकवा क्या है
बात कुछ सर तो नहीं है कि उठा भी न सकू ॥ २ ॥
जहर मिल्ता ही नहीं मुझको सितमगर वरना
क्या कसम है तेरे मिल्ने की के खा भी न सकू ॥ ३ ॥

( १ ) हे प्रिये, तूं कृपावंत होऊन हवें तेव्हा मला बोलाव मी काहीं गतकाळ नाहीं कीं पुन्हा परत येणार नाहीं

( २ ) माझ्या नि शक्ततत प्रतिस्पर्धी मला खेंचून बोलतात त्याचें वाईट का वाटून घ्यायचें ? त्याचे शब्द म्हणजे काहीं माझें डोकें थोडेंच आहे ? कीं निशक्ततेंत मी तें वर उचलूं शकणार नाहीं ? ( झेलूं शकणार नाहीं ? )

( ३ ) मरण पत्करायला मला विष मिळत नाहीं म्हणून नाहीतर काय, तें विष आहे, खायला काय अडचण आहे ? तुला भेटण्याची ती काय शपथ आहे कीं खाता ( घेता ) येत नाहीं ?

८३ . . . हमसे खुलजाओ बवक्ते मै परस्ती एक दिन
वरना हम छेडेंगे रखकर उज्रे मस्ती एक दिन ॥ १ ॥
गुर्रए औजे बिनाए आल्मे इम्का न पूछ
इस वलन्दी के नसींबो में है पस्ती एक दिन ॥ २ ॥

कर्ज की पीते थे मै, लेकिन समझते थे के हा
रग लायेगी हमारी फाका मस्ती एक दिन ॥ ३ ॥

नग्महाए गम को ही ऐ दिल गनीमत जानिए
बेसदा हो जायगा यह साजे हस्ती एक दिन ॥ ४ ॥

धौल धप्पा उस सरापा नाज का शेवा नहीं
हम ही कर बैठे थे 'गालिब' पेश दस्ती एक दिन ॥ ५ ॥

(१) आपल्या मदिरेच्या मैफिलींत नि सकोचपणें वाग वर नाहींतर मीच एक दिवस मदिरेंत बेहोष झाल्याचें सोंग आणून तुझ्याशीं अतिप्रसग करून बसेन

(२) ह्या नाशवंत जगातील आपल्या उत्कर्षावर गर्व धरूं नकोस कारण ह्या उत्कर्षामागें नाशाचींही चिन्हें स्पष्ट आहेत

(३) कर्ज काढून आम्ही दारू पीत होतों पण एक ना एक दिवस ह्या फाकेमस्तीचा परिणाम भोगावा लागेल ह्याची आम्हाला पुरेपूर जाणीव होती

(४) हे हृदया, ह्या शोकगीतानाच बरे समज अरे एक दिवस जीवनाच वाद्यच निस्तब्ध होईल हें लक्षात राहूं दे

(५) अधिक प्रसग करण्याचा त्या चंचल प्रियेचा स्वभावच नव्हे सुरुवात आमच्या कडूनच झाली होती

८४ . . . हम पर जफा से तर्के वफा का गुमा नहीं
एक छेड है वगरना मुराद इम्तिहा नहीं ॥ १ ॥

किस मुँह से शुक्र कीजिये इस लुफ्ते खास का
पुरसिश है और पाए सुखन दरमिया नहीं ॥ २ ॥

हमको सितम अजीज सितमगर को हम अजीज
ना मेहरबा नहीं है अगर मेहरबा नहीं ॥ ३ ॥

बोसा नहीं, न दीजिये दुश्नाम ही सही
आखिर जबा तो रखते हो तुम गर दहा नहीं ॥ ४ ॥

हर चन्द जा गुदाजिए कहरो इताब है
हर चन्द पुश्ते गर्मिए ताबो तवा नहीं ॥ ५ ॥

जां मुतरिबे तरानए हलमिन मजीद है
लब पर वो संजे जमज़मए अल अमां नहीं ॥ ६ ॥
खंजर से चीर सीना अगर दिल न हो दुनीम
दिल में छुरी चुभो मिज़ां गर खूंचकां नहीं ॥ ७ ॥
है नंग सीनये दिल, अगर आतिश कदा न हो
है आरे दिल नफस अगर आज़र फिशां नहीं ॥ ८ ॥
—नुकसां नहीं जुनूं में बला से हो घर खराब
सौ गज़ जमीं के बदले बियाबां गरां नहीं ॥ ९ ॥
कहते हो " क्या लिखा है तेरी सर नविश्त मे
गोया जबीं पे सिजदए बुत का निशां नहीं ॥ १० ॥
पाता हूं उससे दाद कुछ अपने कलाम की
रूहुल कुदस अगरचे मेरा हम जबां नहीं ॥ ११ ॥
जां है बहाए बोसा बले क्यों कहे अभी
' ग़ालिब ' को जानता है के वो नीम जां नहीं ॥ १२ ॥

(१) प्रिया माझा छळ करीत आहे पण म्हणून तिला माझ्या प्रेमाबद्दल संशय आला आहे असें समजू नका. हा तिचा छंद आहे. परीक्षा पाहाण्याचें तिच्या मनांत नाहीं.

(२) संकेतानें आणि खुणांनीं ती माझ्याकडे आपलें लक्ष आहे असें दाखविते. संभाषणाचा पडदा मध्ये न ठेवतां तिनें व्यक्त केलेल्या भावाबद्दल मी कोणत्या शब्दांनीं आभार मानूं ?

(३) आम्हाला छळ आवडतो. आणि प्रियेला आमचा छळ करणें आवडतें. ह्यावरुन आम्ही तिला आवडतों, हें सिद्ध झालें. नाहींतरी मनुष्य आपल्याच माणसाचा छळ करतो ना. निदान आमच्यावर तिची कृपा नसली तरी अवकृपा नाहीं हें खास.

(४) चुंबन देणें नको असेल तर नको देऊ. चुंबन देण्यास तुझ्यापाशीं ओंठ नसले तरी अपशब्द बोलण्याकरितां तुझ्या तोंडांत जीभ तरी आहे ना ?

(५) तिची अवकृपा दाहक आहे. आणि ती सहन करण्यास आमच्यापाशीं शक्ति नाहीं. तरीपण आम्हाला तिनें आमचा छळ केलेला आवडतो.

(६) तिच्या छळाला आम्ही आतां पुरे कर, त्राहिमां, त्राहिमां, म्हणत नाहीं. उलट त्यामुळें आमच्या जीवनाचें वाद्य पूर्वीपेक्षांही जास्त मधुर ध्वनि करीत आहे.

(७) तुझे हृदय दुभंगले नसेल तर त्यात खंजीर खुपसून त्याचे तुकडे कर आणि तुझ्या डोळ्याना रक्ताची धार नसेल तर हृदयात खंजीर भोसकून डोळ्यातून रक्त वाहू दे

(८) ज्या हृदयात दाहक अग्नि नाहीं तें हृदय तुच्छ होय आणि ज्या श्वासोच्छ्वासात ठिणगी नाहीं ते तुच्छ होय

(९) प्रेमवेडात माझे घर उध्वस्त झाले तर मग त्याची पर्वा नाहीं त्याच्या मोबदल्यात भटकण्यास वैराण आणि विशाल वाळवंट मिळाले हा सौंदा कांहीं महाग म्हणता यावयाचा नाहीं

(१०) तुझ्या ललाटावर काय लिहिलें आहे असें काय विचारतोस ? अरे प्रियेच्या उंबरठ्यावर कपाळ घासून घासून त्यावर घट्टे पडलेले तुला दिसत नाहींत काय ?

(११) देवदूताची आणि माझी वाणी वेगळी असली तरी ते माझ्या काव्याची स्तुतीच करतात अर्थात् माझी वाणी दैवीच म्हटली पाहिजे

(१२) एक चुंबनाची किंमत म्हणजे प्राणापेक्षा कमी नाहीं पण प्रिया आताच म्हणत नाहीं कीं तुझे प्राण देऊन माझ चुंबन घे, म्हणून कारण अद्याप माझ्या कुडींत प्राण आहे मी नीमजान होऊन म्हणजे अर्ध्या प्राणाला मुकलो म्हणजे ती म्हणेल कीं, तुला चुंबन हवें ना ? मग तुझा सगळा प्राण पाहिजे अर्ध्यामुर्ध्या प्राणान माझें समाधान होणार नाहीं तेव्हा मी शाबूत प्राण कोठून आणू ? सारांश माझा छळ करावा असा तिचा हेतु आहे, हे उघड आहे

८५ . . . माने दश्ते नवर्दी कोई तदबीर नही
एक चक्कर है मेरे पाव में जंजीर नहीं ॥ १ ॥

शौक उस दश्त में दौडाए है मुझको के जहा
जादा ग र अज निगहे दीदए तस्वीर नहीं ॥ २ ॥

हसरते लज्जते आज़ार रही जाती हैं
जादए राहे वफा जुज दमे शमशीर नहीं ॥ ३ ॥

रंजे नौमीदिए जावीद गवारा रहियो
खुश हू गर नाला जबूनी कशे तासीर नहीं ॥ ४ ॥

सर खुजाता है जहा जख्मेसर अच्छा हो जाय
लज्जते संग बअन्दाजए तस्वीर नहीं ॥ ५ ॥

जन करम रुख़सते बेबाकी व गुस्ताखी दे
कोई तकसीर बजुज़ खजलते तकसीर नहीं ॥ ६ ॥
' गालिब ' अपना यह अकीदा है बकौले ' नासिख '
" आप बे बहरा है जो मोतकिदे ' मीर ' नहीं ॥ ७ ॥

(१) वणवण भटकण्याचा जो छंद मला लागला आहे, त्याला इलाज नाही. माझ्या पायात तुम्ही बेड्या घातल्या तरी माझ्या मतें त्या बेड्या नव्हेत पायाला भिंगरी बांधली असेंच मी समजेन

(२) प्रेमवेडात मी अशा कठीण ठिकाणी पोहोंचलों आहें कीं, तें पाहून कोणीही चित्रासारखें तटस्थ होऊन राहावें

(३) प्रियेच्या छळामुळे जी व्यथा होते तिची लज्जत चाखावी असें नेहमीं मनात येतें पण काय करावें ? ती इच्छा पूर्ण होत नाही कारण प्रेमनिग्रह म्हणजे तलवारीचें तीक्ष्ण पातें होय त्या मार्गावर पहिलें पाऊल टाकलं कीं मृत्यु आलाच मग व्यथेची लज्जत अनुभवण्यास अवकाश कोठला ?

(४) परमेश्वरानं मला कायमच दु खी निराश करून ठेवावें म्हणजे माझ्या निश्वासाना सफलतेच ऋणी होण्याची पाळी येणार नाही

(५) वेडात मुलानीं दगड मारल्यामुळें डोकं ठेचून निघालं आता त्या जखमा बऱ्या होऊं लागल्या आहेत ह्याचच लक्षण म्हणून डोकें खाजवूं लागलें आहे आता पुन्हा दगडाचा मार झेलण्यास हरकत नाही कारण प्रेमवेडात अशा अवस्थेची गोडी अवर्णनीय आहे

(६) प्रियाच जेव्हा नि संकोचपणें वागण्याची परवानगी देते तेव्हा संकोच करणं किंवा मागें फिरणें ह्यापेक्षा अधिक असा कोणताच गुन्हा असू शकत नाही

(७) गालिब, कवि नासिखच्या तत्त्वाप्रमाणेंच माझेंही मत आहे कीं, जो कवि मीरचा भक्त नाही तो अरसिक आणि कमनशीबीच समजला पाहिजे

मत मर्दुमके दीदा में समझो ये निगाहें
८६ . . . हैं जम्अ सुवेदाये दिले चश्म में आहें ॥ १ ॥
बरशगाले गिरियए आशिक़ है देखा चाहिये
खिल गई मानिन्दे गुल सौ जा से दीवारे चमन ॥ १ ॥
उल्फ़ते गुल से गलत है दावए वारस्तगी
सर्व है बावस्फ़े आज़ादी गिरफ्तारे चमन ॥ २ ॥

१३७ . . . .

(१) माझ्या डोळ्यांतील बुबुळांतून तुम्हाला दृष्टि म्हणून जी वाटते, ती दृष्टि नाही. माझ्या हृदयाच्या अंतरींच्या खुणा निश्वासरूप होऊन (आकांक्षा) तेथें बसल्या आहेत असें समजा.

(१) प्रेमिकांचें हें रुदन म्हणजे मुसळधार पाऊसच. त्यामुळें बागेंतील भिंतींना शंभर ठिकाणीं चिरे पडले आहेत. उमललेल्या फुलांसारखीं ह्या भिंतींनी आपलीं तोंडें उघडलीं आहेत.

(२) फुलाच्या प्रेमाच्या बंधनांतून कोण निसटूं शकेल? ह्या सुरूच्या झाडाकडे पाहा. हा आपल्याला स्वतंत्र आणि स्वच्छंदी म्हणवितो पण ह्या फुलांच्यामुळें बागेंतून त्याचा पाय बाहेर तरी पडतो का?

८७ . . . इश्क तासीर से नौमीद नहीं
जां सुपारी शजरे बेद नहीं ॥ १ ॥
सल्तनत दस्त बदस्त आई है
जामे मै ख़ातिमे जमशीद नहीं ॥ २ ॥
है तजल्ली तेरी सामाने वजूद
ज़र्रा बे परतवे ख़ुर्शीद नहीं ॥ ३ ॥
राज़े माशूक न रुस्वा हो जाय
वरना मर जाने में कुछ भेद नहीं ॥ ४ ॥
गर्दिशे रंगे तरब से डर है
ग़मे महरूमिए जावीद नहीं ॥ ५ ॥
कहते हैं जीते हैं उमीद पे लोग
हम को जीने की भी उमीद नहीं ॥ ६ ॥

(१) प्रेमाला फळासंबंधीं निराश होण्याचें कारण नाहीं. जिवाचा निर्धार म्हणजे फळ न येणारें वेताचें झाड थोडेंच आहे?

(२) सम्राट जमशीदच्या दारूचा पेला म्हणजे मद्यपानाचें शेवटचें पर्व थोडेंच होतें? ती परंपरा तर पिढ्यानपिढ्या आमच्यापर्यंत आली आहे.

(३) ह्या सृष्टीचें अस्तित्व हे परमेश्वरा, तुझ्या धारणामुळेंच आहे. धूळीचा कण जसा सूर्यकिरणाशिवाय प्रकाशित होऊं शकत नाहीं तद्वतच तुझ्या प्रेरणेशिवाय हें विश्व अस्तित्वांत येणें शक्य नाहीं.

(४) आम्हाला मरणाचें काहीं भीतियुक्त गूढ वाटतें म्हणता काय ? छे! तसें मुळींच नाहीं त्यामुळें प्रियेचे आमच्याशीं असलेले प्रेम उघडं पडून तिचा दुर्लौकिक होईल ह्याची भीति वाटते.

(५) मला चिरकालिन यंचनेचें दु:ख वाटत नाहीं. सुख आणि दु:खाच्या फिरत राहाणाऱ्या फेऱ्यापेक्षा तें वरें नाहीं का ? कारण सुखामागें दु:ख असह्य वाटतें.

(६) लोक आशेवर जगतात असे म्हणतात. आम्हाला तर जगण्याचीही आशा नाहीं

—जहा तेरा नक़्शे कदम देखते है
८८ . . . ख़ियाबा ख़ियाबा इरम देखते हैं ॥ १ ॥

दिल आशुफ्तगाने खाले कुंजे दहन के
सुवेदा में सैरे अदम देखते हैं ॥ २ ॥

तेरे सर्वे कामत से इक़ कदे आदम
कियामत के फितने को कम देखते हैं ॥ ३ ॥

तमाशा कर ऐ महवे आईना दारी
तुझे किस तमन्ना से हम देखते है ॥ ४ ॥

सुराग़े तफ़े नाला ले दागे दिल से
के शबरौ का नक्शे कदम देखते है ॥ ५ ॥

बनाकर फकीरों का हम भेस 'गालिब'
तमाशाए अहले करम देखते हैं ॥ ६ ॥

(१) हे प्रिये, तुझीं पावलें ज्या ज्या ठिकाणीं पडतात तेथें नंदनवनातील बहरून निघालेलीं हजारों फुलझाडें पाहिल्याचा मला भास होतो.

(२) तुझ्या गालावरचा तीळ जो पाहातो त्याला स्वर्गांतून फेरी मारून आल्याचा आनंद होतो.

(३) हे प्रिये, तुझी शरीरयष्टि पाहून हृदयात जो कोलाहल माजतो त्यासमोर कल्पान्ताची (कियामत) स्थिति म्हणजे काहींच नाहीं.

(४) हे प्रिये, आरशात प्रतिबिंब पाहाण्यात तू मग्न झाली आहेस. जरा आमच्याकडे पाहशील कीं नाहीं ? तुझी नजर आमच्याकडे वळावी म्हणून आम्ही किती उत्कंठेने तुझ्याकडे पाहात आहों.

(५) रात्रीच्या प्रवासाची खूण त्याच्या पदचिन्हांनी सापडावी तसेंच माझ्या दाहक निश्वासाचा शोध तुम्हाला माझ्या हृदयाच्या जखमावरून सापडेल

(६) गालिब, मी काहीं फकीर नाहीं पण उदाराचें औदार्य कितपत आहे ह अजमावण्याकरिता मी हीं भगवीं वस्त्रें धारण केली आहेत

८९. . . मिलती है खूए यार से नार इल्तिहाब मे
काफिर हू गर न मिलती हो राहत अजाब में ॥ १ ॥
कब से हू, क्या बताऊ जहाने खराब में
शबहाए हिज्र को भी रखू गर हिसाब में ॥ २ ॥
ता फिर न इन्तिज़ार में नीन्द आये उम्र भर
आने का अहद कर गये आये जो ख्वाब में ॥ ३ ॥
कासिद के आते आते खत इक और लिख रखूं
मैं जानता हू जो वो लिखेंगे जवाब में ॥ ४ ॥
मुझ तक कब उनकी बज्म में आता था दौरे जाम
साकी ने कुछ मिला न दिया हो शराब में ॥ ५ ॥
जो मुन्किरे वफा हो फरेब उस पे क्या चले
क्यों बदगुमा हू दोस्त से दुश्मन के बाब में ॥ ६ ॥
मे मुज़तरिब हू वस्ल में ख़ौफे रकीब से
डाला हैं तुमको वहम ने किस पेचो ताब में ॥ ७ ॥
में और ख़ते वस्ल खुदा साज़ बात है
जा नज्र देनी भूल गया इज्तिराब में ॥ ८ ॥
है तेवरी चढी हुइ अन्दर नकाब के
है इक शिकन पडी हुई तर्फे नकाब में ॥ ९ ॥
लाखों लगाव एक चुराना निगाह का
लाखो बनाव एक बिगडना इताब में ॥ १० ॥
वो नाला दिल में खस के बराबर जगह न पाये
जिस नाले से शिगाफ पडे आफताब में ॥ ११ ॥

वो सहर मुद्आ तलबी में न काम आये
जिस सहर से सफ़ीना र वां हो सराब में ॥ १२ ॥

'ग़ालिब' छुटी शराब पर अब भी कभी कभी
पीता हूं रोजे अब्रो शबे माहताब में ॥ १३ ॥

(१) गोष्टीगोष्टीला प्रिया मला ताप देते, छळते. हें तिचे वर्तन म्हणजे आगीचें जाळणें, पोळणें, तापविणें असल्यासारखेंच आहे. पण ह्यांतच मला आनंद आहे. हें मी नाकबूल करीन तर मला तुम्ही काफ़र म्हणा.

(२) ह्या दु:सह परिस्थितींत किती युगें लोटलीं हें कांहीं मला सांगता यावयाचें नाहीं. त्यात जर विरहाच्या रात्री मिळविल्या तर मग विचारणेंच नको. कारण विरहाची एकेक रात्र म्हणजे दु:खाचें एकेक युगच होय.

(३) तिनें मी भेटण्यास येईन असें मला स्वप्नांत येऊन वचन दिलें होतें. तिची लबाडी पाहा. तिच्या प्रतिक्षेत आता माझी झोंप उडून गेली आहे.

(४) मी तिला निरोप्याच्या हातीं पत्र पाठविलें आहे. तो परत येईपर्यंत आणखी एक पत्र लिहून ठेवतों. कारण माझ्या पत्राचें ती काय उत्तर देणार हें मला माहीत आहे.

(५) प्रियेच्या मैफिलींत साकी माझ्यापर्यंत दारूचे पेले घेऊन कधीं येत होता? पण आज ज्याअर्थी पेला आला आहे, त्याअर्थी मला खात्री आहे कीं, साकीनें, प्रेमातील माझ्या त्या प्रतिस्पर्ध्यानें दारूंत काहींतरी मिसळलें असलें पाहिजे.

(६) ती कुणाशींही प्रेम करीत नाहीं ह्याची मला खात्री आहे. मग ती माझ्या प्रतिस्पर्ध्यावर प्रेम करीत असावी असा मी निष्कारण गैरसमज का करून घ्यावा?

(७) मीलनाच्या वेळीं माझा प्रतिस्पर्धी कुठें ऐनवेळीं भडकतो कीं काय? ह्या काळजींत मी आहें. पण हे प्रिये, तू कशामुळें अस्वस्थ आहेस? हें सांगशील? का मी दुसरीच्या नादीं लागून तिला चोरून तुझ्याकडे आलों असेन ह्या शंकेनें का तू व्याकुळ झाली आहेस?

(८) मी आणि मीलनाची शक्यता? हा परमेश्वरी योगच म्हटला पाहिजे. ह्या मीलनाकरितां मला प्राणच अर्पण करण्यास हवे होते. पण मीलनाच्या आनंदांत ह्या गोष्टीचा मला विसर पडला.

(९) प्रियेनें बुरख्याच्या आंत कपाळाला आंठ्या घातलेल्या दिसतात. म्हणूनच बुरख्यावर कपाळाच्या ठिकाणीं सुरकुती पडली आहे.

(१०) प्रियेचे शेंकडों संकेत आणि इशारे असोत पण तिची एक चोरटी नजर ह्या सर्वांपेक्षा जास्त प्रभावी आहे तसेंच तिचे अनेक शृंगार असोत पण तिचा एक रुसवा सर्व शृंगारापेक्षा जास्त आहे

(११) आश्चर्य आहे! माझ्या दाहक निश्वासानीं सूर्यालाही भेगा पडतात पण प्रियेच्या मनावर त्याचा यत्किंचितही परिणाम होत नाहीं

(१२) वाळवंटात दुरून मृगजळ दिसतें चमकणाऱ्या वाळू मृगजळात नावासारख्या इकडून तिकडे फिरत असल्यासारखे वाटतात पण असा चमत्कार माझ्या प्रेमपूर्तीच्या बाबतींत का दिसून येऊं नये?

(१३) गालिब, दारू तर सोडली पण अद्यापि चांदण्या रात्रींत आणि अभ्राच्छादित आकाश असेल त्या दिवशीं मी दारू पीतच असतों

कल के लिये कर आज न ख़िस्सत शराब में
९० . . . यह सूए ज़न है, साक़िए कौसर के बाब में ॥ १ ॥

है आज क्यों ज़लील के कल तक न थी पसन्द
गुस्ताख़िए फ़िरिश्ता हमारी जनाब में ॥ २ ॥

जां क्यों निकलने लगती है तनसे दमे समा
गर वो सदा समाई है चंगो रबाब में ॥ ३ ॥

रौ में है रख़्शे उम्र कहां देखिये थमे
नै हाथ बाग पर है न पा है रिकाब में ॥ ४ ॥

उतना ही मुझको अपनी हक़ीक़त से बुउद है
जितना के वहमे ग़ैर से हूं पेचोताब में ॥ ५ ॥

अस्ले शुहूदो शाहिदो मशहूद एक है
हैरां हूं फिर मुशाहदा है किस हिसाब मे ॥ ६ ॥

है मुश्तमिल नमूदे सूर पर वजूदे बहर
यां क्या धरा है क़तरए मौजो हबाब में ॥ ७ ॥

शर्म इक अदाए नाज़ है अपने ही से सही
हैं कितने बेहिजाब के हैं यों हिजाब में ॥ ८ ॥

आराइशे जमाल से फारिग नहीं हनूज
पेशे नजर है आईना दायम नकाब में ॥ ९ ॥

है ग़ैब ग़ैब जिसको समझते हैं हम शुहूद
हैं ख्वाब में हनूज जो जागे हैं ख्वाब में ॥ १० ॥

' ग़ालिब ' नदीमे दोस्त से आती है बूए दोस्त
मशगूले हक हू बन्दगीए बूतुराब में ॥ ११ ॥

( १ ) हे साकी, आम्हाला दारू पाजण्यात संकोच करू नको बरें. तुला काय वाटतें कीं स्वर्गांत अमृत पाजणारा साकी आम्हाला पोटभर अमृत पिण्यास देणार नाहीं ? ( आम्ही येथे निषिद्ध मद्य पितों म्हणून ) अरे, स्वर्गांतील साकी उदार आहे. त्याच्यावर भलताच वहीम घेणें बरें नाहीं.

( २ ) परमेश्वरानें मानव निर्माण केला आणि फिरस्त्याना ( देवदूताना ) आज्ञा केली कीं, तुम्ही मानवाला वंदन करा. कवि म्हणतो, ' हे परमेश्वरा, कालपर्यंत तर आमचा असा मान होता कीं, आमच्याविरुद्ध देवदूतानींही कांहीं म्हटलें तर तुम्ही ऐकून घेण्यास तयार नव्हता मग आमची अशी हीनदशा का झाली ?

( ३ ) परमेश्वराचीं भजनें ऐकत असता आमचे प्राण जाण्याची वेळ का यावी ? उलट संगीत वाद्यातून ज्याअर्थी भक्तिपर सूर निघत आहेत त्यामुळें आम्हाला नवजीवन प्राप्त व्हावयास हवें होतें.

( ४ ) जीवनाचा घोडा तुफान वेगानें चालला आहे ह्या घोड्याची लगाम हातात नाहीं आणि रिकिबींत आमचे पाय नाहींत. हा जीवनाचा घोडा अनावर आहे.

( ५ ) हे जग मिथ्या आहे. एक परमेश्वर सत्य आहे. म्हणून मी ह्या मायावी संसारात जितका गुरफटतों, तितकाच परमेश्वरापासून दूर होत आहें.

( ६ ) मुमुक्षूंना सृष्टीमध्यें कणाकणातून परमेश्वर स्वरूपाचा प्रत्यय येतो. जेव्हा द्रष्टा ( परमेश्वर ) दृश्य ( सृष्टि ) हीं एकच आहेत तर मुशाहिदा ( दृश्य ) वेगळें कसें ? एक परमेश्वराशिवाय दुसरें सत्य नाहीं. तर मग हा सर्व गोंधळ कशाचा ?

( ७ ) जलबिंदु, लाटा इत्यादींचें स्वतंत्र अस्तित्व काय आहे ? कांहींच नाहीं. हें सर्व समुद्रामुळें आहे. आणि समुद्रामुळेंच ह्या गोष्टी दिसून येत आहेत. परमेश्वरामुळेंच ही सर्व चराचरसृष्टि आहे. तिला स्वतंत्र अस्तित्व नाहीं.

( ८ ) लज्जायुक्त होणें हाही एक विभ्रम आहे. पण प्रिया बुरखा वापरते आणि बुरख्याच्या आत तिला लाजण्याचें कारण उरत नाहीं. म्हणजे ती पडद्यात असून आणि

असल्यामुळें बिनपडद्यासारखें मोकळेपणानें वागत आहे. लज्जेचा उपयोग भावना लपविण्याकडे असतो त्याचें तिला कारण पडत नाहीं.

(९) प्रियेचें सौंदर्यप्रसाधन आणि शृंगार हीं अद्याप संपली नाहींत. पहा सुरत्याच्या आंत सुद्धां ती नेहमींच आरसा बाळगून असते.

(१०) मुमुक्षूला विश्वांत परमेश्वर स्वरूपाचा अनुभव येतो. वास्तविक हें विश्व म्हणजे भ्रम आणि माया आहे. परमेश्वर हेंच सत्य आहे. विश्वांच्या आंत म्हटलें कीं विश्व ही एक वेगळी वस्तु आहे, तिला स्वतंत्र अस्तित्व आहे असा ग्रह होतो असें समजणारे झोंपेंत जागृतीचें स्वप्न पाहून आम्ही जागे आहोंत, असें समजणारे पण वास्तविक झोंपेंत असलेलेच आहेत.

(११) हजरत अली हा परमेश्वराचा लाडका. त्याच्या सहवासांत मला परमेश्वर-भक्तीचा सुगंध अनुभवास येतो म्हणून मी अलीचीच भक्ति करतों आणि त्याच्याच आराधनेंत निमग्न आहें.

९१ . . . हैरां हूं, दिल को रोऊं के पीटूं जिगर को मैं
मक्दूर हो तो साथ रखं नौहागर को मैं ॥ १ ॥
छोड़ा न रश्क ने के तेरे घरका नाम लूं
हर इक से पूछतां हूं के जाऊं किधर को मैं ॥ २ ॥
जाना पड़ा रकीब के दर पर हजार बार
ऐ काश जानता न तेरी रहगुजर को मैं ॥ ३ ॥
है क्या! जो कसके बांधिए मेरी बला डरे
क्या जानता नहीं हूं तुम्हारी कमर को मैं ॥ ४ ॥
लो वह भी कहते हैं के "यह बेनंगो नाम है
यह जानता अगर, तो लुटाता न घर को मैं ॥ ५ ॥
चलता हूं थोड़ी दूर हर इक तेज़रौ के साथ
पहचानता नहीं हूं अभी राहबर को मैं ॥ ६ ॥
ख्वाहिश को अहमकों ने परस्तिश दिया करार
क्या पूजता हूं उस बुते बेदादगर को मैं ॥ ७ ॥
फिर बेखुदी में भूल गया राहे कूए यार
जाता वगरना एक दिन अपनी ख़बर को मैं ॥ ८ ॥

अपने पे कर रहा हूं कयास अहले दहर का
समझा हूं दिल पिज़ीर मताए हुनर को मैं ॥ ९ ॥

'गालिब' खुदा करे के सवारे समन्दे नाज़
देखूं अली बहादुरे आली गुहर को मैं ॥ १० ॥

(१) माझें हृदय आणि काळीज दोन्ही नष्ट होऊन गेलीं आहेत. आतां काय करावें समजत नाहीं. ह्या दोन्हींचा शोक करण्यास मला शक्ति नाहीं. का धंदेवाईक शोकगीतकांना कामाला लावूं ?

(२) हे प्रिये, तुझ्या घरचा शोध करणें आहे पण कुणाला विचारण्याची सोय नाहीं. कारण तुझ्या घरचें नाव घेऊन कुणाला विचारूं लागलों कीं तोच माझा प्रतिस्पर्धी बनायचा म्हणून वेड्यासारखें लोकांना मी हेंच विचारीत आहें कीं, अहो, मला कुठें जायचें आहे ? कुठें जायचें आहे ? अशी माझी विचित्र परिस्थिति झाली आहे.

(३) प्रिया प्रतिस्पर्ध्याच्या घरांत जाऊन राहिली आहे आणि मला त्यामुळें प्रतिस्पर्ध्याच्या घरीं वारंवार जावें लागत आहे. काय हें माझें अपमानास्पद जिणें ! त्यापेक्षां तूं कुठें राहातेस हें माहीत नसतें तरी बरें झालें असतें.

(४) याव, तुझा छळ करण्यास मला आता कंबर कसली पाहिजे, असें तूं म्हणतेस. मला ह्या धाकाचें हसूं येतें. अग कसायला तुला कंबर कुठें आहे ? (कृशकटीची कल्पना) हें मला माहीत कां नाहीं ?

(५) बघा, आतां प्रियाही म्हणूं लागली कीं हा अगदीं हलका आणि दरिद्री आहे. हें मला माहीत असतें तर प्रेमापायीं घरदार उध्वस्त करून कंगाल बसलों असतों ?

(६) मी परमेश्वरप्राप्तीकरितां मुमुक्षू बनलों. कुणात काहीं दिसलें कीं मी त्याला गुरु करतों आणि मोक्षपथांत कांहीं पावलें पुढें गेलों कीं, दुसऱ्याला गुरु करतों. इतके गुरु झाले आहेत कीं ह्या रस्त्यांतील हे वाटाडे मला ओळखूं येईनासे झाले आहेत. कारण प्रत्येक वाटाड्याबरोबर मी थोडा वेळ चालल्यावर त्याची संगत सुटते आणि मी दुसऱ्या वाटाड्याबरोबर चालूं लागतों.

(७) सकाम आराधनेला मूर्ख जग खरी भक्ति समजतें. मी त्या प्रियेची आराधना करीत आहें, ती सकाम आहे, निष्काम भक्ति नाहीं हें लोकांच्या लक्षात येत नाहीं.

(८) प्रियेच्या घरून आल्यापासून माझी शुद्ध हरली आहे. मला आतां कोणत्याच गोष्टीची स्मृति राहिली नाहीं. नाहींतर मी पुन्हा प्रियेच्या घरीं नसतों का गेलों ?

१४५ . . . .

(९) आपल्यावरून मी जग ओळखतों. मला गुणांची चहा आहे. पण माझा जगाविषयीं अंदाज चुकला. कारण जगाला गुणांची क्दर नाहीं.

(१०) आली गोहर अली बहादुरला उत्तम आणि ऐटबाज घोड्यावर आरूढ झालेले पाहावे अशी इच्छा आहे. (*गजलांतून वैयक्तिक उल्लेख मधूनमधून करण्याचा कवीचा शिरस्ता आहे.*)

९२ . . . जिक्र मेरा ब बदी भी उसे मंजर नहीं
गैर की बात बिगड़ जाये तो कुछ दूर नहीं ॥ १ ॥
वादए सैरे गुलिस्तां है खुशा ताले शौक
मुज़्दए क़त्ल मुक़द्दर है जो मज़कूर नहीं ॥ २ ॥
शाहिदे हस्तिए मुतलक की कमर है आलम
लोग कहते हैं के है पर हमें मंज़ूर नहीं ॥ ३ ॥
कतरा अपना भी हकीकत में है दरिया लेकिन
हमको तक़लीदे तुनक जर्फ़ीए मन्सूर नहीं ॥ ४ ॥
हसरत ! ऐ जौक़े खराबी, के वो ताक़त न रहीं
इश्के पुर अरबदा की गूं तने रंजूर नहीं ॥ ५ ॥
मै जो कहता हूं के हम लेंगे कयामत में तुम्हें
किस रऊनत से वो कहते है के "हम हूर नहीं" ॥ ६ ॥
जुल्म कर जुल्म ! अगर लुत्फ़ दरेग़ आता हो
तू तग़ाफ़ुल में किसी रंग से माज़ूर नहीं ॥ ७ ॥
साफ दुर्दी कशें पैमानए जम हैं हम लोग
वाए ! वो बादा के अफ़शुर्दए अंगूर नहीं ॥ ८ ॥
हूं 'जहूरी' के मुक़ाबिल में 'खफ़ायी' 'ग़ालिब'
मेरे दावे पे यह हुज्जत है के मशहूर नहीं ॥ ९ ॥

(१) ती माझ्यावर इतकी चिडले कीं निंदा म्हणून कां होईना माझा कोणी उल्लेख केलेलाही तिला खपत नाहीं. उलट प्रतिस्पर्धी माझी निंदा करू लागले कीं, माझा उल्लेख कां करतो म्हणून ती त्याच्यावरही चिडू लागली आणि अशामुळें तेही तिच्या प्रेमाला मुकू लागले आहेत.

(२) आज माझें नशीब खुललें. प्रियेनें आज मला बागेंत भेटण्यास सांगितलें आहे. आज माझा निकाल लावण्याचा तिचा गुप्त हेतु असावा.

(३) प्रियेला कबर जशी तशी सृष्टि ही पराशक्तीची कबर म्हणावी. पण उर्दू काव्यांत संकेत असा कीं सुंदर स्त्रियांना कंबरच नसते. (इतकी बारीक कीं नाहींच म्हणायचें) तसेंच सृष्टि जर कंबर असेल तर सृष्टीचें अस्तित्व नाहीं ती मिथ्या म्हटली पाहिजे. सृष्टीचें अस्तित्व आम्ही मानण्यास तयार नाहीं.

(४) वस्तुत. मी एक बिंदु आहें. परमेश्वररूपी सागराचा बिंदु आहें पण मी तत्त्वज्ञानी मन्सूरसारखा अहं ब्रह्मास्मि (अनल हक़) म्हणत फिरणार नाहीं.

(५) माझी पूर्णपणें नष्ट होण्याची इच्छा मनांतच राहून गेली. कारण, प्रेमाशीं झुंजण्यानेंच माझा नाश झाला असता पण त्या प्रेमाला तोंड देण्याची अगांत शक्ति राहिली नाहीं.

(६) मी प्रियेला म्हटलें कीं, बरें. तू माझें ऐकत नाहींस. ऐकू नकोस, पण उद्यां स्वर्गांत मला हूरींची निवड करण्यास सांगतीलच तेव्हां मी तुला घेतल्याशिवाय राहणार नाहीं. मग काय करशील? तर ती गर्वानें काय म्हणते, म्हणजे तू मला हूरी समजतोस कीं काय? म्हणजे ती आपल्याला हूरीपेक्षां सुंदर समजते.

(७) प्रिये, तुला माझ्यावर प्रेम करणें नको असेल तर नको करूं; मग छळ तरी कर. पण कोणत्याही स्थितींत दुर्लक्ष करूं नकोस. कारण दुर्लक्ष म्हणजे कांहीं संबंध नसल्यासारखें दाखविणें आहे.

(८) दारूचा शोध सम्राट जमशीदनें लावला म्हणतात. आम्ही जमशीदच्या परंपरेचे शाहोंत. हलकी दारू पिणें आमच्या परंपरेच्या विरुद्ध आहे. जी द्राक्षानें बनविलेली दारू नाहीं ती आम्हांला बरी वाटत नाहीं.

(९) मी फारशी कवि 'जहूरी'च्या तोलाचा आणि बरोबरीचा आहें. फरक हाच आहे कीं, तो जहूरी म्हणजे प्रकट आहे. आणि मी खफ़ायी म्हणजे अप्रसिद्ध आहें.

९२ ... नाला जुज़ हुस्ने तलब, ऐ सितम ईजाद नहीं
है तक़ाज़ाए जफ़ा, शिकवए बेदाद नहीं ॥ १ ॥
इश्को मजदूरिए इशरत गहे खुसरौ क्या खूब !
हमको तस्लीम निकोनामिए फरहाद नहीं ॥ २ ॥
कम नहीं वो भी खराबी में, पये वुसअत मालूम
दश्त में है मुझे वो ऐश के घर याद नहीं ॥ ३ ॥
अहले बीनश को है तूफ़ाने हवादिस मक्तब
लतमए मौज कम अज़ सेलीयें उस्ताद नहीं ॥ ४ ॥

वाए महरूमिए तस्लीम ! व बदा हाले वफा
जानता है के हमें ताकते फरयाद नहीं ॥ ५ ॥
रंगे तमकीने गुलोलाला परीशां क्यों है ?
गर चराग़ाने सरे रहगुज़रे बाद नहीं ॥ ६ ॥
सबदे गुल के तले बन्द करे है गुलचीं
मुजदा ऐ मुर्ग़ के गुलजार में सैयाद नहीं ॥ ७ ॥
नफी से करती है इस्बात तराविश गोया
दी है जाए दहन, उसको दमे ईजाद नहीं ॥ ८ ॥
कम नहीं जल्वागरी में तेरे कूचे से बिहिश्त
यही नक़्शा है वले इस कदर आबाद नहीं ॥ ९ ॥
करते किस मुंह से हो ग़ुर्बत की शिकायत 'ग़ालिब'
तुम को बे मेहरिए याराने वतन याद नहीं ॥ १० ॥

( १ ) हे कठोर प्रिये, माझें आक्रंदन म्हणजे तुझें गाऱ्हाणें नव्हे. उलट तू त्यामुळें माझ्यावर जास्त चिडून माझा छळ करावा ही माझी इच्छा आहे.

( २ ) फरहादनें प्रेमाकरिता शीरीनच्या बापाचें काम करून देणें पत्करलें. प्रेम आणि त्याकरितां मजुरीचीं कामें! खरें प्रेम आणि प्रेमांत अडथळा आणणाऱ्यांच्याकरितां असे श्रम करणें (सम्राट खुस्रौनें फरहादला कालवा बांधून पाणी आणण्याचें काम दिलें होतें.) आम्हांला पसंत नाहीं. ह्यांत फरहादचा चांगला लौकिक झाला असें आम्ही मानीत नाहीं.

( ३ ) माझें घर उध्वस्त झालें आहे आणि मी प्रेमवेडांत अरण्यांत भटकत आहें. माझें घर कांहीं अरण्यापेक्षां कमी वैराण आहे असें नाहीं पण विस्तारानें अरण्य घरापेक्षां मोठें आहे आणि मला तर प्रेमवेडांत मनसोक्त भटकायला हवें. त्यामुळें घरापेक्षां अरण्यांतच मला जास्त सुख वाटतें.

( ४ ) दूरदृष्टीच्या लोकांना संसारांतील संकटांचे प्रसंग म्हणजे अनुभवाचे पाठ वाटतात. ह्या संकटरूपी लाटांचें आपटणें म्हणजे वरील लोकांच्या बाबतींत पंतोजींनीं मुलांना दिलेली चपराकच म्हणाना !

( ५ ) प्राप्त परिस्थितींत स्वस्थ राहावें म्हणून आम्ही गाऱ्हाणीं व आक्रंदन करीत नाहीं. तर प्रियेला वाटतें कीं, आमच्यांत शक्तीच शिल्लक राहिली नाहीं. अरेरे! काय हा गैरसमज.

( ६ ) हीं फुललेलीं फुलें, हा वसंतऋतु हीं सर्वें वाऱ्याच्या वाटेवर ठेवलेल्या आणि लवकर विझणाऱ्या दिव्यासारखीं आहेत. नाहींतर त्याची ऐट व नखरा हीं इतक्या लौकर विलयाला गेलीं नसतीं.

( ७ ) हे पक्ष्या, मार्गेंत पारधी नाहीं त्यामुळें तुला जाळ्यांत अडकण्याची आशा नाहीं, पण तो बघ माळी फुलें वेंचून परडींत ठेवीत आहे. जा, त्याच्या परडींत अडकून बैस, म्हणजे तुला फुलांचा सहवास लाभेल. हेंच तुला हवें आहे ना ?

( ८ ) *प्रिया नाहीं नाहीं म्हणते ह्याचा अर्थच होय होय असा आहे.*

( ९ ) प्रिये, तुझें घर स्वर्गापेक्षा कमी नाहीं. फरक इतकाच कीं, स्वर्ग इतका *गजबजलेला नाहीं आणि तुझें घर आबाद आहे.*

( १० ) अरे गालिब, आपण परदेशांत येऊन पडलों ह्याचें गाऱ्हाणें कां गातोस ? तुला आपल्या देशबांधवाची अनास्था आणि दुर्लक्ष हीं आठवत नाहींत काय ?

१४ . . . दोनो जहान दे के वो समझे यह खुश रहा
यां आपडी यह शर्म के तकरार क्या करें ॥ १ ॥
थक थक के हर मुकाम पे दो चार रह गये
तेरा पता न पायें तो नाचार क्या करे ? ॥ २ ॥
क्या शम्अ के नहीं हैं हवाख़्वाह अहले बज़्म ?
हो ग़म ही जां गुदाज़ तो ग़म ख़्वार क्या करे ? ॥ ३ ॥
हो गई है ग़ैर की शीरीं बयानी कारगर
इश्क़ का उसको गुमां हम बेज़बानो पर नहीं ॥ ४ ॥

( १ ) प्रियेनें आपलें सर्वस्व मला दिलें. मी गप्प राहिलों. तिला वाटलें कीं, मी आतां संतुष्ट झालों. *पण आतां तकार करण्यास मला संकोच वाटला म्हणून मी गप्प राहिलों.* अजून हवें नव्हतें म्हणून नाहीं ?

( २ ) हे परमेश्वरा, तुझ्या प्राप्तीच्या मार्गांत मुमुक्षुजन टप्प्याटप्प्यावर थकून थांबले आहेत. बरोबरच आहे, तुझा शोधच लागत नाहीं तर ते बिचारे तरी काय करतील ?

( ३ ) मैफिलींतील शमा ( दिवा ) बद्दल मैफिलवाल्यांना सहानुभूति नाहीं असे समजू नका. पण जेथें दुःख इतकें तीव्र आहे तेथें त्यांनीं तरी दिव्याचें कसें सांत्वन करावें ?

( ४ ) आमच्या प्रतिस्पर्ध्याच्या मिठास वाणीनें प्रियेला हाच खरा आणि एकनिष्ठ प्रियकर आहे असें वाटू लागलें आहे. त्याच्या मुकाबल्यात आम्ही अगदीं वाचा नसलेले ( बेजबान ) बनलों आहों.

१५ . . . क़ियामत है के सुन लैला का दश्ते कैस में आना
ताज्जुब से वो बोला "यूं भी होता है जमाने में" ॥ १ ॥
दिले नाज़ुक पे उसके रहम आता है मुझे 'ग़ालिब'
न कर सरगर्म उस काफ़िर को उल्फ़त आज़माने में ॥ २ ॥

(१) मी प्रियेला लैला-मजनूची गोष्ट सांगितली आणि म्हटलें कीं, मजनूच्या प्रेमाचा प्रभाव इतका होता कीं, लैला त्याला भेटण्याकरितां त्याच्याकडे अरण्यांत गेली. हें ऐकून ती म्हणते काय, 'आश्चर्य आहे. प्रियकराच्या मागें प्रेयसी अशा रीतीनें जातात तर.' तिला ही गोष्ट अनिष्ट वाटत होती.

(२) प्रियेकरितां मी प्राण देण्यास तयार आहें. पण ह्यामुळें तिला धक्का बसला तर. ती अतिशय नाज़ूक आणि हळव्या मनाची आहे म्हणून मला तिची काळजी वाटते.

१६ . . . दिल लगाकर लग गया उनको भी तन्हा बैठना
बारे अपनी बेकसी की हमने पाई दाद यां ॥ १ ॥
हैं जवाल आमादा अजज़ा आफ़रीनिश के तमाम
मेहरे गरदूं है चिराग़े रह गुज़ारे बाद यां ॥ २ ॥

(१) आमचा छळ करून ती आम्हाला धुडकावून लावीत असे. आतां तीच एकाच्या प्रेमांत सापडली आहे. आतां त्याचें चिंतन करीत ती एकांतात बसून राहूं लागली आहे. चला, आमच्या छळाची फेड अशा रीतीनें तिला मिळाली.

(२) ह्या विश्वाचा प्रत्येक कणनकण नाशवत आहे. हा सूर्य दिसतो आहे ना? हा सुद्धा वाऱ्याच्या वाटेवर ठेवलेल्या दिव्यासारखा एक दिवस विझल्याशिवाय राहाणार नाहीं.

१७ . . . यह हम जो हिज्र में दीवारोदर को देखते हैं
कभी सबा को कभी नामाबर को देखते हैं ॥ १ ॥
वो आयें घर में हमारे खुदा की कुदरत है
कभी हम उनको कभी अपने घर को देखते हैं ॥ २ ॥
नज़र लगे न कहीं उसके दस्तो बाज़ू को
ये लोग क्यों मेरे ज़ख्मे जिगर को देखते हैं ॥ ३ ॥
तेरे जवाहिरे तरफ़े कुलह को क्या देखें
हम औजे तालेए लालो गुहर को देखते हैं ॥ ४ ॥

(१) मी विरहावस्थेंत आहें. घटकोघटकीं कधीं भिंतीकडे तर कधीं दरवाजाकडे पाहात आहें. भिंतीच्या पलीकडून येणारा वारा प्रियेचा कांहीं निरोप आणील, किंवा दरवाजाच्या बाहेरून टपालवाला प्रियेचें पत्र आणील, ह्या आशेनें मी सारखा त्या दिशेनें पाहात आहें.

(२) प्रिया माझ्या घरीं आली. माझें हें असलें घर आणि त्यांत प्रियेचें आगमन ह्यामुळें गोंधळून जाऊन मी कधीं तिच्याकडे तर कधीं घराकडे टकमका पाहात उभा आहें.

(३) प्रियेनें माझ्या हृदयावर केलेल्या जखमाकडे हे लोक कां निरखून पाहात आहेत? अशानें माझ्या प्रियेला दृष्ट नाहीं का लागायची?

(४) तूं आपल्या टोपीला हिरेमाणकें जडविलीं आहेत त्यांकडे काय पाहायचें? आम्ही तर, हिरेमाणकाचें नशीब किती बलवत्तर, त्यांना इतकें उच्च स्थान लाभलें, हें पाहात आहोंत.

१८ . . . नहीं, के मुझको क़ियामत का एतिक़ाद नहीं
शबे फ़िराक़ से रोज़े जज़ा ज़ियाद नहीं ॥ १ ॥
कोई कहे के शबे मै में क्या बुराई है
बला से आज अगर दिन को अब्रो बाद नहीं ॥ २ ॥
जो आऊं सामने उनके तो मरहबा न कहें
जो जाऊं वां से कहीं को तो ख़ैरबाद नहीं ॥ ३ ॥
कभी जो याद भी आता हूं मैं तो कहते हैं
के "आज बज़्म में कुछ फ़ित्नओ फ़साद नहीं" ॥ ४ ॥
अलावा ईद के मिलती है और दिन भी शराब
गदाए कूचए मैख़ाना ना मुराद नहीं ॥ ५ ॥
जहां में हो ग़मो शादी बहम हमें क्या काम
दिया है हमको ख़ुदा ने वो दिल के शाद नहीं ॥ ६ ॥
तुम उनके वादे का ज़िक्र उनसे क्यों करो 'ग़ालिब'
यह क्या! के तुम कहो, और वो कहें के "याद नहीं" ॥ ७ ॥

(१) क़ियामत (जगाचा शेवटचा दिवस, प्रळय, कल्पांत) वर माझा विश्वास नाहीं, असें नाहीं पण हें मात्र खरें कीं, ह्या विरहाच्या रात्रीपेक्षां तो दिवस भयंकर असेल असें वाटत नाहीं.

(२) लोक म्हणतात की, आज आभाळ आलें नाहीं दारू पिण्यांत मजा येणार नाहीं असें कसें होईल ? आकाश अभ्राच्छादित नसल म्हणून काय झालें ? रात्र तर चादणी आहे ना ? मग मजा का नाहीं येणार ?

(३) प्रियेची अवकृपा काय सागावी ? तिच्याकडे जातों तर कधीं सुस्वागत म्हणत नाहीं आणि तिचा निरोप घेतों तर खैरवाद ( सुखरूप राहा ) असें म्हणत नाहीं

(४) मैफिलींत ती माझी आठवण काढते, तीसुद्धा कशा पद्धतीनें पाहा म्हणते काय, आज मैफिलींत काहीं भाडणतंटा दिसत नाहीं, असें म्हणते ( मी मैफिलींत नाहीं म्हणून )

(५) सगवार सोडून इतर दिवशींही आम्हाला दारू मिळवे मयालयाच्या इच्छुकाचे प्रयत्न निष्फळ होत नाहींत

(६) जगांत मंगलकार्यें असोत वा शोककारी घटना असोत, आम्हाला त्याचें काय ? परमेश्वरान आमच हृदयच शोकमग्न केल आहे, त्याला काय करायच ?

(७) अरे गालिब, तिच्या वचनाचा उल्लेख काय करतोस ? तिला तू आठवण द्यायची आणि तिन म्हणायच, ' मला आठवतच नाहीं ' म्हणून

९९ . . . तेरे तासन को सबा बाधते हैं
हम भी मज़मू की हवा बाधते हैं ॥ १ ॥
आह का किसने असर देखा है
हम भी इक अपनी हवा बाधते है ॥ २ ॥
तेरी फुर्सत के मुक़ाबिल ऐ उम्र !
बर्क़ को पा बहिना बाधते हैं ॥ ३ ॥
कैदे हस्तीसे रहाई माळूम
अश्क़ को वे सरो पा बाधते हैं ॥ ४ ॥
नशाए रग से है वाशुदे गुल
मस्त कब बन्दे कबा बाधते हैं ॥ ५ ॥
गल्ती हाए मज़ामीं मत पूछ
लोग नाले को रसा बाधते हैं ॥ ६ ॥
अहले तदबीर की वा मान्दगिया
आबलों पर भी हिना बाधते हैं ॥ ७ ॥
सादा पुरकार हं खूबा ' गालिब '
हमसे पेमाने वफा बाधते हैं ॥ ८ ॥

( १ ) आम्ही तुझ्या वादनाची ( घोड्याची ) स्तुति करीत आहोंत ह्यातच आमची भाषाशैली खुलत आहे.

( २ ) आमचे निश्वास प्रभावी कुठें आहेत ? पण आम्ही दीर्घ निश्वास सोडून तिच्यावर प्रभाव जमविण्याचा प्रयत्न करीत आहोंत.

( ३ ) हे जीवना, तू इतका तीव्र गतीचा आणि क्षणभंगुर आहेस कीं, तुझ्यासमोर विजेलाही आम्ही मंदगति ( मेंहदी लावून जड पावलानें व काळजीपूर्वक चालणाऱ्या युवती-प्रमाणें ) समजतों.

( ४ ) ह्या जीवनाच्या बंधनांतून सुटका नाहीं मग तें जीवन व्यर्थच का असेना. आतां अश्रूंच पाहा. त्यात काहीं अर्थ आहे का ? पण कवि त्याना कवितांच्या सुयातून गुंफतातच कीं नाहीं ?

( ५ ) रंग आणि आसक्तीच्या प्रकर्षानें फुलानें बंधनें तोडून उमलण्यास सुरवात केली. नाहींतरी छंद घेतलेलीं माणसें कुठें बंधनात पडतात ?

( ६ ) कवि काय चुका करतील नेम नाहीं. आक्रंदनाला तें आक्रंदन चालू झालें असें लिहितात. पण तें गतिमान् असेल तर त्याला कवितांतून कोंडून कसें ठेवतात.

( ७ ) ह्या दिष्टाचा मूर्खपणा पाहा. जेथें प्रेमवेडे पायाला फोड आले तरी वैराण वाळवंटात भटकत राहातात, तेथें हे पायाच्या फोडाना मेंहदी लावीत बसतात. म्हणजे त्यांचें चालणें आणखी अशक्य होऊन बसतें.

( ८ ) काय प्रिया भोळेपणाचा आव आणते आहे. माझ्याशीं एकनिष्ठ राहाण्याचीं वचनें देत आहे आणि तींही आमच्यासारख्या अनुभवी माणसाना. ती एकनिष्ठ राहाणें शक्य नाहीं हें काय आम्हाला कळत नाहीं ?

१०० . . . दाग़ पड़ा हुआ तिरे दर पर नहीं हूं मैं
खाक ऐसी जिन्दगी पे के पत्थर नहीं हूं मैं ॥ १ ॥

क्यों गर्दिशे मुदाम से घबरा न जाए दिल ?
इन्सान हूं प्याला व सागर नहीं हूं मैं ॥ २ ॥

यारब ! ज़माना मुझको मिटाता है किस लिये
लौहे जहा पे हर्फे मुकर्रर नहीं हूं मैं ॥ ३ ॥

हद चाहिये सज़ा में उकूबत के वास्ते
आखिर गुनाहगार हूं काफ़िर नहीं हूं मैं ॥ ४ ॥

किस वास्ते अज़ीज़ नहीं जानते मुझे ?
लालो ज़मुर्रुदो ज़रो गौहर नहीं हूं मैं ॥ ५ ॥

रखते हो तुम कदम मिरी आखों से क्यों दरेग
रुतबे मे मेहरो माह से कमतर नहीं हूं मैं ॥ ६ ॥

करते हो मुझको मनए कदम बोस किस लिये ?
क्या आसमा के भी बराबर नहीं हूं मैं ? ॥ ७ ॥

' गालिब ' वज़ीफा ख्वार हो दो शाह को दुआ
वो दिन गये के कहते थे " नौकर नहीं हूं मैं " ॥ ८ ॥

( १ ) हे प्रिये, तुझ्या दारावर मी कायमचा पडून राहिलेलों नाहीं कसलें जीवन हें ? त्यापेक्षा तुझ्या उंबरठ्यावरचा दगड बनलों असतों तर बर झालें असतें म्हणजे मी कायमचा तुझ्या दारावर पडून राहू शकलों असतों

( २ ) ह्या चिरकालच्या भ्रमंतीनें माझें मन का घाबरणार नाहीं ? शेवटीं मी तरी मनुष्यच आहें सदा फिरतीत असणारा मैफिलींतील सुरेचा पेला तर नाहीं ना ?

( ३ ) हा काळ मला पुसून टाकण्याच्या मागें का लागला आहे ? जगाच्या पाटीवर मी काय दुसऱ्यादा लिहिलेला आणि म्हणून पुसण्यालायक असा शब्द आहें कीं काय ?

( ४ ) गुन्हे केले तरी शिक्षेला मर्यादा हवी परमेश्वरा, शेवटीं मी मुसलमान आहें, काफर तर नाहीं ना ?

( ५ ) मी तुला का आवडू नये ? तुला संपत्तीचा त्याग करणें आवडतें मी तरी काय हिरा आहें ? का माणिक आहें ? का मोती आहें ? ( धार्मिक कल्पना )

( ६ ) पैगंबरानीं एका रात्रीं ( शबेमेराज ) वर जाऊन परमेश्वरप्राप्ति करून घेतली असें म्हणतात कवि म्हणतो, तुम्ही तर चंद्र आणि सूर्यलोकावर पाय ठेवून पुढें गेलात मग माझ्या डोक्यावर पाय ठेवण्यास ( माझ्यावर कृपा करण्यास ) काय हरकत आहे ? मी काय सूर्यचंद्रापेक्षा कमी आहें काय ?

( ७ ) हे पैगंबरा, शबेमेराजच्या वेळीं आकाशान तुमच्या पायाचें चुंबन घेतलें मग मलाही तसें का करूं देत नाहींत ? मी काय आकाशापेक्षा कमी आहें काय ?

( ८ ) हे गालिब, तू आता बादशहाचा नोकर आहेस त्याला दुवा दे कारण आपल्याला रोजगार नाहीं म्हणून तुला हल्दल्ल काढण्याचे दिवस, बादशहामुळें नाहींसे झाले आहेत

१०१ . . . सब कहां कुछ लाला वो गुलमे नुमायां हो गयीं
ख़ाकमे क्या सूरतें होंगीं के पिन्हां हो गयीं ॥ १ ॥
याद् थीं हम्कोभि रंगारंग् बज्म् आराइयां
लेकिन् अब् नक्शोनिगारे ताके निसूयां हो गयीं ॥ २ ॥
थीं बनातुन्नाशे गर्दूं दिन्को पर्देमे निहां
शब्को उन्के जीमे क्या आयी के उरियां हो गयीं ॥ ३ ॥
कैद्मे याकूब्ने ली गो न यूसुफकी ख़बर्
लेकिन् आंखें रौज़ने दीवारे ज़िंदां हो गयीं ॥ ४ ॥
सब रकीबोंसे हूं नाखुश् पर ज़नाने मिस्रसे
है जुलेखा खुश के महवे माहे कनआं हो गयीं ॥ ५ ॥
जूये ख़ून् आंखोंसे बहने दो के है शामे फिराक़
मै ये समझूगा के शम्मे दो फ़रोजां हो गयीं ॥ ६ ॥
इन परीज़ादोसे लेंगे खुल्द् मे हम इंतिकाम्
कुद्रते हक्से यही हूरें अगर् वां हो गयीं ॥ ७ ॥
नींद् उस्की है दिमाग़् उस्का है रातें उस्की हैं
तेरी ज़ुल्फें जिस्के शानोंपर् परीशां हो गयीं ॥ ८ ॥
मै चमन्मे क्या गया गोया दबिस्तां खुल् गया
बुल्बुलें सुन्कर् मेरे नाले ग़ज़लख़्वां हो गयीं ॥ ९ ॥
वो निगाहे क्यों हुयी जाती हैं यारब् दिल्के पार्
जो मेरी कोताहिये किस्मत्से मिज़्गां हो गयीं ॥ १० ॥
बस्के रोका मैंने और् सीनेमे उभरीं पयेबपये
मेरी आहें बख़ीये चाके गरेबां हो गयीं ॥ ११ ॥
वां गया भी मै तो उनकी गालियोंका क्या जवाब्
याद थीं जित्नीं दुवायें सर्फे दरबां हो गयीं ॥ १२ ॥
जाफ़िज़ा है बादा जिसके हाथमें जाम् आगया
सब लकीरें हाथ्की गोया रगेजां हो गयीं ॥ १३ ॥
हम् मुवहिद् हैं हमारा केश है तर्के रुसूम
मिल्लतें जब मिट् गयीं अजज़ाये ईमां हो गयीं ॥ १४ ॥

रंजसे ख़ूगर् हुवा इन्सान् तो मिट् जाता है रंज
मुश्किलें इतनी पड़ीं मुझपर् के आसां हो गयीं ॥ १५ ॥
यौंहि गर् रोता रहा ग़ालिब तो अये अह्‌ले जहां
देखना इन् बस्तियोंको तुम के वीरां हो गयीं ॥ १६ ॥

( १ ) मृत्युमुखीं पडलेल्या आणि मातीमोल होऊन गेलेल्या सुंदर स्त्रीपुरुषांपैकीं सर्वे कांहीं फुलांच्या रूपानें थोडेच प्रकट झाले आहेत. नेहमींकरितां नष्ट झालेली अशी सौंदर्य-सृष्टि कितीतरी असेल.

( २ ) रसिकांनीं प्रफुल्लित असलेल्या मैफिली आम्हांलाही आठवतात. त्या आठवणी आतां विस्मृतीच्या कोनाड्यांत जाऊन बसल्या आहेत.

( ३ ) आकाशांत उत्तर दिशेकडील सप्त तारकांना उर्दूंत सात सख्या असें म्हणतात. कवि म्हणतो दिवसां या सात मैत्रिणी पडद्याआड लपल्या होत्या. रात्रीच्या वेळीं त्यांच्या मनांत काय आलें कुणास ठाऊक पडदा सोडून त्या बाहेर पडल्या आहेत.

( ४ ) वरवर असें वाटेल कीं यूसुफ कैदेंत असतांना याकूबनें त्याच्याकडे लक्षच दिलें नाहीं; पण असें जरी असलें तरी त्याचे डोळे यूसुफकडे अनिमिषपणें तुरुंगांतील भिंतीच्या उघड्या फटीप्रमाणें पाहात होते.

( ५ ) प्रेमिकांना प्रतिस्पर्धी आवडत नाहीं. पण जुलेखाला आपल्या प्रियकराचें—यूसुफचें सौंदर्य सख्यांना दाखवावयाचें होतें. यूसुफ आला तेव्हां जुलेखाच्या सख्या फळें चिरीत होत्या. यूसुफचें सौंदर्य पाहून त्यांचें देहभान हरपलें अन् त्या अवस्थेंत त्यांनीं फळां-ऐवजीं आपलीं बोटें कापून घेतलीं. ही त्यांची मनःस्थिति पाहून जुलेखाला आनंद वाटला. मत्सराची भावना तिला झाली नाहीं. कवि म्हणतो कीं यूसुफच्या सौंदर्यानें तिच्या सख्या मुग्ध झाल्या ह्याचा जुलेखाला आनंद वाटला.

( ६ ) आज विरहाची काळीकुट्ट अवसेची रात्र आहे. माझ्या नेत्रांतून रक्ताच्या धारा वाहू द्या. माझ्या शोकसागराला प्रदीप्त करणाऱ्या ह्या धारा म्हणजे दोन दिवेच होत असें मी समजेन.

( ७ ) ह्या सुंदरी येथें हातीं लागत नाहींत पण नशिबानें जर कां ह्या स्वर्गांतील हूरी ( अप्सरा ) बनल्या तर तिथें त्यांचा सूड उगविल्याशिवाय आम्हीं राहाणार नाहीं.

( ८ ) तुझे अलक पाश ज्यांच्या खांद्यावर खेळतील त्यांच्या रात्री, त्यांच्या निद्रा, अन् त्यांचे कल्पनाविलास काय वर्णावे !

( ९ ) मी बागेंत गेलों मात्र, एक मैफिलच तिथें जमली. माझा आक्रंदनें ऐकून बागेंतील बुलबुल गज़लगायक बनले.

(१०) माझ्या कमनिगाहमुळें तिनें नेत्र अर्धेच उघडले. पण त्या अर्धोन्मीलित नेत्रांतील शरसुद्धां हे परमेश्वरा, हृदयाच्या आरपार निघून गेले.

(११) माझे निश्वास मी थांबविण्याचा प्रयत्न करतों परंतु ज्याप्रमाणें कपड्यांचें शिवण उसवून पुन्हां पुन्हां वर यावेत त्याप्रमाणें हे निश्वास पुन्हां पुन्हां उसळून वर येत आहेत.

(१२) प्रियेकडे मी गेलों आणि तिनें माझी निर्भर्त्सना केली तर मी तिला काय उत्तर देणार ? कारण माझ्यापाशीं काकुळतीचे जेवढे म्हणून शब्द होते ते सारे शब्द तिच्या घरच्या पहारेकऱ्याची विनंती करण्यांतच सरून गेले आहेत.

(१३) ज्याच्या हातांत दारूचा पेला आला त्याला नवजीवन प्राप्त झाल्यासारखें आहे. प्राणाच्या सर्वशक्ति त्याच्या हातांतील शिरातून एकवटल्यासारख्या दिसत आहेत.

(१४) आम्ही एकेश्वरवादी आहोंत. धर्मांचीं अवडंबरें सोडून देणें हा आमचा भाव आहे. होऊन गेलेल्या अनेक संस्कृतीचे जे अवशेष राहिले आहेत ते आमच्या धर्मांचे अंग झाले आहेत.

(१५) दुःखांची संवय झाली म्हणजे तें दुःख वाटत नाहीं. माझ्यावर इतकीं संकटें आलीं कीं तीं आतां संकटें वाटत नाहींत.

(१६) गालिबचें रुदन असेंच जर चालू राहिलें तर तुम्ही पाहाल कीं गजबजलेलीं नगरें एक दिवस त्याच्या अश्रूंच्या पुरांत वाहून जातील.

दीवानगीसे दोशपे ज़ुन्नार भी नहीं
१०२ . . . यानी हमारी जेब्मे एक् तार भी नहीं ॥ १ ॥

दिल् को नियाज़े हस्रते दीदार् कर चुके
देखा तो हम्मे ताक़ते दीदार् भी नहीं ॥ २ ॥

मिल्ना तेरा अगर नहीं आसान् तो सहल् है
दुश्वार् तो यही है के दुश्वार भी नहीं ॥ ३ ॥

बे-इश्क़ उमर कट नहीं सकती है और् यां
ताक़त् बक़दरे लज़्ज़ते आज़ार् भी नहीं ॥ ४ ॥

शोरीदगीके हातसे है सर् वबाले दोश्
सहरामे अये ख़ुदा कोई दीवार भी नहीं ॥ ५ ॥

गुंजाइशे अदावते अग़यार् यक तरफ़
यां दिल्मे ज़ोफ़से हवसे यारभी नहीं ॥ ६ ॥

डर नाज़हाये जा़से मेरे ख़ुदाको मान्
आख़िर नवाये मुर्ग़ गिरफ्तार भी नहीं ॥ ७ ॥
दिलमें है यारकी सफे मिज़गांसे रूकशी
हालांकि ताक़ते ख़लिशे ख़ार भी नहीं ॥ ८ ॥
इस् सादगीपे कौन न मर्जाये अये ख़ुदा
लडते हैं और् हाथमे तलवार् भी नहीं ॥ ९ ॥
देखा असद्को ख़िल्वतो जल्वत् मे वारहा
दीवाना गर् नहीं है तो हूशियार् भी नहीं ॥ १० ॥

(१) आम्ही प्रियेचे उपासक म्हणजे मूर्तिपूजक आहोंत. आमच्या गळ्यांत जानवें असायला पाहिजे पण प्रेमवेडांत आम्हीं अंगांतून तेंहि काढून टाकलें आहे. आतां अंगावर एक दोरहि शिल्लक राहिला नाहीं.

(२) प्रियेच्या दर्शनाच्या लालसेंत आम्हीं आपलें हृदय देऊन टाकलें पण दर्शनाची वेळ आली तेव्हां आम्हांला समजलें कीं तिच्याकडे पाहाण्याची आमच्यांत शक्ति नाहीं.

(३) तुझें दर्शन अगदीं अशक्य नाहीं आणि अगदीं सोपेंहि नाहीं. म्हणून तर हुरहूर लागली आहे. अशक्यच असतें तर निराश होऊन बसलों असतों. पण ह्या परिस्थितीमुळें हुरहूर मात्र नशिबीं आली आहे.

(४) प्रेमाशिवाय जीवन जगणें अशक्यच आहे. पण प्रेमाचीं दुःखें भोगण्याचीहि आम्हांला शक्ति नाहीं.

(५) प्रेमवेडांत डोकें माझें शरीराला ओझें बनून बसलें आहे. बरें, तें कोठें तरी टेकावें म्हटलें तरी ह्या वाळवंटांत भिंतीचा आसरा कोठें दिसत नाहीं.

(६) प्रतिस्पर्ध्यांचा द्वेष जाऊं द्या. दुर्बलतेमुळें आतां हृदयांत प्रियेच्या आसक्तीलाहि स्थान राहिलें नाहीं.

(७) माझ्या आक्रंदनाकडे लक्ष दे. परमेश्वराची कांहीं भीति मनांत आहे कीं नाहीं. माझीं आक्रंदनें प्रभावीं झाल्याशिवाय राहाणार नाहींत. तीं माझीं आक्रंदनें आहेत. बंधनांत टाकलेल्या पक्ष्याचीं नाहींत.

(८) माझी अशक्तता तरी पाहा. एक कांटा मोडला तरी सहन करण्याची शक्ति नाहीं. पण प्रियेच्या पापण्यांचे आघात झेलावे ही दांडगी हौस मनांत बाळगून आहे.

(९) तिच्या साधेपणावर जीव ओवाळून टाकावासा वाटतो. ती भांडायला उठली आहे आणि हातांत कांहीं शस्त्रहि नाहीं.

(१०) आम्हीं गालिबला एकांतांत आणि बाहेर दोन्हीं प्रसंगीं पुष्कळदां पाहिलें आहे. तो वेडा नसेल पण शहाणाहि म्हणतां येणार नाहीं.

१०३ . . . नहीं है जख़्म कोई बख़ीयाके दरख़र मेरे तन्मे
हुवा है तारे अश्के यास रिश्ता चश्मे सोज़न् मे ॥ १ ॥

हुयी है माने जोंके तमाशा ख़ाना वीरानी
कफ़े सैलाब् बाक़ी हैं बरंगे पम्बा रोज़न् मे ॥ २ ॥

दौलियत ख़ानये बेदादे काविशहाये मिजगा हू
नगीने नाम् शाहिद् है मेरा हर क़तरये खूं तनमे ॥ ३ ॥

बया किन्से हो जुल्मत् गुस्तरी मेरे शबिस्ताकी
शबे माह हो जो रखदे पम्बा दीवारोंके रौज़न् मे ॥ ४ ॥

निकोहिश माने बे रब्तीये शोरे जुनू आयी
हुवा है ख़दये अहबाब् बख़ीया जेबो दामन् मे ॥ ५ ॥

हुये उस् मेहरवश् के जल्वये तिमसाल्के आगे
पुर् अफ़्शा जोहरे आयीनेमे मिस्ले ज़र्रा रौज़नमे ॥ ६ ॥

न जानू नेक हू या बद् हूं पर सोहबत् मुख़ालिफ् है
जो गुल् हू तोह गल्ख़न् मे जो ख़स् हू तो हू गुलशनमें ॥७॥

हजारों दिल् दिये जोशे जुनूने इश्क़ ने मुझको
सियाह होकर सुवैदा हो गया हर क़तरये खू तन् में ॥ ८ ॥

असद् ज़िंदानीये तासीरे उल्फ़त् हाये ख़ुबा हो
ख़ुमे दस्ते नवाजिश् हो गया है तौक गर्दनमें ॥ ९ ॥

( १ ) मला प्रेमात झालेल्या जखमा अशा स्वरूपाच्या आहेत कीं, त्याना टाके घालणेंहि शक्य नाहीं त्यामुळें सुईंतील दोरा हा मूर्तिमत हळहळीचा दोरा बनून गेला आहे.

( २ ) अश्रूंचे पूर मी याकरिता वाहविले होते कीं त्यांत माझें घर वाहून जावें आणि भिंतीच्या फटींतून मी ती घटना पहावी. पण तें शक्य झालं नाहीं कारण पुराच्या पाण्यामुळें भिंतीच्या फटी भरून गेल्या, जणू काय या फटींतून कुणी कापूस भरला आहे त्यामुळें मला माझें घर उध्वस्त होत असलेलें पाहण्याची हौस फेडून घेतां आली नाहीं

( ३ ) माझ्या हृदयातील रक्ताचा प्रत्येक बिंदु म्हणजे एक दागिना आहे आणि त्यावर प्रियेनें आपल्या पापण्याद्वारें आपलं नाव कोरून शिक्कामोर्तब केलं आहे त्यामुळें माझें हृदय म्हणजे दुसऱ्यानीं ठेवलेल्या ठेवींचें भांडारच झालें आहे.

( ४ ) माझ्या शोकागारात पसरलेला अंधार अवर्णनीय आहे त्यातील फटींतून कापूस ठेवला तरी चादणें पसरल्यासारखें वाटतें गडद अंधारात साधी पांढरी वस्तुसुद्धा चमकत असल्याचा भास होतो त्याला उद्देशून ही कल्पना आहे

( ५ ) माझें प्रेमवेड पाहून माझ्या मित्रानीं माझी निर्भर्त्सना केली आणि माझ्या वेडावर ते हसले त्यामुळें त्या वेडाच्या भरात माझे कपडे फाडून टाकावयाचे टाळले

( ६ ) प्रियेच्या सौंदर्याचें प्रतिबिंब आरशात पडलें आहे सूर्यप्रकाशात धूळीचे कण प्रकाशमान होऊन झगमगत फिरत रहावेत तसेंच ह्या सौंदर्यप्रचीतीमुळें आरशाचे कणान् कण इकडे तिकडे विखुरले गेले आहेत

( ७ ) मी बाईट कीं चागला हें सागू शक्त नाहीं पण बातावरण प्रतिकूल आहे हें मात्र खरें मी जर फूल आहें तर बागेंत न पडता कचऱ्यात जाऊन पडलों आहें आणि कचरा आहें तर बागेंत जाऊन पडलों आहें.

( ८ ) प्रेमवेडाच्या आत्यंतिकतेमुळें माझ्या हृदयातील रक्ताचा प्रत्येक बिंदु काळा ठिक्कर होऊन डाग बनला आहे

( ९ ) हे असद्, मी सुंदरीच्या प्रेमप्रभावाचा कैदी बनलों आहें तिने माझ्या गळ्यात आपले बाहुपाश घातले आहेत म्हणजे गळ्याभोंवतीं साखळीच अडकवली असें झालें आहे.

१०४ . . . मज़े जहाके अपनी नज़र् में खाक़् नहीं
सिवाये खनेजिगर् सोजिगर् में ख़ाक़् नहीं ॥ १ ॥
मगर् गुबार् हुये पर हवा उडाले जाये
वगरना ताबो तवा बालो पर् में खाक़् नहीं ॥ २ ॥
ये किस् बिहिश्ते शमायल की है आमद् आमद्
के गैर जल्वये गुल्र रह गुज़र् में ख़ाक़् नहीं ॥ ३ ॥
भला उसे न सही कुछ मुझीको रहम आता
असर् मेरे नफ्से बे असर् में ख़ाक़् नहीं ॥ ४ ॥
खियाले जल्वये गुल्से खराब हैं मैकश्
शराब खाने के दीवारो दर् में खाक़ नहीं ॥ ५ ॥
हुआ हू इश्क़की गारत् गरीसे शर्मिंदा
सिवाये हस्रते तामीर घरमें खाक नहीं ॥ ६ ॥
हमारे शेर हैं अब् सिर्फ़् दिल्लगीके असद्
खुला के फायदा अर्जे हुनरमें ख़ाक़् नहीं ॥ ७ ॥

( १ ) माझी प्रत्येक यावतींत निराशा झाली आहे. जगाचीं वैभवें माझ्या दृष्टींत तुच्छ आहेत. एके काळीं प्रेमवेडांत हृदयाचें रक्त मी पीत होतों पण आतां तेंहीं कांहीं शिल्लक राहिलेलें नाहीं.

( २ ) बागेपर्यंत उडून जाण्याची शक्ति पंखात राहिली नाहीं. मेल्यानंतर माझी माती वाऱ्यानें उडून बागेपर्यंत पोहोंचेल तर पोहोंचो.

( ३ ) आज कोणती सुंदरी बागेंत येणार आहे. कारण जिकडे तिकडे फुलांचा सडा पडला आहे. त्यामुळें जमिनीवरची मातीसुद्धा दिसत नाहीं.

( ४ ) माझ्या आक्रंदनानें आणि निश्वासानीं तिला जरासुद्धां दया आली नाहीं. माझ्या निश्वासात कांहीं प्रभाव दिसून आला नाहीं. शेवटीं मला स्वत वरच दया आली आणि मी आपलें आक्रंदन थांबविलें.

( ५ ) मद्यालयात काहीं शिल्लक नाहीं. मद्यपी वसंताची बहर पाहाण्याच्या कल्पनेंतच मग्न झालेले आहेत.

( ६ ) प्रेमांत माझें सर्व कांहीं उध्वस्त झालें आहे. आता ह्या घरात अतृप्त आकांक्षा आणि हुरहुरीशिवाय काहींही शिल्लक असें नाहीं.

( ७ ) हे गालिब, माझ्या कविता लोक फक्त करमणूक म्हणून वाचतात. त्या समजण्याची वा समजावून घेण्याची रसिकता त्याच्यात नाहीं. मग आपली प्रतिभा दाखवीत फिरण्यांत काय बरें अर्थ आहे.

१०५ . . . दिल् ही तो है न संगोख़िश्त दर्दसे भर न आये क्यौं
रोयेंगे हम् हजार बार् कोयी हमें सताये क्यौं ॥ १ ॥
दैर् नहीं हरम नहीं दर नहीं आस्तां नहीं
बैठे हैं रह गुजर पे हम् ग़ैर हमें उठाये क्यौं ॥ २ ॥
जब् वो जमाले दिल् फरोज़ सूरते मेहरे नीमरोज़्
आपही हो नज़्ज़ारा सोज़ पर्देमें मूंह छुपाये क्यौं ॥ ३ ॥
दश्नये ग़मज़ा जांसितां नावके नाज़ बेपनाह
तेराहि अक्से रुख सही सामने तेरे आये क्यौं ॥ ४ ॥
कैदे हयातो बंदे ग़म् अस्लमें दोनों एक हैं
मौत्से पहले आदमी ग़म्से नजात पाये क्यौं ॥ ५ ॥
हुस्न् और उसपे हुस्न जन् रहगयी बूल्ह हवस् की शरम
अपने पे एतिमाद है ग़ैर् को आज़माये क्यौं ॥ ६ ॥

१६१ . . . .

मि. गा. ११

या वो गुरूरे इज़्ज़ोनाज़् या ये हिजाबे पासे वज़्
राहमें हम् मिले कहा बज़्ममें वो बुलाये क्यौं ॥ ७ ॥

हा वो नहीं खुदा परस्त जाओ वो बेवफा सही
जिसको हो दीनोदिल अज़ीज़् उसकी गलीमें जाये क्यौं ॥ ८ ॥

ग़ालिबे खस्ता के बग़ैर कोनूसे काम बद हैं
रोइये जार जार क्या कीजिये हाये हाये क्यौं ॥ ९ ॥

( १ ) शेवटीं हें हृदय आहे हें कांहीं दगडधोंडा नव्हे तें व्यथेनें का भरून येणार नाहीं ? आम्ही हवा तितका वेळ रुदन करूं कोणी आमच्या मागें का बरें लागावें ?

( २ ) हें काहीं देऊळ नाहीं की मशीद नाही कीं कुणाचें घर नाहीं कीं उंबरठा नाही आम्ही वाटेवर बसलों आहोंत कुणी आम्हाला का बरें उठवावें येथून ?

( ३ ) तिचें सौंदर्य अप्रतिम आहे पहाणाऱ्याची दृष्टि जाळून टाकणाऱ्या मध्यान्हीच्या सूर्यासारखें तेजस्वी आहे जर तिच्याकडे पाहाण्याची कुणालाच शक्ति नाहीं तर तिनें तरी तोंडावर बुरखा घेण्याची काय आवश्यकता आहे ?

( ४ ) तुझ्या नाजनखऱ्याचे खंजीर प्राण हरण करतात तुझ्या नयनशरापासून कुणी वाचूं शकत नाहीं तुझ्यासमोर कुणीच उभा राहूं शकत नाहीं फार काय आरशातील तुझ्या प्रतिबिंबालाही तुझ्याकडे पाहून आघात होण्याचा संभव आहे

( ५ ) जीवनाचें बंधन आणि शोकाचें बंधन हीं दोन्हीं वस्तुत एकच होत मग मृत्यूच्या पूर्वी शोकातून मुक्त होण्याची शक्यता कोठून असणार ?

( ६ ) ती जितकी सुंदर तितकाच तिचा आत्मविश्वास दांडगा आहे आपल्या मात्यापुढें कुणी वाचूं शकत नाहीं ह्याची तिला खात्री आहे मग विनाकारण परीक्षा पहा कशाला ?

( ७ ) तिच्या स्वभावात अहंकार आणि गर्व आहे आणि आमचा स्वभाव संकोची आणि अभिमानी आहे आमची गाठ कुठें बरें पडावी आणि तिनं तरी आम्हाला आपल्या मैफिलींत का बरें बोलवावं ?

( ८ ) ती परमेश्वराची भक्त नाहीं ती एकनिष्ठ नाहीं हें माहीत आहे ना ? मग ज्याला धर्म आणि प्राण प्रिय आहेत त्यानीं तिच्याकडे जायचंच तरी कशाला ?

( ९ ) गालिब, तुझ्यावाचून काहीं जगाचे व्यापार अडल नाहींत मग ही हळहळ आणि हीं आक्रंदनें कशाला बरें ?

१०६ . . . गुंचये नाशिगुफ्ता को दूरसे मत दिखा के यौं
बोसे को पूछता हू मैं मूहसे मुझे बता के यौं ॥ १ ॥

पुर्सिशे तर्ज़े दिल्बरी कीजिये क्या के बिन् कहे
उस्के हरएक् इशारेसे निकले है ये अदा के यौं ॥ २ ॥

रात्के वक्त् मये पिये साथ रकीब को लिये
आये वो यां खुदा करे पर् न करे खुदा के यौं ॥ ३ ॥

गैर् से रात् क्या बनी ये जो कहा तो देखिये
साम्ने आन् बैठना और् ये देखना के यौं ॥ ४ ॥

बज्मृमे उसके रूबरू क्यों न खमूश बैठिये
उसकी तो खामुशी में भी है यही मुद्दवा के यौं ॥ ५ ॥

मैंने कहा के बज्में नाज् चाहिये गैर् से तिही
सुन्के सितम् ज़रीफने मुझको उठा दिया के यौं ॥ ६ ॥

मुझसे कहा जो यार्ने जाते हैं होश् किस् तरह
देखके मेरी बेखुदी चल्ने लगी हवा के यौं ॥ ७ ॥

कब मुझे कूये यारमें रहनेकी वज़ याद थी
आईना दार् बन् गयी हैरते नक्शेपा के यौं ॥ ८ ॥

गर् तेरे दिल्में हो ख़ियाल वस्लमें शौक का ज़वाल
मौजे मुहीते आबमें मारे है दस्तोपा के यौं ॥ ९ ॥

जो ये कहे के रेख्ता क्योंकर हो रश्के फारसी
गुफ़्ता ग़ालिब एकबार पढके उसे सुना के यौं ॥ १० ॥

( १ ) मी चुंबन मागत आहें न उमललेल्या कळीसारखें तोंड करून चुंबन असे असतें असें सांगण्यात काय बरं अर्थ आहे! जरा जवळून येऊन प्रात्यक्षिक करून दाखवीत जा.

( २ ) ती हृदय कमें हरण करते हें तिला काय विचारायचें! तिचा प्रत्येक संकेत हृदय अशा रीतीन हरण करतात असेंच जणूं सांगत आहे

( ३ ) रात्रीं प्रतिस्पर्ध्यांना बरोबर घेऊन ती मदिरेचें सेवन करीत होती तिनें मज-कडे यायला हवें होतें; पण प्रतिस्पर्ध्याला घेऊन नव्हे, तर अगदीं एकटेंच

(४) प्रतिस्पर्ध्यांबरोबर कालची रात्र घालविलीस असे विचारतां ती माझ्यासमोर येऊन बसली आणि अशा रीतीनें तिनें माझ्याकडे पाहिलें कीं तिला जणू असें दाखवावयाचें होतें कीं पहा अशा प्रकारें मीं रात्र बसली.

(५) मैफिलींत तिच्या समोर गप्प बसणेंच बरें. कारण तीसुद्धा कांहीं बोलत नाहीं. ह्यावरून आम्हीं पण कांहीं बोलू नये अशी तिची इच्छा दिसते.

(६) तिच्या मैफिलींत मीं म्हटलें कीं येथें कुणी परका असता उपयोगी नाहीं. पण काय आश्चर्य तिनें मलाच मैफिलींतून उठवून लावलें.

(७) मला प्रियेनें विचारलें कीं शुद्ध हरतें म्हणतात ती कशी तो काय चमत्कार सांगावा. माझी बेशुद्धावस्था पाहून वातावरणसुद्धा बेहोष बनलें.

(८) प्रियेच्या परिसरात कसें वागावें हें मला कुठें ठाऊक होतें. प्रियेच्या वाटेंतील तिच्या पदचिह्नांनीं मला शिकविलें कीं माझ्यासारखें आश्चर्यमग्न होऊन राहावें.

(९) मीलनानंतर आसक्ति कमी होते. त्या समुद्राच्या लाटा पहा समुद्राशीं मीलन झाल्यानंतर त्यांची आसक्ति कमी होऊन त्या किनाऱ्याकडे परत येऊं लागल्या आहेत.

(१०) कुणी म्हणेल कीं फारशीला उर्दूचा हेवा करा वाटेल ! त्याला उत्तर हेंच कीं एकदां गालिबच्या उर्दू कविता वाचून दाखवा म्हणजे मग समजून येईल.

१०७ . . . हसद् से दिल् अगर अफसुर्दा है गरमे तमाशा हो
के चश्मे तंग शायद् कसरते नज्जारेसे वा हो ॥ १ ॥
बक़दरे हसरते दिल चाहिये ज़ौके मआसी भी
भरूं यक् गोशये दामन् गर् आबे हफ्त दरिया हो ॥ २ ॥
अगर् वो सर्वकद् गरमे खिरामें नाज़् होजावे
कफे हर खाके गुल्शन् शक्ले कुमरी नाला फरसा हो ॥ ३ ॥

(१) संकुचित वातावरणात राहिल्यानें मनुष्याला दुसऱ्याच्याबद्दल हेवा आणि मत्सर वाटू लागतात. त्या उलट विशाल वातावरणांत वावरल्यानें हेव्यानें संकुचित झालेले डोळे अक्षरशः उघडल्याशिवाय राहात नाहींत.

(२) इतकीं पापें करण्याची मला हुरहूर आहे. पण काय करावें. सात समुद्र भरून जरीं पापें जगात असलीं तरी त्यानीं माझ्या अंगरख्याचें एक टोंक भिजेल. माझ्या हुरहुरीच्या मानानें त्याची संख्या कांहींच नाहीं.

(३) सुरूसारखी उंच आणि सडपातळ अशी ती प्रिया बागेंत येऊं द्या तरी. बागेंतील मातीसुद्धा कुमरी पक्ष्याचा आकार घेऊन तिच्याकरिता आक्रंदन करूं लागेल. कुमरीचें सुरू झाडाबद्दलचें प्रेम हा उर्दू काव्यांतील एक संकेत आहे.

१०८... काबे में जारहा तो न दो ताना क्या कहूं
भूला हूं हक्के सोहबते अहले कुनिश्त को ॥ १ ॥
ताअत् में ता रहे न मये व अंगबीं की लाग्
दोज़खमे डाल्द दो कोई लेकर् बिहिश्त को ॥ २ ॥
हूं मुन्हरिफ न क्यौं राहो रस्में सवाबसे
टेढा लगा है कत् कल्मेँ सरनविश्त को ॥ ३ ॥
ग़ालिब् कुछ अपनी सअीसे कहना नहीं मुझे,
खिर्मन् जले अगर न मल्ख खाये किश्त को ॥ ४ ॥

( १ ) मी काब्याची माया करूं लागलों तर मला टोमणें मारूं नका. पूर्वी काव्यांतही मूर्ति होत्या ना ? मी मूर्तिपूजकांचा सहवास विसरलों नाहीं असें समजा.

( २ ) लोक परमेश्वराची आराधना स्वर्गप्राप्तिकरितां करतात आणि ती तरी कशासाठीं तर स्वर्गांत अमृत ( मध ) मिळतें म्हणून. पण अशी सकाम उपासना काय वरें कामाची ? म्हणून, स्वर्गाला उचलून नरकांत फेकून द्या कसें. म्हणजे ही वासना तरी राहायची नाहीं.

( ३ ) मला पुण्यसंपादनाची भावना तरी कशी व्हावी. परमेश्वरानेंच माझा ललाट-लेख वेडावांकडा लिहिला आहे त्याला मी तरी काय करूं !

( ४ ) प्रयत्न करून त्याचें फळ भोगणे हें माझ्या नशिबांतच नाहीं. टोळधाडीनें माझ्या पिकाचा नाश केला नाहीं तर वीज पडून तीं जळून जायचीं हें मला दिसत आहे.

१०९... वारस्ता इससे हैं के महब्बतही क्यौं न हो
कीजे हमारे साथ अदावतही क्यौं न हो ॥ १ ॥
छोडा न मुझमे जोफने रंग इख़्तिलात्का
है दिल्पे बार नक्शे महब्बतही क्यौं न हो ॥ २ ॥
है मुझको तुझसे तज़्किरे ग़ैर् का गिला
हरचंद् बर सबीले शिकायत्ही क्यौं न हो ॥ ३ ॥
पैदा हुयी है कहते हैं हर् दरद की दवा
यौं हो तो चारये ग़मे उल्फत् ही क्यौं न हो ॥ ४ ॥
डाला न बेकसीने किसीसे मुआमिला
अपने से खींचता हूं खजालत् ही क्यौं न हो ॥ ५ ॥

है आदमी बजाये खुद् एक् महशरे खियाल्
हम अंजुमन् समझते हैं खिल्वतही क्यों न हो ॥ ६ ॥

हंगामये जबूनीये हिम्मत है इन्फिआल
हासिल न कीजे दहरसे इब्रतही क्यों न हो ॥ ७ ॥

वारस्तगी बहानये बेगानगी नहीं
अपनेसे गर न गैरसे वहशत् ही क्यों न हो ॥ ८ ॥

मिट्ता है फौते फुर्सते हस्तीका गम् कोई
उम्रे अजीज् सर्फे इबादत्ही क्यों न हो ॥ ९ ॥

उस् फित्ना खूके दरसे अब् उठते नहीं असद्
उसमे हमारे सर्पे क़ियामत ही क्यों न हो ॥ १० ॥

( १ ) माझ्याशीं प्रेम करावयाचें नसेल तर नको करूस, द्वेष कर पण कोणत्याही परिस्थितींत आपला संबंध मात्र तोडूं नकोस.

( २ ) मी इतका शक्तिहीन झालों आहे कीं प्रकृतींत प्रेमाची भावना शिल्लक राहिली नाहीं. आतां हृदयाला प्रेमाच्या आठवणींचेंही ओझें वाटूं लागलें आहे

( ३ ) तूं परक्याच्या गोष्टी मला सागतेस ह्यावर माझा आक्षेप आहे मग त्याचीं गार्‍हाणीं म्हणून का होईना त्याचा उल्लेख तूं करतेस ना. तो उल्लेखही मला नको आहे.

( ४ ) प्रत्येक रोगाला औषध आहे असें म्हणतात तें खरें वाटत नाहीं असें असतें तर प्रेमरोगाला औषध का लाभत नाहीं?

( ५ ) मी लाचार अन् निराश्रित आहें पण दु:खात सुख एवढेंच कीं मी कुणाकडे पदर पसरून एकाही कणाचा ऋणाईत झालों नाहीं. मी कुणाचा गरमिंधा असा पण नाहीं. असलोंच तर स्वत चा आहें

( ६ ) मनुष्य हा एकटा असला तरी त्याच्या मनात विचाराची आणि कल्पनाची गर्दी उसळत असते म्हणून माझा एकात हा एकात आहे अशी जर समजूत झाली असेल तर ती चुकीची आहे. ती मैफिलच म्हणावयास हवी.

( ७ ) कुणाचे उपकार घेणें म्हणजे आपल्या दुर्बलतेचें लक्षण आहे. काळापासून धडा किंवा बोध घेऊ नये कारण तोही एक उपकारच नाहीं का?

( ८ ) जगापासून पळून जाणें हें स्वातंत्र्य अगर मुक्ति नव्हे. स्वार्थापासून मुक्त होणें हें स्वातंत्र्य-ससाराशीं संबंध तोडल्यानें नव्हे.

(९) सगळें आयुष्य परमेश्वराची आराधना करण्यात घालविलें तरी आयुष्य हळूहळू नाश पावत असल्याची जाणीव दु खदायक वाटतेच

(१०) त्या चंचलेच्या दारावरुन आम्ही आता हालत नाहीं मग आमच्यावर त्यासाठीं कल्पात कोसळला तरी चालेल

११०... कफस् मे हू गर अच्छा भी न जानें मेरे शेवन् को
मेरा होना बुरा क्या है नवा सजाने गुल्शन को ॥ १ ॥
नहीं गर हम् दमी आसा न हो ये रश्क क्या कम् है
न दी होती खुदाया आरजूये दोस्त दुश्मन् को ॥ २ ॥
न निकला आखसे तेरी एक् आसू उस जराहत् पर
किया सीने मे जिसने खूचका मिज़्गाने सोजन् को ॥ ३ ॥
खुदा शरमाये हाथोंको के रखते हैं कशाकश्मे
कभी मेरे गरेबाको कभी जानाके दामन को ॥ ४ ॥
अभी हम् कत्लगह का देखना आसा समझते हैं
नहीं देखा शिनावर जूये खू मे तेरे तौसन् को ॥ ५ ॥
हुआ चर्चा जो मेरे पावकी जंजीर बन्ने का
किया बेताब कान् मे जुम्बिशे जौहर्ने आहन् को ॥ ६ ॥
खुशीक्या खेतपर् मेरे अगर् सौबार् अब्र आवे
समझता हू के ढूढे है अभीसे वर्क खिर्मन् को ॥ ७ ॥
वफादारी वशर्ते उस्तुवारी अस्ले ईमा है
मरे बुत्खाने मे तो काबे मे गाडो ब्रेहेमन को ॥ ८ ॥
शहादत् थी मेरी किस्मत्मे जो दी थी ये खू मुझ्को
जहा तल्वार्को देखा झुका देता था गर्दन् को ॥ ९ ॥
न लुट्ता दिन्को तो कब् रात्को यौं बेखबर् सोता
रहा खट्का न चोरीका दुवा देता हूं रहजन् को ॥ १० ॥
सुखन् क्या कह नहीं सक्ते के जोया हों जवाहरके
जिगर् क्या हम् नहीं रखते के खोदें जाके मादिन् को ॥ ११ ॥
मेरे शाहे सुलेमा जाह् से निस्वत् नहीं ग़ालिब्
फरीदूं व जम् व कैखुसौ व दाराब् व बहमन् को ॥ १२ ॥

( १ ) मी पिंजऱ्यांत अडकून पडलों आहें. माझी शोभगोष्टें आवडली नाहींत तरी स्वतंत्र आणि संतुष्ट व मुक्त कंठांनीं गाणाऱ्या बागेंतील पक्ष्यांनी मला वाईट कां म्हणावें हें मला समजत नाहीं.

( २ ) प्रतिस्पर्धी माझा मित्र होऊं शकत नाही हें खरेंच. त्याचें वाईट वाटत नाहीं, पण परमेश्वरा, प्रतिस्पर्ध्याच्या मनांत प्रियेच्या सहवासाची आकांक्षा कां उत्पन्न केलीस? ती आकांक्षा त्याला दिली नसतीस तर मला त्याचा मत्सर वाटण्याचें कांहींच कारण नव्हतें.

( ३ ) माझ्या हृदयांतील जखमांचे टाके शिवतांना सुईच्या पापण्यासुद्धां रक्तानें भरून आल्या ( सुईला सुद्धा रक्त लागलें ). पण हे निर्दये, तुझ्या डोळ्यांत अश्रूंचा एक बिंदु-सुद्धा दिसला नाहीं.

( ४ ) माझे हात सारखे ओढाताणींत गुंतलेले असतात. कधीं प्रियेचा अनुनय करीत असतांना तिचा पदर ओढण्यांत गुंतलेले असतात. तर कधीं विरहावस्थेंत माझ्याच अंगावरचे कपडे फाडण्यांत गुंतलेले असतात. सारांश त्याची चुळबुळ ही सारखी चालूच असते. ह्या त्यांच्या अस्वस्थतेची मला लाज वाटते.

( ५ ) वधस्थान अगदीं साधारण असेल असें आम्हांला वाटतें. कारण आम्हीं तें अद्याप पाहिलेलें नाहीं. तेथें प्रियकराच्या हृदयाच्या चिंधड्या उडाल्या आहेत. रक्ताचे पाट वाहताहेत आणि त्यात तुझा तुफान आणि विजयी घोडा रक्ताच्या नद्यांतून पोहत चालला आहे. हें भयंकर दृश्य आम्हीं पाहिलें आहे कुठे ?

( ६ ) माझ्या पायांत शृंखला पडणार ही बातमी समजतांच राणींतील लोखंडांत एकच खळबळ उडाली; आणि हें भाग्य आपल्यापैकीं कुणाला लाभतें हें जाणून घेण्याकरितां त्यांच्यात अस्वस्थता निर्माण झाली.

( ७ ) माझ्या शेतावर गभरदार ढग आले तरी मला त्यांत काय आनंद वाटायचा ? उलट माझी पिकें जाळायला मिळतील म्हणून आतांपासूनच वीज ढगाआडून माझें शेत न्याहाळून पहाण्याकरितां आली असेंच मी समजतों.

( ८ ) कोणत्याही गोष्टींत श्रद्धा आणि निष्ठा ह्यांचें महत्त्व आहे. ब्राह्मण मूर्तिपूजक खरा पण त्यांतही त्यानें अतुल निष्ठा आणि श्रद्धा दाखविली आहे. मग त्याला मृत्यूनंतर काब्यापाशीं जागा देण्यास काय हरकत आहे ?

( ९ ) बळी जाणें हेंच माझ्या नशिबांत असलें पाहिजे नाहींतर कुठेंही तलवार दिसली कीं माझ्या मानेला आपोआप वाकण्याची सवय लागली नसती.

( १० ) दिवसा चोरांनीं माझें घर लुटून नेलें त्यामुळें रात्रीं निश्चिंत झोंप येत आहे. आतां चोरांची भीति राहिली नाहीं ह्याकरितां मी चोरांना दुवा देत आहें.

(११) आम्ही काय वाङ्मयरत्नें उधळूं शकत नाहीं आम्हीं रत्नाचा हव्यास का वरें धरावा ? आमच्या हृदयात साहित्य-सोन्याची खाण आहे इतर खाणींच्या मार्गे आम्हीं का वरं लागावें ?

(१२) सुलेमान, फरीदून, जमशीद कैखुस्रू, दारा, बहमन इत्यादि प्राचीन काळचे राजे माझे बादशहा बहादूरशहा याच्या पासगाळाही लगत नाहींत

१११ . . . ~~धोता~~ हु जब् मैं पीने को उस् सीमतन्के पाव्
रखता है जिद्से खींचके बाहर लगन् के पाव ॥ १ ॥
दी सादगीसे जान् पडू कोहकन् के पाव
हैहात् क्यों न टूट गये पीरजन् के पाव ॥ २ ॥
भागे थे हम बहोत् सो उसीकी सजा है ये
होकर् असीर दाबते हैं राहजन् के पाव ॥ ३ ॥
मरहम् की जुस्तजू मे फिरा हू जो दूर दूर्
तनूसे सिवा फिगार् हैं इस् खस्तातन् के पाव ॥ ४ ॥
अल्लाहरे जौके दश्ते नवर्दी के बाद मर्ग्
हिलते है खुद् बखुद् मेरे अंदर् कफन् के पाव ॥ ५ ॥
है जोशे गुल् बहार मे या तक के हर तरफ
उडते हुये उलझते हैं मुर्गे चमन के पाव ॥ ६ ॥
शब् को किसीके ख्वाब् मे आया न हो कहीं
दुखते हैं आज उस् बुते नाजुक् बदन् के पाव ॥ ७ ॥
गालिब् मेरे कलाममे क्यों कर् न हो मजा
पीता हु धोके खुस्रवे शीरीं सुखन् के पाव ॥ ८ ॥

(१) त्या सुंदरीचें चरणामृत प्राशन करण्याच्या इच्छेनं तिचे पाय धुवावे म्हणतों तर तिला माझ्या प्रेमाचा इतका तिटकारा आहे कीं ती आपले पाय मार्गे खेंचून घेते

(२) अरेरे, फरहादला म्हातारीनें शीरीनच्या मृत्यूची खोटी बातमी देऊन कसें फसविलं! त्या बातमीमुळें फरहादनं आत्महत्या केली त्या म्हातारीच पाय वाटतच तुटून का गेले पडले नाहीत म्हणजे फरहादची अशी दुर्दशा झाली नसती

(३) चोर लुटतील ह्या भीतीनें आम्ही पळून गेलों त्याचच फळ म्हणून त्याच चोराच्या तावडींत सापडून आम्ही आज त्याचे गुलाम बनलों आहोंत

(४) आमची दुर्दशा काय बरं सागावी! जखमाना मल्म शोधण्याकरिता आम्ही इतके भटकलों कीं त्या जखमापेक्षाही भयंकर अशा भेगा आमच्या पायाला पडल्या आहेत

(५) प्रेमवेडात रानोमाळ भटकण्याची हद्द याली हें वेड इतकें वाढलें आहे कीं मृत्यूनंतरही कफनाच्या आत माझे पाय चुळ्बूळ करीत आहेत

(६) ह्या वर्षी वसंतऋतूंत फुलाना इतका बहर आला आहे कीं उडणाऱ्या पक्ष्याचे पाय फुलात अडकू लागले आहेत

(७) नाजूक प्रियेचे पाय आज का बरें दुखत आहेत ती कुणाच्या तरी स्वप्नात चालत तर गेली नसेल ना?

(८) माझ्या काव्यांतून अमृत का बरें स्रवणार नाहीं? मधुरवाणीच्या कविसम्राट खुस्रोचे पाय धुऊन तें चरणामृत मी प्राशन करीत आहे ना?

११२ . . . वा उसको हौलदिल् है तो या मै हू शरम् सार्
यानें ये मेरी आहकी तासीर् से न हो ॥ १ ॥
अपने को देखता नहीं जौके सितम् को देख्
आयीना ता के दीदये नख्चीर से न हो ॥ २ ॥

(१) आज प्रिया अस्वस्थ आहे माझ्या विश्वासामुळें तर तिला हा त्रास होत नाहींना ह्या कल्पननें मीच लाजेनें अर्धमेला झाला आहें

(२) प्रियेची हौस तर पहा तिला शृंगार करण्यास आरसा नको आहे प्रियकराच्या शिकार बनलेल्या डोळ्याना आरसा समजून त्याच्या समोर शृंगारात नटण्याची तिला हौस वाटते आहे

११३ . . . वा पहोचकर् जो गश् आता पैहम है हम्को
सद्रहे आहगे जमींबोस कदम् है हम्को ॥ १ ॥
दिल्को मैं और मुझे दिल् महवे वफा रखता है
किस् कदर् जौके गिरफ्तारीये हम् है हम्को ॥ २ ॥
जोफ्से नक्शे पये मोर है तौके गरदन्
तेरे कूचेसे कहा ताकते रम् है हम्को ॥ ३ ॥
जान्कर् कीजे तगाफुल् के कुछ उम्मीद भी हो
ये निगाहे गल्त् अदाज् तो सम् है हमको ॥ ४ ॥
रश्के हम् तरही व दर्दे असरे बांगे हज़ीन्
नालये मुर्गे सहर तेगे दोदम् है हमको ॥ ५ ॥

सर उडानेके जो वादेको मुकर्रर् चाहा
हस्के बोले के तेरे सर्की कसम् है हम्को ॥ ६ ॥
दिल्के खूं करनेकी क्या वजह व लेकिन् नाचार
पासे बेरौनकीये दीदा अहम् है हम्को ॥ ७ ॥
तुम् वो नाजुक्के खमूशीको फुगा कहते हो
हम् वो आजिज् के तगाफुल भी सितम् है हम्को ॥ ८ ॥
लखनऊ आनेका बाइस नहीं खुल्ता यानी
हवसे सैरो तमाशा सो वो कम् है हम्को ॥ ९ ॥
मकुलये सिल्सिले शौक् नही है ये शहर्
अज्मे सैरे नजफ व तौफे हरम् है हम्को ॥ १० ॥
लिये जाती है कही एक् तवक्को गालिब्
जादये रहे कशिशे काफे करम् है हम्को ॥ ११ ॥

(१) प्रियेपाशीं पोहोंचल्यावर मला घेऱ्यावर घेऱ्या येत आहेत अन् मी जमिनीवर पडत आहे ह्या निमित्तान तरी पायाखालच्या जमिनीचें मला चुंबन घेण्यास मिळत आहे इतका मला प्रियेच्या दर्शनान आनंद झाला आहे

(२) मी हृदयाच्या तावडींत आणि हृदय माझ्या तावडींत सापडलें आहे प्रेमागुळें आम्हा दोघानाही बंधनाची किती ओढ आहे, हें ह्यावरून दिसून येइल

(३) मी इतका नि:शक्त झालों आहें कीं मुग्याच्या पावलांचीं चिन्हें सुद्धा माझ्या शरीराला भार वाटू लागलीं आहेत मग मला तुझ्यापासून निघून जाण्याची शक्ति कुठून वर्र असणार ?

(४) जाणूनबुजून तू दुर्लक्ष केलेंस तरी हरकत नाहीं त्यात मी तुझा प्रियकर आहे ह्याचा भास तरी होईल पण अगदीं अपरिचितासारखा दृष्टिक्षेप नको करूंस आपण त्या गावचे नाहीं असें वागणें मला खरोखरच विषतुल्य वाटतें

(५) प्रभातकाळच्या पक्ष्याचें कूजन मला दुधारी तलवारीसारखें वाटतें एकतर तो पक्षी माझा प्रतिस्पर्धी आहे कीं काय असें वाटतें दुसरें म्हणजे त्याचें व्यथित आणि तळमळीचें कूजन मला ताप देत आहे

(६) माझें शिरकाण करणार होतीस ना म्हणून मी तिला तिच्या वचनाची आठवण करून दिली तर ती हसून म्हणते काय कीं तें कसें बरें शक्य होईल! मी तुझ्या डोक्याची शपथ घेतली आहे ना मग मी तुझें शीर कसें बरं उडवीन!

(७) हृदयाचे रक्त डोळ्यात आलें नाहीं तर डोळ्याना अवकळा येते म्हणून तर आम्हांला आमचें हृदय रक्तरंजित करावे लागले आहे

(८) तुझी स्थिति अशी आहे कीं आम्ही गप्प राहिलों तरी तुला तें आमचें आक्रंदन वाटतें आणि आम्ही इतके असहाय्य कीं तुझी उपेक्षा म्हणजे आम्हाला मोठा जुलूम वाटतो

(९) आम्ही लखनौला का आलों तें काहीं कळत नाहीं वरें, प्रवासाची हौस म्हणावी तर ती काहीं आम्हाला विशेष नाहीं.

(१०) लखनौमध्यें आमचा प्रवास पूर्ण झाला असें नाहीं आम्हाला अजून करवला आणि मक्केची यात्रा पूर्ण करावयाची आहे.

(११) आम्ही कुठेंही गेलों तरी बरोबर आशा घेऊन जातों करम (कृपा) शब्दातील 'क' हें अक्षर आमचं लक्ष्य बनले आहे (आपल्या पेन्शनीच्या प्रकरणाकरिता गालिबनें कलकत्त्याचा प्रवास केला होता त्याला उद्देशून ही ओळ आहे.)

११४ . . . तुम् जानो तुम्को गैरसे जो रस्मो राह हो
मुझ्कोभि पूछते रहो तो क्या गुनाह हो ॥ १ ॥
बचते नहीं मुआखिजये रोजे हश्रसे
कातिल् अगर रकीब है तो तुम् गवाह हो ॥ २ ॥
क्या वो भि बेगुनाह कुश् व हक् नाशिनास् हैं
माना के तुम् बशर् नहीं खुर्शीदो माह हो ॥ ३ ॥
उभरा हुआ नकाब् मे है उन्के एक तार
मरता हू मैं के ये न किसीकी निगाह हो ॥ ४ ॥
जब् मैकदा छुटा तो फिर् अब् क्या जगह कि कैद
मस्जिद् हो मदरिसा हो कोई खानकाह हो ॥ ५ ॥
सुन्ते हैं जो बिहिश्तकी तारीफ् सब दुरुस्त
लेकिन् खुदा करे वो तेरी जल्वा गाह हो ॥ ६ ॥
गालिब् भी गर् न हो तो कुछ ऐसा जरर् नहीं
दुनिया हो यारब और् मेरा बादशाह हो ॥ ७ ॥

(१) दुसऱ्याशीं तुझे काय संबंध असतील ते असोत पण माझी विचारपूस केलीस तर काहीं गुन्हा होणार आहे काय ?

(२) कल्पाताच्या वेळीं तू परमेश्वराच्या निर्णयातून सुटून जाऊ शकत नाहीस तूं आपल्या प्रतिस्पर्ध्याकडून माझा वध करविलास मी काहीं वध केला नाहीं असें म्हणून तूं सुटून जाऊ शकणार नाहींस कारण वध त्यानें जरी केला असला तरी तू साक्षीदार होतीसच कीं.

( ३ ) मला चंद्रसूर्य म्हण, माणूस म्हणू नकोस ; असा तुझा आग्रह आहे. पण हें साग कीं चंद्र आणि सूर्य काय तुझ्यासारखे निरपराधी लोकांना पीडा देतात ? या अन्यायाची दाद घेत नाहींत ?

( ४ ) तिच्या कुरळ्यावर मला एक तंतु दिसतो तो कुणा प्रतिस्पर्ध्याच्या दृष्टीचा तर तंतू नसेल ना.

( ५ ) मद्यालयच सुटले तर जागेचें बंधन आम्हांला काय होय. मग मशीद, मठ, शाळा आणि दरगा हीं आम्हाला सर्व सारखींच आहेत. कुठेंही पिण्याची आमची तयारी आहे.

( ६ ) लोक स्वर्गाची तारीफ करतात म्हणून तिथें तू पाहिजेस. तिथें जर तूं नसलीस तर तो स्वर्ग आम्हांस तुच्छ होय.

( ७ ) मी नसलों तरी चालेल पण हें जग मात्र असावें आणि आमचा बादशाही दीर्घायु असला तरी पुरे.

गयी वो बात् के हो गुफ्तगू तो क्यौंकर हो
से कुछ न हुवा फिर कहो तो क्यौंकर हो ॥ १ ॥
जहन् मे उस फ़िकर् का है नाम् विसाल
र् न हो तो कहां जायें हो तो क्यौंकर हो ॥ २ ॥
है और यही कशमकश् तो क्या कीजे
है और यही गोमगो तो क्यौंकर हो ॥ ३ ॥
'कहो के गुजारा सनम् परस्तोंका
ो हो अगर ऐसीहि खू तो क्यौंकर हो ॥ ४ ॥
हो तुम् अगर देखते हो आयीना
े शहरमे हों एक दो तो क्यौंकर हो ॥ ५ ॥
सीब हो रोजे सियाह मेरा सा
स् दिन् न कहे रातको तो क्यौंकर हो ॥ ६ ॥
हमें फिर उनसे उम्मीद् और उन्हे हमारी कदर
हमारी बात ही पूछें न वो तो क्यौंकर हो ॥ ७ ॥
गलत् न था हमें खतपर गुमा तसल्लीका
न माने दीदये दीदार जो तो क्यौंकर हो ॥ ८ ॥
बताव उस मिज़्ह को देखकर के मुझको करार
ये नेश हो रगे जा में फिरो तो क्यौंकर हो ॥ ९ ॥

मुझे जुनूं नहीं ग़ालिब् वले बक़ौले हुज़ूर
फ़िराके यार में तस्कीन् हो तो क्योंकर हो ॥ १० ॥

(१) तिची जर गांठ पडली तर बोलणें-चालणें करूं असें वाटलें होतें. पण गांठ पडून बोलल्यों तरी त्याचा कांहींएक परिणाम झाला नाहीं. आतां उपाय काय ?

(२) आमच्या मनांत फक्त मीलनाची चिंता आहे. हें मीलन कसें घडावें आणि घडलें नाहीं तर काय करावें हीच एक काळजी मनाला लागून राहिली आहे.

(३) माझ्या मनांत तिच्याबद्दल आदर आहे. दुसरीकडे तिच्याबद्दलची ओढ आहे अशी माझ्या मनाची ओढाताण चालली आहे. तिकडे प्रियेचा स्वभाव संकोची आहे त्यामुळे तीही कसें बोलावें, काय बोलावें ह्या विचारानें बुचकळ्यांत पडली आहे.

(४) हे प्रिये, जगांतील सर्व तरुणींचा स्वभाव तुझ्यासारखाच असेल तर प्रियकरांची काय स्थिति होत असेल !

(५) अगे, आरशांत प्रतिबिंबित झालेल्या स्वतःच्या सौंदर्याचा तुला मत्सर वाटतो. मग तुझ्यासारख्या एक-दोन सुंदर स्त्रिया गांवांत असल्या तर विचारायला नको.

(६) माझ्यासारखी आपत्ति अन् संकटाचा गडद अंधार ज्यांच्यासमोर पसरला आहे त्यानें रात्रीला दिवस म्हणूं नये. (संकटांच्या अंधारासमोर रात्रही दिवसाप्रमाणें प्रकाशमान वाटते) तर काय करावें.

(७) ती आमच्याशीं बोलायला तयार नाहीं तर तिला आमची कदर काय कळणार आणि आम्ही तरी तिच्यापासून कोणती आशा बरें बाळगावी.

(८) तिचें पत्र आल्यानें मनाला समाधान होईल ही अपेक्षा खरी ठरली; पण डोळे तिच्या दर्शनाचे भुकेले राहिले त्याला काय करावें !

(९) प्रियेच्या पापण्या पहा आणि मग सांगा कीं ह्या पापण्यांचे कांटे ज्याच्या नसानसांत बसले आहेत त्याला स्वस्थता कशी लाभावी !

(१०) मी कांहीं वेडा नाहीं. पण प्रियेच्या विरहांत मला स्वस्थता मिळूं शकते हें कसें शक्य आहे.

किसी को देके दिल् कोई नवासंजे फ़ुग़ां क्यों हो
११६ . . . न हो जब् दिलहि सीने मे तो फिर् मुंह में जबां क्यों हो ॥ १ ॥
वो अपूनी ख़ू न छोड़ेंगे हम् अपनी वज़ा क्यों छोड़ें
सबुक् सर् बन्के क्या पूछे के हम्से सरगरां क्यों हो ॥ २ ॥
किया ग़म् ख़्वारने रुसवा लगे आग इस महब्बत् को
न लाये ताब् जो ग़मकी वो मेरा राज़्दां क्यों हो ॥ ३ ॥

वफ़ा कैसी कहांका इश्क जब सर् फोडना ठहरा
तो फिर अये संगदिल् तेराही संगे आस्तां क्यौं हो ॥ ४ ॥

कफ़स् मे मुझसे रुदादे चमन् कहते न डर हमदम्
गिरी है जिसपे कल् बिजली वो मेरा आशियां क्यौं हो ॥ ५ ॥

ये कह सकते हो हम् दिल मे नहीं हैं पर ये बतलावो
के जब् दिलमे तुम्हि तुम् हो तो आंखोंसे निहां क्यौं हो ॥ ६ ॥

गलत् है जज़्बे दिलका शिकवा देखो जुर्म किस्का है
न खींचो गर तुम् अपनेको कशाकश् दरमियां क्यौं हो ॥ ७ ॥

ये फित्ना आदमीकी खाना वीरानी को क्या कम है
हुये तुम् दोस्त जिस्के दुश्मन् उसका आसमां क्यौं हो ॥ ८ ॥

यही है आजमाना तो सताना किस्को कहते हैं
अदूके हो लिये जब् तुम् तो मेरा इम्तिहां क्यौं हो ॥ ९ ॥

कहा तुम्ने के क्यौं हो ग़ैर् के मिलनेमे रुसवाई
बजा कहते हो सच कहते हो फिर कहियो के हां क्यौं हो ॥ १० ॥

निकाला चाहता है काम क्या तानोंसे अय ग़ालिब्
तेरे बेमेहर कहनेसे वो तुझपर् मेहरबां क्यौं हो ॥ ११ ॥

(१) एखाद्याला आपलें हृदय अर्पण केल्यानंतर मग तक्रार आणि रुदन कशाकरितां ? आपल्यापाशीं जर हृदय शिल्लक नाहीं तर वाणीचा उपयोग तरी काय ?

(२) ती आपला जुलूम करण्याचा स्वभाव सोडीत नाहीं. आम्ही आपला स्वाभिमान सोडीत नाहीं. मग तूं आमच्यावर कां वरें चिडतेस हें विचारून आम्हीं आमची अप्रतिष्ठा का करून घ्यावी.

(३) माझ्या मित्रानींच माझ्या प्रेमाचा स्फोट करून माझा दुर्लौकिक केला. माझ्या शोकाचें रहस्य ज्याना संभाळतां येत नाहीं त्या मित्रांची मैत्री कसली ?

(४) कसलें प्रेम आणि कसली निष्ठा ! हे पाषाणहृदये, डोकें फोडून घ्यायचें ठरविल्यावर मला तुझ्याच उंबरठ्याचा दगड कशाला हवा ?

(५) मित्रा, मी बंधनांत आहें, आणि तूं स्वतंत्र आहेस. बागेंत काय घडलें हें मला मोकळ्या मनानें सांग. घाबरू नकोस. अरे काल बागेंत वीज कडाडली ती माझ्या घरट्यावरच पडली हें कशावरून ? दुसऱ्या कुणाचें तें घरटें असेल.

(६) मी तुझ्या हृदयात नाहीं ? तर तूं म्हणू शकत नाहींस आणि मग हृदयात तूंच आहेस तर माझ्या डोळ्यासमोर का नाहींस हू सागशील की नाहीं ?

(७) तुझ्याकडे मी आसक्ति जात आह ही तुझी तक्रार रास्त नाहीं ह्यात माझा दोष नाहीं तूं प्रतिकार करते आहेस, मार्गपुढ करीत आहेस म्हणूनच ना, ही ओढाताण चालली आहे

(८) तुझी मैत्री म्हणजे उध्वस्त होण्याची पूर्वतयारी ती पुरे नाहीं का मग काळानही अशा माणसाशीं वैर का वरें धराव ?

(९) तूं माझ्याशीं कायमच वैर पत्करलेंस तर माझ्या प्रेमाची परीक्षा काय वघतेस आणि तूं जें करतेस ती परीक्षा तर पीडिणें कशाला म्हणायच ?

(१०) प्रतिस्पर्ध्याशीं भेट नकोस त्यात फजिती आहे असें मीं तिला म्हटल तेव्हा ती चिडून म्हणते काय की ह्यात फजिती कसली ? ह्यास काय म्हणवयाचें ? तूं जें जें म्हणतेस तें ठीक आहे हच म्हणावं झाल

(११) हे गालिब, टोमण मारून आणि टोचून बोलून का ती तुला वश होणार आहे ?

११७. रहिये अब् ऐसी जगे चलकर् जहा कोई न हो
हम् सुखन् कोई न हो और् हम् जबा कोई न हो ॥ १ ॥
बेदरो दीवार्सा एक घर बनाया चाहिये
कोई हमसाया न हो और पासबा कोई न हो ॥ २ ॥
पडिये गर बीमार तो कोयी न हो तीमारदार
और अगर मर जाइये तो नौहाख्वा कोई न हो ॥ ३ ॥

(१) हे हृदया, चल आपण कोठतरी लांब आणि निर्जन जागीं राहू तिथें आपल्याशीं कुणी बोलणारा किंवा आपल बोलण ऐकणारा नको

(२) दारें आणि भिंती नसलेल असें एक घर आपण बनवू आपल्याला कुणी रखवालदार नको आणि कुणी शेजारी नको

(३) अशा ठिकाणी आजारी पडलों तर शुश्रूषा करणारा कुणी नको अन् मृत्यु आला तर आपल्याकरिता रुदन करणाराही कुणी नको

११८... अज़ मेहर तावज़र्रये दिल् व दिल् है आयीना
तूती को शप जिहत्से मुकाबिल है आयीना ॥ १ ॥

(१) सूर्यापासून धुळीच्या कणापर्यंत सर्वत्र आत्माच आहे अन् हा आत्मा म्हणजे आरसा असून त्याचा अनुभव करणें म्हणजे पोपटान आरशात आपल प्रतिबिंब चहूकडे पाहाण्यासारखें आहे उर्दू काव्यात पोपट आणि आरसा ह्याच प्रेम हा कविसंकेत आहे

११८ (अ) . . . हे सब्जाजार हर दरोदीवारे गमकदा
जिसकी बहार ये हो फिर उसकी खजा न पूछ ॥ १ ॥

नाचार बेकसी की भी हसरत् उठाइये
दुश्वारीये रह व सितमे हमरहा न पूछ ॥ २ ॥

(१) आमच्या घरावर ठिकठिकाणी गवत उगवलें आहे (घर बेचिराग झाल्याचें हें लक्षण होय) ज्याचा वसतऋतु इतका भयानक तर हिंवाळा कसा असेल ह्याची कल्पना केलेली बरी

(२) आधींच रस्ता वाईट त्यात सोबती मिळाले ते पण वाईट मग आमच्या दुर्दशेसंबंधीं बोलणेंही यदीण पण वाईट का असेनात ते सोबत् तर करीत होते ना!

११९ . . . सद् जल्वा रूबरू है जो मिज़गा उठाइये
ताकत् कहा के दीद् का एहसा उठाइये ॥ १ ॥

है सग पर् बराते मारो जुनूने इश्क
यानी हनूज़् मिन्नते तिफ्ला उठाइये ॥ २ ॥

दीवार बारे मिन्नते मज़दूरसे है खम्
अये खानमा खराब् न एहसा उठाइये ॥ ३ ॥

या मेरे जख्मे रश्कको रुसवा न कीजिये
या पर्दये तबस्सुमे पिनहा उठाइये ॥ ४ ॥

(१) डोळे उघडून पहा परमेश्वराच्या स्वरूपाचे शेंकडो साक्षात्कार दिसतील पण त्याचा अनुभव घेण्याची आमच्या डोळ्यात शक्ति कुठ आहे?

(२) प्रेमवेडात कुणाचे ऋण लागू नयेत पण मुलें दगड फेंकतात तेसुद्धा वेडाला आवश्यक आहे म्हणून वेडाला दगडाचे ऋण लागतें कवि म्हणतो कीं दगड म्हणजे वेडाच्या मूल्याची हुंडी का म्हणू नये?

(३) जगात कुणाचे उपकार घेऊ नयेत निर्जीव भिंतीसुद्धा मजुराच्या श्रमानें (उपकारानें) वाकतात मग मनुष्याचें काय?

(४) प्रतिस्पर्ध्यामुळें माझ्या हृदयावर जे आघात झाले आहेत त्याची हे प्रिये, टिंगल उडवू नकोस, आणि प्रतिस्पर्ध्याशीं मिळून माझी थट्टा करू नकोस हें नाहींतर तुझें स्मित तरी झळकूं दे

१२० . . . मस्जिद् के जेरे साया ख़राबात् चाहिये
भौं पास् आंख् क़िब्लये हाजात् चाहिये ॥ १ ॥
आशिक़् हुये हैं आप भी एक् और शख़्स पर
आख़िर सितमकी कुछ तो मुकाफात् चाहिये ॥ २ ॥
दे दाद् अये फलक् दिले हस्रत् परस्त् की
हां कुछ न कुछ तलाफिये माफात् चाहिये ॥ ३ ॥
सीखे हैं माहरुख़ोंके लिये हम् मुसव्विरी
तक़रीब् कुछ तो बहरे मुलाकात् चाहिये ॥ ४ ॥
मये से ग़रज़ निशात् है किस् रुसियाह को
यक् गूना बेख़ुदी मुझे दिन्रात् चाहिये ॥ ५ ॥
हैं रंगे लाला व गुल्‌ व निसूरीं जुदाजुदा
हर रंग मे बहार का इसबात् चाहिये ॥ ६ ॥
सर पाये खुम्पे चाहिये हंगामे बेख़ुदी
रू सूये क़िब्ला वक्ते मुनाजात् चाहिये ॥ ७ ॥
यानी बहसबे गर्दिशे पैमानये सिफात्
आरिफ हमेशा मस्ते मये जात् चाहिये ॥ ८ ॥
नशोनुमा है अस्लसे ग़ालिब् फरोग़ को
ख़ामोशीहीसे निकले है जो बात चाहिये ॥ ९ ॥

(१) मशीदीच्या जवळ मद्यालय हवे. परमेश्वरानें नाहीं का मशीदीतील कमानो-सारख्या दिसणाऱ्या भुंवयापाशीं वाढणीसारखे नेत्र निर्माण केले.

(२) शेवटीं तू एकाच्या प्रेमात फसलीस. बरें झालें. इतरांचा इतका छळ केलास त्याची शिक्षा म्हणून तुझ्यावर ही पाळी आली.

(३) हे काळा, माझ्या शेंकडो आकांक्षांचा तू नाश केलास. आतां माझी एखादी इच्छा तरी पूर्ण कर, म्हणजे माझ्यावर झालेल्या अन्यायाची अंशतः तरी फेड होईल.

(४) सुंदरीशीं आम्हांला भेटायला मिळावें म्हणून आम्ही चित्रकला शिकलों. भेटायला कांहींतरी कारण हवें ना!

(५) आनंद मिळावा म्हणून येथें कोण मदिरा पितो. केवळ रात्रंदिवस दुःखाची विस्मृति पाहिजे म्हणून मी मधु प्राशन करतों.

(६) फुलाचे रंग, मग ते अहिपुष्प असो कीं, गुलाब असो की शेवंती असो, विविध असतात, पण रसिकाना त्याचें महत्त्व वाटत नाहीं. ते फुलाना बहर आला आहे कीं नाहीं हें पाहतात.

(७) विस्मृतीच्या अवस्थेंत डोकें मदिरापात्रापाशीं टेकलेलें असावें आणि प्रार्थनेच्या वेळेला तोंड मक्केच्या दिशेकडे असावें.

(८) परमात्म्याची आराधना करावी ती स्वतःला विसरून आणि देहभान हरवून करावी. योग्यानें नेहमीं परमात्म-मंदिरेंत धुंद असावें.

(९) आधीं मूळ आणि नंतर विस्तार तसेंच आधीं विचार आणि नंतर त्यातून वाणीचा आविष्कार होतो.

१२१ ... बिसातें अजज् मे था'एकदिल्ह यक्कतरये खूंन वो भी
सो रहता है ब् अंदाज़े चकीदन् सरनिगू वो भी ॥ १ ॥
रहे उस शोख़से आज़ुर्दा हम् चंदे तकल्लुफ्से
तकल्लुफ् वरतरफ् था एक् अदाज़े जुनूं वो भी ॥ २ ॥
ख़ियाले मर्ग् कब् तस्कीन दिले आज़ुर्दा को बख़्शे
मेरे दामे तमन्नामे है एक् सैदे ज़बूं वो भी ॥ ३ ॥
न करता काश् नाला मुझको क्या मालूम था हम्दम्
के होगा बाइसे अफ्ज़ाइशे दर्दे दरूं वो भी ॥ ४ ॥
न इत्ना बुर्रिशे तेग़े जफा पर नाज़् फरमावो
मेरे दरियाये बेताबी मे है एक् मौजे ख़ूं वो भी ॥ ५ ॥
मये इश्रत् की ख़्वाहिश् साक़ीये गर्दूंसे क्या कीजे
लिये बैठा है एक् दो चार जामे वाज़गूं वो भी ॥ ६ ॥
मेरे दिल्मे है ग़ालिब् शौके वस्ल व शिकवये हिज्रां
ख़ुदा वो दिन् करे जो उस्से मै ये भी कहूं वो भी ॥ ७ ॥

(१) माझी असहाय अवस्था पहा. आहे एक हृदय त्यात सुद्धा रक्ताचा एकच बिंदु आहे. शोकामुळें त्याची स्थिति अशी झाली आहे कीं तो केव्हा गळून पडेल त्याचा नेम नाहीं.

(२) प्रियेशीं आम्ही नाराज होतों अथवा नाराजी कशाची म्हणायची तोही एक वेडाचाच प्रकार म्हणावयास हवा.

(३) मरणाच्या कल्पनेनें माझ्या शोकमग्न हृदयाला काय समाधान होणार आहे अन् ती कल्पना तरी प्रबल आहे काय ? जाळ्यात अडकलेल्या दुबळ्या आणि निरुपयोगी सावजासारखी ती क्षीण आणि दुबळी झाली आहे.

(४) मला वाटतें कीं आक्रंदनानें मनावरचा भार हलका होईल त्यानें उलट दुःख वाढेल असें वाटलें असतें तर मी प्रेमाचे गान्हाणें गायिलें नसतें.

(५) तुझ्या तलवारीच्या तीक्ष्ण पात्याचा गर्व करूं नकोस. माझ्या भावनाच्या तुफान दर्यांत तुझ्या पात्याहूनही तीक्ष्ण अशा किती तरी लहरी आहेत

(६) आम्ही काळरूपी साकीकडून मद्याची काय अपेक्षा करावी. त्याचे मद्याचे पेले उलटे आहेत. त्याच्यापाशीं काय लाभायचें आकाशाच्या घुमटाला येथें उलटा पेला म्हटलें आहे.

(७) मला मीलनाची आसक्ति आहे आणि विरहाचें गान्हाणें पण आहे. तिला मी आपलें गान्हाणें सांगून मीलनाची इच्छा प्रकट करूं शकेन असा एखादा दिवस उजाडेल का?

१२२ . . . है बज्मे बुतामे सुखन् आजुर्दा लबोंसे
तंग आये हैं हम् ऐसे खुशामद् तलबोंसे ॥ १ ॥
है दौरे कदहा वजेहे परेशानीये सहबा
यकबार लगादो खुमे मये मेरे लबोंसे ॥ २ ॥
रिंदाने दरे मयेकदाह गुस्ताख हैं जाहिद
जिन्हार न होना तरफ् इन् बेअदबोंसे ॥ ३ ॥
बेदादे वफा देख् के जाती रही आखिर
हरचद् मेरी जान् को था रब्त् लबोंसे ॥ ४ ॥

(१) प्रियेच्या मैफिलींत खुशामद करणाऱ्या लोकांचा इतका कंटाळा आला आहे कीं तिथें मला तोंड उघडायलाही नको वाटतें

(२) थावून थावून दारू पिणें आम्हाला कांहीं आवडत नाहीं. ती सुरईच उचलून आमच्या तोंडाला का लावीत नाहींत

(३) अरे धर्मप्रचारका, मद्यालयाच्या दारात जमलेले हे मद्यपि फार उद्धट आहेत. त्यांच्या नादीं लागू नकोस बसा

(४) माझे प्राण नेहमीं ओठाशीं घुटमळत पण निष्फळ प्रेमानें ह्या दोघांची ताटातूट केली आणि प्राण ओठाना सोडून गेले.

१२३... ता हम्को शिकायत् कीभी बाकी न रहे जा
सुन् लेते हैं गो जिक्र हमारा नहीं करते ॥ १ ॥
गालिब् तेरा अहवाल सुना देंगे हम् उनको
वो सुन्के बुलाले ये इजारा नहीं करते ॥ २ ॥
घरमें था क्या के तेरा गम् उसे गारत करता
वो जो रखते थे हम् वो एक हसरते तामीर सो है ॥ ३ ॥

(१) प्रियेची वागणूक तर पहा. माझा उल्लेख आला की ती ऐकून घेते पण एक शब्द बोलत नाहीं. म्हणजे आमचा उल्लेखही तिला नको आहे असें गान्हाणें धरण्याचीही तिनें सोय ठेवली नाहीं.

(२) गालिब, तुझी हकीकत तिच्या कानावर घालीन पण ती ऐकून ती तुला जवळ बोलावील ह्याची खात्री मी देऊं शकणार नाहीं.

(३) तुझ्या शोकानें उध्वस्त करायला हृदयांत शिल्लक काय राहिलें होतें. हो, एक गोष्ट शिल्लक होती आणि ती म्हणजे आशेची हुरहुर.

१२४... गमे दुनियासे गर पायीभी फुर्सत सर उठानेकी
फलक् का देखना तक़रीब् तेरे याद् आनेकी ॥ १ ॥
खुलेगा किस् तरह मज़्मूं मेरे मक्तूब का यारब्
कसम खायी है उस् काफिरने कागज़्के जलानेकी ॥ २ ॥
लिपट्ना परनियां मे शोलये आतिश् का आसां है
वले मुश्किल है हिक्मत् दिलमे सोजे गम् छुपानेकी ॥ ३ ॥
उन्हे मंज़र अपूने ज़ख्मियोंको देख् आना था
उठे थे सैरे गुल्को देखना शोखी बहानेकी ॥ ४ ॥
हमारी सादगी थी इल्तिफाते नाज़ पर मरना
तेरा आना न था ज़ालिम् मगर तम्हीद् जानेकी ॥ ५ ॥
लकद्कूबे हवादिस्का तहम्मुल् कर नहीं सकती
मेरी ताकत् के ज़ामिन् थी बुतोंके नाज् उठानेकी ॥ ६ ॥
कहूं क्या खूबिये अव्ज़ाए अब्नाये ज़मां गालिब्
बदी की उस्ने जिस्से हम्ने की थी बारहा नेकी ॥ ७ ॥

( १ ) जीवनाच्या शोकातून डोकें वर काढण्यास अवकाश मिळाला कीं डोळे आकाशाकडे वळतात आणि आकाश ( नियति ) पीडा देणारे असल्यामुळें त्यामुळें तुझ्या छळणाच्या स्वभावाची आठवण होते.

( २ ) माझ्या पत्राचा मजकूर तिला कसा समजावा ? कारण माझें प्रत्येक पत्र न वाचतांच जाळून टाकण्याची तिनें शपथ घेतली आहे.

( ३ ) रेशमी कपड्यात एक वेळ आग लपविणें सोपें आहे परंतु हृदयातील दु:खाची आग लपविणें कठीण आहे.

( ४ ) तिनें बागेंत फिरण्याचें नुसतें निमित्त केलें. वास्तविक तिच्या मनांत आपले पीडित कोणत्या स्थितींत तळमळत पडले आहेत हें पहावयाचें होतें.

( ५ ) तूं आलीस. आम्हाला वाटलें कीं आमच्यावर तुझी कृपा आहे. तुझ्यावरून आम्ही जीव ओवाळून टाकण्यास तयार झालों. पण येताक्षणींच मला जायचें आहे म्हणून तूं म्हणूं लागलीस तर हा मुद्दा एक प्रकारचा छळ नाहीं का.

( ६ ) पूर्वी प्रियेचे नाजनखरे सांभाळण्याची शक्ति होती पण आता संकटाचे आघात सहन करण्याचीही शक्ति राहिली नाहीं.

( ७ ) जगाची रीत सत्य सांगावी. ज्यांचें आम्हीं चांगलें केलें ते आमचें वाईटच करीत आले आहेत.

१२५... हासिल से हात् धो बैठ् अये आरज़ू ख़िरामी
दिल जोशे गिरिया मे हैं डूबी हुयीं असामी ॥ १ ॥

उस शमाकी तरहसे जिसको कोयी बुझादे
मैं भी जले हुवोंमे हूं दागे नातमामी ॥ २ ॥

( १ ) हे आकांक्षानो, तुम्ही आता यशाचीही आशा धरूं नका कारण हृदय शोकमग्न झालें आहे. तें आता काहीं हालचाल करण्याच्या परिस्थितींत नाहीं.

( २ ) माझ्या निष्फळ जीवनाची मजा सांग वाटते. माझें जीवन म्हणजे दिवा फुणी मधेंच विझवूं पहावा पण तो पूर्णपणें न विझता अर्धवट जळत रहावा अशाप्रमाणेंच आहे.

१२६... क्या तंग् हम् सितम् जदगाका जहां है
जिसमे के एक बैजये मोर आसमां है ॥ १ ॥

है कायनात् को हरकत तेरे जौक़से
परतौसे आफताब् के जर्रेमे जान् है ॥ २ ॥

हालाके है ये सेलीये खारासे लालरग्
गाफिल को मेरे शीशे पे म्ये का गुमान् है ॥ ३ ॥
की उसने गरम् सीनये अहले हवसमे जा
आवे न क्यों पसद् के ठड़ा मकान् है ॥ ४ ॥
क्या खूब् तुमने गैरको बोसा नहीं दिया
बस चुप् रहो हमारेभि मूहमे जबान् है ॥ ५ ॥
बैठा हे जो के सायये दीवारे यार मे
फर्मांरवाये किश्वरे हिंदूसितान् है ॥ ६ ॥
हस्तीका एतिबार भी गम्ने मिटा दिया
किससे कहूँ के दागे जिगर का निशान है ॥ ७ ॥
है वारे एतिमादे वफादारी इसकदर
गालिब हम इसमे खुश हैं के नामेहरबान है ॥ ८ ॥

(१) आम्हा पीडिताच जग किती सकुचित आहे तें पहा मुगीचें अडें (क्षुद्रक वस्तु) सुद्धा आम्हाला विशाल आकाशापेक्षाही जड आणि सर्वव्यापी वाटत आहे

(२) धुळीच्या कणात सूर्याचे किरण प्रविष्ट झाले कीं ते कण इकडे तिकडे धावूं लागतात त्याप्रमाणेंच हे परमेश्वरा, इच्छा झाली कीं सृष्टीचा कणन् कण चळवळ करू लागतो

(३) माझें मधुपात्र (घातूचे) दगडाने ठोकून ठोकून तावडेलाल झाल आहे पण लोकाना वाटतें कीं त्यात लाल वारुणी भरली आहे म्हणून माझें पात्र लाल दिसत आहे ह्या कवितेत हृदयाच्या स्थितीकडे इशारा केलेला आहे

(४) प्रिया प्रतिस्पर्ध्यांच्या हृदयात जाऊन बसली आहे त्याच हृदय भावनाविरहित आणि म्हणून थंड आहे अन् अशीं थडगार आसन कुणाला प्रिय नसतात

(५) मी प्रतिस्पर्ध्याला चुंबन दिल नाहीं असें तू म्हणतेस पण मला ह पटत नाहीं थाव, मला तुझें चुंबन घेऊनच त्याची शहानिशा करून घेऊ दे

(६) हा प्रेमवेडा जो भिंतीच्या सावलींत बसला आहे त्याकडे पहा तो हिंदुस्थानचा बादशहाच वाटतो

(७) शोकावेगानें माझें काळीज नाहींसें झाल आहे आता मी कुणाला सांगूं लागलों कीं माझ्या जखमा म्हणजे माझ्या काळजाचीं चिन्हें होत, तर त्याना खर वाटणार नाहीं

(८) ती आमच्यावर अवकृपा करते आहे त्यातही आम्हाला आनंद आहे; कारण तिला आमच्या निष्ठेबद्दल खात्री आहे आपण कितीही त्याना छळले तरी हे सहन करतात, असें तिला वाटतें. मग तिच्या छळण्याने आम्हाला आनंद का होऊं नये.

१२७ . . . दर्दसे मेरे है तुझको बेकरारी हाये हाये
क्या हुयी जालिम् तेरी गफ़लत् शिआरी हाये हाये ॥ १ ॥
तेरे दिलमे गर न था आशोबे गम् का हौसला
तूने फिर क्यौं की थी मेरी गम् गुसारी हाये हाये ॥ २ ॥
क्यौं मेरी गम् ख्वारगीका तुझको आया था ख़ियाल
दुश्मनी अपनी थी मेरी दोस्तदारी हाये हाये ॥ ३ ॥
उम्र भर का तूने पैमाने वफ़ा बांधा तो क्या
उम्र को भी तो नही है पायदारी हाये हाये ॥ ४ ॥
जहर लगती है मुझे आबो हवाये ज़िंदगी
यानी तुझसे थी उसे नासाजगारी हाये हाये ॥ ५ ॥
गुलफ़िशानीहाये नाज़े जल्वेको क्या हो गया
खाकपर होनी है तेरी लालाकारी हाये हाये ॥ ६ ॥
शर्मे रुसवाईसे जा छिप्ना नकाबे खाकमे
खत्म् है उल्फ़तकि तुझपर पर्दादारी हाये हाये ॥ ७ ॥
ख़ाक्मे नामूस पैमाने महब्बत मिल गयी
उठ गयी दुनियासे राहोरस्मे यारी हाये हाये ॥ ८ ॥
हाथ ही तेग् आजमा का कामसे जाता रहा
दिलपे इक् लगने न पाया जख्मकारी हाये हाये ॥ ९ ॥
किस् तरह काटे कोयी शब्हाये तारे बरशागाल
है नजर खूकरदये अख्तर शुमारी हाये हाये ॥ १० ॥
गोश् महजूरे पयाम् व चश्म महरूमे जमाल
एक् दिल तिस् पर ये ना उम्मेदवारी हाये हाये ॥ ११ ॥
इश्कने पकडा न था गालिब अभी वहशत्का रंग
रह गया था दिलमे जो कुछ जाकआरी हाये हाये ॥ १२ ॥

गालिबच्या तारुण्यात वयाच्या बावीस-तेवीसाव्या वर्षी त्याची एका तरुणीशीं ओळख झाली. ह्या ओळखीचें पुढें प्रेमात रूपांतर झालें. पण तें प्रेम फलद्रूप होण्याच्या आधीं तिला मृत्यु आला. ह्या घटनेनें गालिबला अत्यंत दुःख झालें. चाळीस वर्षांनंतर आपल्या बासष्टाव्या वर्षी गालिबनें आपल्या खाजगी पत्रात ह्या घटनेचा उल्लेख करून, प्रियेच्या मृत्यूनें आपल्याला किती हळहळ वाटली आणि अद्याप तिची किती आठवण होते हें दाखविलें आहे. ही शोक-कविता गालिबनें प्रियेच्या मृत्यूवर लिहिली आहे.

(१) हे प्रिये, माझें दुःख पाहून तुझ्या मनाला यातना होत आहेत. प्रियकरांची उपेक्षा करण्याचा तरुणींचा स्वभावधर्मच असतो. तो तूं ह्या वेळीं विसरून जाऊन कां बरें माझ्या दुःखानें स्वतःला त्रास करून घेत आहेस.

(२) अगे, शोकाचा भार वाहण्याचें तुझ्यांत सामर्थ्य नव्हतें तर माझ्याबद्दल तूं कां बरें जिव्हाळा दाखविलास.

(३) माझ्यावर प्रेम करून तूं कां बरें आपला नाश करून घेतलास. माझ्याशीं प्रेम म्हणजे तूं तुझ्या स्वतःशी शत्रुत्व केल्यासारखें आहे.

(४) जीवनभर मी एकनिष्ठ राहीन असें तूं म्हणाली होतीस, पण अरेरे, हें जीवन क्षणभंगुर ठरलें ना!

(५) मला सभोंवतालचें वातावरण विषतुल्य लागत आहे. कारण हें वातावरण तुलाही मानवलें नाहीं.

(६) एके काळीं तूं सौंदर्याचे रंग उधळीत होतीस पण आतां तुझ्या कबरीवर फुलांच्या राशी पडून रंग भरूं लागला आहे.

(७) प्रेमाचें गुपित उघडें पडेल म्हणून तूं मातीच्या पडद्याआड कां जाऊन लपलीस? पडदापद्धतीची तूं हद्द केलीस म्हणायची?

(८) एकनिष्ठेचीं वचनें मातींत मिळून गेलीं म्हणजे जगांतून प्रेमाची रीत नाहींशी झाली असेंच म्हटलें पाहिजे.

(९) हृदयावर जीवघेणी आघात करण्यापूर्वीच तुझा हात जायबंदी व्हावा ह्यापेक्षां दुर्दैव तें कोणतें?

(१०) प्रेमांत आकाशांतील तारे पाहाण्याची आमची सवय. आतां तुझ्या विरहाचा वर्षाऋतु आम्हीं कसा काय घालवावयाचा? (तारे वर्षाकाळांत दिसत नाहींत).

(११) आमचे कान तुझ्या संदेशापासून आणि डोळे तुझ्या दर्शनाला वंचित झाले आहेत. एक हृदय आणि त्यावर निराशेचा जबरदस्त आघात झाला आहे. काय हे दुर्दैव!

(११) अद्याप माझ्या प्रेमाला वेडाचे स्वरूप आलें नव्हतें. प्रेमपूर्तीची हौस फिटली नव्हती. तोच हा आघात माझ्यावर झाला आहे.

१२८... सरगश्तगीमे आलमे हस्तीमे यास् है
तस्कीन् कों दे नवेद् के मरने की आस है ॥ १ ॥
लेता नही मेरे दिले आवाराकी खब़र
अब्तक् वो जान्ता है के मेरेही पास है ॥ २ ॥
कीजे बया सुरूरे तपे ग़म् कहा तलक्
हर मू मेरे बदन् पे जबाने सिपास् है ॥ ३ ॥
है वो ग़ुरूरे हुस्नसे बेगानये वफ़ा
हरचंद् उसके पास दिले हक्‌शिनास है ॥ ४ ॥
पी जिस कदर मिली शबे महताब् मे शराब्
अब् बल्ग़मी मिजाज को गरमी ही रास है ॥ ५ ॥
हर एक् मका को है मकींसे शर्फ् असद्
मज्नूं जो मरगया है तो जगल् उदास है ॥ ६ ॥

(१) प्रेमवेडामध्ये मी जीवनाला कंटाळून गेलें आहें. आता ह्या उदासीनतेला लौकरच येणाऱ्या मृत्यूची खुषखबर द्या; कारण मृत्यूनेच हीं दुःखें दूर होणार आहेत.

(२) प्रिया माझ्या हृदयाची कांहीं दखल घेत नाहीं. तिला वाटतें हें हृदय अद्याप माझ्यापाशीं आहे; पण तें कधींच माझ्या ताब्यातून निघून गेलें आहे.

(३) माझ्या शोकाची दाहकता काय वर्णावी? ह्या दाहकतेनें माझ्या अंगावर रोमांच उभे रहातात. त्यावरून माझ्या स्थितीची कल्पना येईल.

(४) ती सहृदय नाहीं असें नाहीं, पण सौंदर्याच्या अहंकारामुळें ती माझा छळ आणि उपेक्षा करीत आहे.

(५) चांदण्या रात्रींत मिळेल तितकें मद्य पी बरें. कारण ह्या शीत प्रकृतीला मानवणारी मदिरा हीच वस्तु आहे.

(६) घरात रहाणाऱ्याचा घराला चढता लागतो. पहा, मजनू मरुन गेला म्हणून अरण्य खिन्न झालें आहे.

१२९... गर खामुशीसे फायदा इख्फ़ाये हाल है
खुश् हूं के मेरी बात समझनी मुहाल है ॥ १ ॥
किसको सुनाऊं हसरते इजहार का गिला
दिल फर्दे जमो खर्चे जबानहाये लाल है ॥ २ ॥

किस पर्देमे है आयीना पर्दाज् अये खुदा
रहमत्को उज्ररव्वाहे ल्बे बेसवाल हैं ॥ ३ ॥

है है खुदा नख्वास्ता वो और दुश्मनी
अये शौके मुन्फ़इद ये तुझे क्या खियाल है ॥ ४ ॥

मुश्कीं लिबासे काबा अलीके कदम् से जान्
नाफे जमीन् है न के नाफे गज़ाल है ॥ ५ ॥

वहशत् पे मेरी अर्सये आफाक् तग् हे
दरिया जमीन् को अर्के इन्फिआल हैं ॥ ६ ॥

हस्तीके मत् फरेबमे आजाइयो असद्
आलम् तमाम् हल्कये दामे खियाल हे ॥ ७ ॥

(१) गम्म राहिल्यान आपली मनस्थिति बाहेर दिसून येत नाहीं माझें वागणें असें आहे ह्यामुळें लोकाना अर्थबोध होत नाहीं हें खरें आहे नाहीं का ?

(२) माझ्या अतृप्त आकाक्षाच गाऱ्हाणें कुणासमोर सागू ? माझें हृदय म्हणजे अशा गाऱ्हाण्याचें एक मोठ दप्तर बनलें आहे

(३) परमेश्वरा, मी पापी आह माझ्या तोंडून शब्द निघत नाहींत तुझ्या कृपा दृष्टि कुठें गुतून पडल्या आहेत ? त्या माझ्याकडे का वळत नाहींत ?

(४) प्रिया अन् तुझ्याशीं वैर, अशा विचाराची, हे लज्जित रसिकते, सवय सोडून दे बरें

(५) काब्यावर काळा कपडा चढवितात त्याला सुगंध अलीच्या सहवासानें आला आहे (मक्क्यात अलीचा जन्म झाला) हा सुगध कस्तुरीमृगाचा नव्हे काब्याला पृथ्वीची नाभि समजत कस्तुरीमृगाची नाभि काबा नव्हे पृथ्वीची नाभि आहे कपड्याला सुगंध अलीमुळें लाभला अशी कल्पना केली आहे

(६) माझ्या प्रेमवेडाला हें जग अगदीं आकुचित झालं आहे आपण इतके लहान आणि क्षुद्र झालों ह्याची विश्वाला लाज वाटली तुम्हाला समुद्र आणि जलाशय दिसतात ते ह्या विश्वाला संकोच आणि लज्जा ह्यामुळें आलेला घाम होय

(७) हे असद, ह्या अस्तित्वाच्या भ्रमात गुरफटूं नकोस अरे, ही सारी सृष्टि म्हणजे कल्पनाचं जाळें आहे

१३० . . तुम् अपने शिकवेकी बाते न खोद् खोदके पूछो
उजर करो मेरे दिलसे के इसमे आग दबी है ॥ १ ॥

दिला ये दर्दे अलम् भी तो मुगतनम है के आखिर
न गिरियये सहरी है न आहे नीमशबी है ॥ २ ॥

(१) माझी स्थिति खोदून खोदून विचारू नकोस वरें. कारण माझ्या हृदयात आग सुप्त आहे ती ह्यामुळें भडकायची.

(२) हे हृदया, हा जीवनशोक बरा समज कारण क्षणभरानें हे निःश्वास आणि हीं रुदनें नेहमींकरिता नाहीशीं होतील

१३१ . . एकूजा हर्फे वफा लिखा था वो भी मिट गया
जाहिरा कागज् तेरे खतका गलत् बर्दार है ॥ १ ॥

जी जले जौके फनाकी नातमामी पर न क्यौं
हम् नहीं जलते नफस हरचद आतिश् बार है ॥ २ ॥

आगसे पानीमे बुझते वक्त उठती है सदा
हरकोयी दरमादगी मे नालेसे लाचार है ॥ ३ ॥

है वही बद् मस्तिये हर जर्रेका खुद् उजूरख्वा
जिसके जल्वेसे जमींता आसमा सरशार है ॥ ४ ॥

मुझसे मत् कह तू हमें कहता था अपनी जिंदगी
जिंदगीसे भी मेरा जी इन् दिनों बेजार हैं ॥ ५ ॥

आखकी तस्वीर सरनामे पे खींची है के ता
तुझपे खुल जाये के उसको हसरते दीदार है ॥ ६ ॥

(१) हे प्रिये, तुझ्या पत्रात एके ठिकाणीं निष्ठा हा शब्द लिहिलेला दिसतो पण तो शब्द पुसून गेला होता साहजिकच आहे मनात नसताना कागदावर उतरलेले शब्द टिकतील तरी कसे ? ते आपोआप पुसले जाणारच

(२) नाहींसे होण्याची आमची इच्छा दृढ दिसत नाहीं नाहींतर श्वासोच्छ्वास इतका दाहक असताना आम्हाला मृत्यु कधींचाच यायला हवा होता आमच्या मनाच्या निर्धाराचा हा अभाव हृदयाला सारखा जाणवतो

( ३ ) पाण्यांत जळते निखारे घातले कीं आवाज झाल्याशिवाय राहात नाहीं. कोणतीही वस्तु असो, दु:ख हृदयात बसलें कीं आक्रंदनाच्या स्वरूपांत तोंडावाटे बाहेर पडल्याशिवाय राहात नाहीं.

( ४ ) परमेश्वराच्या स्वरूपाच्या आविष्कारानें कणन्कण गतिमान झाला आहे. पण ही आपलीच शक्ति आहे ह्या कल्पनेनें त्याला बेचैन केलें आहे.

( ५ ) हे प्रिये, तूं माझा प्राण आहेस, माझें जीवन आहेस असें तूं म्हणायची. आता त्याचा पुनरुच्चार करूं नकोस. कारण आतां मला ह्या जीवनाचा कंटाळा आला आहे.

( ६ ) मी पत्राच्या पाकिटावर डोळ्याचें चित्र काढलें आहे. तुला पाहाण्याकरिता डोळे किती भुकेले आहेत ह्याची तुला कल्पना यावी हा हेतु आहे.

१३२ . . . पीनस पे गुज़रते हैं जो कूचेसे वो मेरे
कंधा भी कहारोंको बदलने नहीं देते

१३२ (अ) . . . मेरी हस्ती फ़ज़ाये हैरताबादे तमन्ना है
जिसे कहते हैं नाला वो इसी आलम का अन्क़ा है ॥ १ ॥
खज़ा क्या फ़स्ले गुल कहते हैं किसको कोई मोसम हो
वही हम हैं कफस है और मातम बालोपर का है ॥ २ ॥
वफ़ाये दिलबरा है इत्तिफ़ाक़ी वर्ना अये हमदम
असर फ़र्यादे दिल हाये हज़ींका किसने देखा है ॥ ३ ॥
न लायी शोख़ीये अंदेशा ताबे रंजे नौमीदी
कफ़े अफसोस मलना अहदे तजदीदे तमन्ना है ॥ ४ ॥

ती उघड्या पालखींतून माझ्या आळींतून जाते तेव्हा माझ्या घरासमोर पालखी वाहणारे खांदे बदलण्याकरिता थारावें म्हणतात तर ती त्यांना तिथें खांदेही बदलूं देत नाहीं इतका तिला माझा कंटाळा आहे.

( १ ) मनुष्य अति दु:खानें मुग्ध झाला कीं आक्रंदन करण्याचें विसरून जातो. कवि म्हणतो कीं ह्या वेळीं मी पण मुग्ध झालों आहे. त्यामुळें नि:श्वास टाकणें, आक्रंदन करणें दिसून येत नाहीं, इतकेंच. पण ह्यावरून ते भाव माझ्यात नाहींत असें मात्र समजूं नका.

( २ ) कुठला हिंवाळा अन् कुठला वसंतऋतु. कोणताही ऋतु असो तेच आम्ही, तेच हे कारागार आणि तीच आमच्या असहाय स्थितीची हळहळ चालू आहे.

( ३ ) प्रिया एकनिष्ठ आहे तर तो प्रकार केवळ योगायोग समजावा नाहींतर निःश्वास आणि आक्रंदन ह्याचा परिणाम झालेला कुणी पाहिला आहे.

( ४ ) माझ्या आसक्तीला निराशा सहन झाली नाहीं. निराशेनें मी हातावर हात चोळीत आहें. हातावर हात देऊन जणू काय मी तळमळ चालू ठेवण्याचें वचन देत आहे.

१३३ . . . रहम कर जालिम के क्या बूदे चिरागे कुश्ता है
नब्जे बीमारे वफा दूदे चिरागे कुश्ता है ॥ १ ॥
दिलल्गीकी आरजू बेचैन् रखती है
वर्ना या बेरौनकीये सूदे चिरागे कुश्ता है ॥ २ ॥

( १ ) हे प्रिये, तुझ्या ह्या प्रियकरावर थोडीशी तरी दया कर त्याचें महत्त्व काय आहे त्याच्या नाड्या म्हणजे विझलेल्या दिव्याच्या धुरासारख्या आहेत त्या केव्हा नाहींशा होतील ह्याचा काहीं नेम नाहीं

( २ ) प्रीतीच्या छंदामुळें आमचें हृदय सारखें तळमळत आहे प्रीति नसती तर हृदयाची अशी स्थिति का झाली असती ? तो दिवा पहा सारखा जळत आहे त्या दाहकतेनेंच त्याचा शेवटीं नाश होणार. ह्या दाहकता नसती तर तेल काय, वाती काय अन् दिवा काय कोणतेंच नुकसान झालें नसतें

१३४ . . . चश्मे खूबा खामुशीमे भी नवा पर्दाज है
सुर्मा तू कहवे के दूदे शोलये आवाज है ॥ १ ॥
पैकरे उश्शाक् साजे तालेए नासाज् है
नाला गोया गर्दिशे सय्यारेकी आवाज् है ॥ २ ॥
दस्तगाहे दीदये खूनारे मजनू देखना
यक् बियाबा जल्वये गुल फर्श् पा अदाज् है ॥ ३ ॥

( १ ) प्रिया गप्प असली तरी तिचे डोळे बोलके आहेत. असें वाटतें कीं, तिच्या डोळ्यातील काजळ हें ध्वनींतून निर्माण झालें आहे

( २ ) प्रियकराचें शरीर म्हणजे दुर्दैवाचें वाद्य होय त्याचीं गाऱ्हाणीं आणि आक्रंदन म्हणजे सतत फिरणाऱ्या ग्रहाचा ध्वनि होय

( ३ ) मजनूच्या रक्तरंजित नेत्रांची शक्ति पाहा त्यामुळें वाळवंट फुलांचा सडा पडलेल्या उपवनाप्रमाणें भासत आहे

१३५ . . . इश्क् मुझको नहीं वहशत् ही सही
मेरी वहशत् तेरी शुहरत् ही सही ॥ १ ॥
कता कीजिये न ताल्लुक़ हमसे
कुछ नही है तो अदावत् ही सही ॥ २ ॥

मेरे होने मे है क्या रुसवायी
अये वो मज्लिस् नही ख़िल्वत् ही सही ॥ ३ ॥
हम् भी दुश्मन् तो नहीं हैं अपने
गै्रको तुझसे महब्बत् ही सही ॥ ४ ॥
अप्नी हस्तीहीसे हो जो कुछ् हो
आगही गर् नही गफ्लत् ही सही ॥ ५ ॥
उमर् हर्चद् के है बर्केखिराम्
दिल्के ख़ून् कर्नेकी फ़ुर्सत् ही सही ॥ ६ ॥
हम् कोयी तर्क वफा करते हैं
न सही इश्क़् मुसीबत् ही सही ॥ ७ ॥
कुछ् तो दे अये फ़ल्के ना इन्साफ़
आह् व फरयाद् की रुख़्सत् ही सही ॥ ८ ॥
हम् भी तस्लीम् की ख़ू डालेंगे
बे नियाज़ी तेरी आदत् ही सही ॥ ९ ॥
यार् से छेड चली जाये असद्
गर् नही वस्ल तो हस्रत ही सही ॥ १० ॥

(१) प्रिये, मार्गे प्रेम म्हणजे तुग वेड बाग्ते वरें तें वेड का असेना ह्यामुळें तुझा लौकिक झाला हें काय कमी समाधान आहे

(२) प्रिये, माझ्याशीं आपला सबंध तोडूं नकोस अगे, प्रेम नसल तर द्वेष तरी कर ज्याचा ती द्वेष करते तो हा प्रियकर हें तरी आपलें नातें कायम राहील

(३) मी तुझ्याजवळ असलों तर काय वाईट आहे मी मैफिलींत तुला नकोसा असलों तर मानी एकातात गाठ घे

(४) परक्याशीं तुझें प्रेम असेल ही गोष्ट खरी असो वा नसो पण आम्ही तुझे शत्रु तर नाहीं ना !

(५) आपल्या अस्तित्वाशीं सबंध असावयास हवा आपल्या अस्तित्वाची जाणीव नसेल तर विस्मृति हवी

(६) आयुष्य हें विजेसारखें क्षणभंगुर असेल पण त्यात सुद्धा प्रेमापायीं हृदयाचें रक्त वाहावण्यास वेळ मिळोच

(७) सकटाच्या भीतीनें आम्ही प्रेमाचा त्याग करणारे नव्हेत प्रेमात सकटें असलीं तरी त्याना आम्ही सकट समजूनच तोंड देऊ

(५) मला शक्य असतें तर कृपण वसुंधरेला विचारलें असतें की, बोल, इतकीं अमूल्य नररत्नें तूं दडवून ठेवलीं आहेस त्यांचें तूं काय केलेंस. त्यांचा तुलाही लाभ नाहीं आणि जगालाही त्यांचा लाभ तूं मिळूं दिला नाहींस.

(६) माझ्या प्रतिस्पर्ध्यांनीं माझ्यावर भलभलते आरोप लादले आणि माझा सारखा छळ केला.

(७) आज विनवणी न करतांही प्रिया चुंबनें देत आहे ह्याचें काय कारण. प्रतिस्पर्ध्याच्या बैठकींत तर तिला ही सवय लागली नसेल ना.

(८) ती हट्टाला पेटली असेल तर गोष्ट दुसरी. पण दिलेलीं अनेक वचनें तिनें पाळलीं हें आमच्या पथ्यावर पडले.

(९) गालिब, तूंच सांग, तूं कोणत्या उत्तराची अपेक्षा करतोस. तूं आपलें गाऱ्हाणें सांगितलेंस आणि तिनें तें ऐकून घेतलें ह्यापलीकडे तुला उत्तर काय मिळणार आहे.

१३८ . . . रफ़्तारे उम्र क़तए रहे इज़्तिराब् है
इस् साल के हिसाब् को वर्क़ आफ़ताब् है ॥ १ ॥
मीनाये मयें है सर्व निशाते वहार से
बाले तदरौ जल्वये मौजे शराब् है ॥ २ ॥
ज़ख़्मी हुवा है पाश्ना पाये सबात् का
ने भागने की गूं न इक़ामत् की ताब् है ॥ ३ ॥
जादादें बादा नोशीये रिंदां है शपजिहत्
ग़ाफ़िल गुमां करे है के गीती ख़राब् है ॥ ४ ॥
नज़ारा क्या हरीफ़ हो उस् बर्क़े हुस्नका
जोशे वहार जल्वेको जिसके नक़ाब है ॥ ५ ॥
मैं नामुराद् दिलकी तसल्लीको क्या करूं
मानाके तेरे रुख़्से निगह् कामयाब है ॥ ६ ॥
गुज़रा असद् मसर्रते पैग़ामे यारसे
क़ासिद् पे मुझको रश्के सवालो जवाब् है ॥ ७ ॥

(१) वर्षांची गणना सूर्याच्या गतीवरून करतात. मनुष्याच्या आयुष्याची गणना खरें म्हटलें तर विजेच्या गतीवरून करावयाला पाहिजे, इतकें आयुष्य क्षणभंगुर आहे. अन् त्याशिवाय दगदगीचें आणि संकटाचें आहे म्हणून कालगणनेला विजेची गती धरावी हेंच योग्य आहे.

(२) मदिरेची सुरई वसंतऋतूंत सुरूच्या झाडासारखी प्रफुल्लित झाली आहे आणि मधुलहरी चकोराच्या पंखाप्रमाणें भासतात

(३) आमच्या निर्धाराचे पाय पंगू झाले आहेत. प्रेमाच्या क्षेत्रात आता धावण्याची काय किंवा टिकून राहाण्याची काय शक्ति राहिली नाहीं

(४) लोकांना वाटतें कीं आम्ही मद्यपी म्हणजे कफल्लक आहोंत खरें म्हणजे सगळें जग ही आम्हा मद्यप्याची जहागीर आहे. आम्ही स्वत ला जगाचे अधिपति समजतों.

(५) त्या सुंदरीच्या चेहेऱ्याला पडदा म्हणजे बहरलेल्या वसंताचा होय. त्या चेहेऱ्याकडे पाहाण्याची आमच्या दृष्टींत शक्ति नाहीं

(६) तुला पाहून माझ्या डोळ्यांचे पारणें फिटलें; पण निराश हृदयाचें समाधान कसें करूं. हृदयाची ओढ वेगळीच आहे.

(७) दूताच्या द्वारें प्रियेचा संदेश येणें ही आनंदाची गोष्ट आहे. पण मला तो आनंद नको आहे. कारण दूत ह्या कर्माच्या निमित्यानें प्रियेशीं बोलेल ह्याचा मला हेवा वाटतो.

१३९ . . . देखना क़िस्मत् के आप् अपने पे रश्क़ आजाये है
मै उसे देखू भला कब् मुझसे देखा जाये है ॥ १ ॥

हात् धो दिल्से यही गर्मी गर् अदेशे मे है
आबगीना तुदीये सहबासे पिघला जाये है ॥ २ ॥

ग़ैर् को यारब् वो क्योंकर् मनए गुस्ताख़ी करे
गर् हया भी उसको आती है तो शरमा जाये है ॥ ३ ॥

शौक़् को ये लत् के हरदम् नाला खींचे जाइये
दिल्की वो हालत् के दम् लेनेसे घबरा जाये है ॥ ४ ॥

दूर् चश्मे बद् तेरी बज्मे तरब्से वाहवा
नग़्मा हो जाता है वा गर नाला मेरा जाये है ॥ ५ ॥

गर्चे है तर्ज़े तग़ाफुल पर्दादारे राज़े इश्क़्
पर् हम् ऐसे खोये जाते हैं के वो पा जाये है ॥ ६ ॥

उसकी बज्म् आराइयां सुनकर् दिले रंजूर् या
मिस्ल नक़्शे मुद्दुआये ग़ैर् बैठा जाये है ॥ ७ ॥

होके आशिक् वो परीरुख और नाज़ुक् बन् गया
रंग खुल्ता जाये है जितना के उड्ता जाये है ॥ ८ ॥
नक्शको उसके मुसव्विर पर भी क्या क्या नाज़ हैं
खींचता है जिस् कदर उतनाही खींचा जाये है ॥ ९ ॥
साया मेरा मुझसे मिस्ले दूद् भागे है असद्
पास मुझ आतिश बजाके किससे ठहरा जाये है ॥ १० ॥

( १ ) आमच्या मत्सराची हद्द झाली स्वत आम्ही प्रियेकडे पाहातों तर स्वत बद्दलही मत्सर वाटूं लागतो ह्या मत्सरी स्वभावामुळे प्रियेच्या दर्शनाला आम्ही आपण होऊन वंचित झालों काय हें आमचें दुर्दैव !

( २ ) तुझ्या भावना इतक्या दाहक आहेत तर हृदयाची आशा सोडून दे कसा कारण हृदयाच्या नाजूक पानाचे तुझ्या भावनारूपी जळफळीत मद्यानें वितळून पाण्यात रूपांतर झाल्याशिवाय राहाणार नाहीं

( ३ ) प्रतिस्पर्ध्यानें लगट केली तर तिनें प्रतिकार कसा करावा कारण लज्जेनें संकोचाला पारावार राहात नाहीं

( ४ ) एकीकडे आसक्तीला दीर्घ निश्वास सोडण्याची हौस तर दुसरीकडे हृदय इतकें दुबळें झालें आहे कीं एवढ्याशा श्वासोच्छ्वासानें त्याला घाबरल्यासारखें होतें

( ५ ) प्रिये, तुझ्या आनंदी बैठकीला दृष्ट न लागो तुझ्या बैठकीचें वातावरण काय वर्णावें ? आमचीं गाऱ्हाणीं बैठकींत पोहोंचेपर्यंत स्तुतिगीतामध्यें तीं बदलून जातात

( ६ ) आतून प्रेम असलें तरी तिनें आमचा छळ करू नये म्हणून आम्ही वरकरणी दुर्लक्षाचें सोंग आणण्यास जातों पण तिच्यापाशीं पोहोंचल्यावर आमचें हें वरपांगी सोंग पार नाहींसें होतें आणि वस्तुस्थिति दिसून येते

( ७ ) परक्यावरोबर ती मौज करीत असल्याचें वृत्त कानांवर पडलें कीं दु खानें मटकन् बसावें अशी मनाची स्थिति होते आणि तिकडे प्रतिस्पर्धी बैठकींत आनंदात बसलेले असतात

( ८ ) प्रेमात सांपडून ती अप्सरा अधिकच नाजूक दिसूं लागली आहे म्हणजे प्रेम चिंतनानें चेहेऱ्यावरचा रंग जितका उडून चालला आहे तितकाच प्रणयरंगाला बहर येतो असें म्हटलें पाहिजे

( ९ ) प्रियेच्या चित्रानेंही नखरा करावा काय ? चित्रकार प्रियेचें चित्र काढूं इच्छितो पण त्याला तें जमत नाहीं म्हणजे प्रियेचें चित्रही स्वतःला ओढून धरीत आहे असें म्हटलें पाहिजे

(१०) धुराप्रमाणें माझी सावली माझ्यापासून लांब पळते आहे. आमच्या हृदयांत अग्नि पेटलेला आहे. त्यामुळें त्यापुढें आमची सावलीही टिकाव धरीत नाहीं मग इतरांची गोष्ट सोडून द्या.

१४० . . . गर्मे फ़रयाद रखा शक्ले निहालीने मुझे
तब अमां हिज्रमे दी बुर्दे न्यालीने मुझे ॥ १ ॥
निसया व नक़दे दो आलम् की हक़ीक़त मालूम्
लेलिया मुझसे मेरी हिम्मते आलीने मुझे ॥ २ ॥
कसरत आरायीये वहदत है परस्तारीये वह्‌म
कर दिया काफ़िर इन् अस्‌नाम् ख़ियालीने मुझे ॥ ३ ॥
हवसे गुलका तसव्वुरमे भी खटका न रहा
अजब् आराम दिया बेपरोवालीने मुझे ॥ ४ ॥

(१) विरहाच्या रात्रीं शय्येवर रंगीबेरंगी चित्रें काढलेली चादर पाहून मला दु:खानें भडभडून आलें; कारण त्यामुळें मला प्रियेच्या छबीची आठवण झाली. हाय, प्रियेची मूर्ति डोळ्यांसमोर दिसते पण प्रिया जवळ नाहीं. विरहाच्या शीत रात्रींत माझ्या दाहक निश्वासानें थोडी तरी ऊब लाभली, नाहीं तर माझे हाल वर्णन करतां येण्यासारखे नव्हते.

(२) माझा निर्धार दांडगा आहे त्यामुळें मी स्वत:ला इह काय पर काय कोणत्याही गोष्टीनें स्वत:ला विकलें नाहीं. मी माझा स्वाभिमान टिकविला आहे.

(३) एकमेवाद्वितीय परमेश्वराचें स्वरूप अनंत कणाकणातून दिसून येतें असें म्हणतात. पण मला तें पटत नाहीं. कारण आम्हां एकेश्वरवाद्यांना ह्यांत अनेक देवतांच्या आराधनेचा भास होतो आणि हें आमच्या तत्त्वाच्या विरुद्ध आहे.

(४) मी बंधनात आणि वर पंख कापलेला अशा स्थितींत मला बागेंतील फुलांवरही आसक्ति नाहींशी झाली आहे.

१४१ . . . कारगाहे हस्तीमे लालादाग़ सामान् है
बर्के ख़िर्मन् राहत् ख़ूने गरमे देहक़ान् है ॥ १ ॥
ग़ुंचये नाशिगुफ़्तहा बर्गे आफ़ियत मालूम्
बावजूदे दिल्‌ जमयी ख़्वाबे गुल परीशान है ॥ २ ॥
हम् से रंजे बेताबी किस तरह उठाया जाये
दाग़े पुश्ते दस्ते अजज़ शोला ख़स् बदंदान् है ॥ ३ ॥

उग् रहा है दरोदीवार् पे सब्जा गालिब्
हम् बियाबामे हैं और् घरमे बहार् आयी है ॥ ४ ॥

८(१) हें अस्तित्व शोकमय आहे कितीही कष्ट करा सारें काहीं क्षणभंगुर आहे फुलाचा रंग आकर्षक आहे पण त्यावरचा डाग हें त्याच्या क्षणैक आयुष्याचें लक्षण आहे शेतकरी काबाडकष्ट करतो ह्या कष्टन त्याचे रक्त तापतें पण त्याला मिळणारें फळ ह टिकत नाहीं म्हणजे त्याचें तापलेलें रक्त हें त्याच्या कष्टाच्या फळाला विजेसारखें दु:खपूर्ण करतें म्हटलें पाहिजे साराश, ह जीवन कष्टमय एतएव दु:खमय आहे.

८(२) कळ्या उमलतात पण त्या उमलल्यानंतर आपण किती काळ टिकू ह्या चिंतेनें कळ्याना स्वस्थता लाभत नाहीं क्षणभंगुर आयुष्याची त्याना काळजी लागली आहे

(३) ह्या भयंकर जगात अग्नीनेंही दातीं तृण धरावें आणि निर्धारान जमिनीवर गुडघे टेकावे अशी स्थिति आहे मग आमचीं दु:खें दूर कशीं वरें व्हावीं?

(४) हे गालिब, काय आमची शोचनीय स्थिति आहे घरात ठिकठिकाणीं हिरवळ उगवून जंगल झालें आहे हिरवळ म्हणजे वसंतऋतूच आमच्या घरीं वसंतऋतु फुलवीत आणि आम्हीं मात्र वनवासात भटकत फिरावें ह आमचें दुर्दैव (घरात ठिकठिकाणीं गवत उगवणें हें घर उध्वस्त झाल्याच चिन्ह आहे कवीनें वसंतऋतूचा उल्लेख आपली केविलवाणी स्थिति निदर्शण्यासाठीं केला आहे)

१४२ . . . सादगीपर उस्के मर जानेकी हस्रत दिलमे हे
बस् नही चलता के फिर खंजर कफे कातिल मे हैं ॥ १ ॥

देखना तकरीर् की लज्जत् के जो उसने कहा
मैंने ये जाना के गोया ये भी मेरे दिलमे हैं ॥ २ ॥

गर्चे हे किस् किस् बुरायीसे व ले बाईहमा
जिक्र मेरा मुझसे बेहतर् है के उस् महफिल मे हैं ॥ ३ ॥

बस् हुजूमे ना उम्मीदी खाक् मे मिल जायेगी
ये जो एक् लज्जत हमारी सओए बेहासिल मे हे ॥ ४ ॥

रजे रह क्यौं खींचिये वामादगीको इश्क है
उठ नहीं सक्ता हमारा जो कदम मंजिल मे हैं ॥ ५ ॥

जल्वाजारे आतिशे दोज़ख हमारा दिल सही
फितनये शोरे कियामत किस्के आनोगिल्द मे है ॥ ६ ॥
है दिले शोरीदये गालिब तिल्स्मि पेचोताब
रहम् कर् अपनी तमन्ना पर के किस् मुश्किल मे है ॥ ७ ॥

(१) प्रियेच्या नैसर्गिक साधेपणावर जीव ओवाळून टाकावा ही आकांक्षा मनात आहे पण तिच्या हातात वध करण्याकरिता खंजीर आहे मग आपण होऊन मरून जाण्याची आमची इच्छा कशी फलद्रूप होणार !

(२) तिच्या मनात विचार आला कीं माझ्याही मनात तोच विचार येतो आणि मग ती मनासारखें जेव्हा बोलूं लागते तेव्हा त्या समाधानाची गोडी काय वर्णावी !

(३) तिच्या बैठकींत माझी चर्चा होते ना हेंच माझें भाग्य समजतों मग ती चर्चा माझ्या विरुद्ध असली तरी हरकत नाहीं

(४) आमच्या निष्फळ प्रयत्नात जी गोडी आहे तिला हे निराशेच्या झुडींनो, नाहींशी करूं नका

(५) माझे पाय थकले आहेत जणूं काय गांततेला माझ्या पायाशीं प्रेम जडाव असें वाटत आहे म्हणूनच कीं काय ती प्रेमाच्या कठीण रस्त्यात पाय उचलूं देत नाहीं

(६) आमच्या हृदयात भयंकर दाहकता असेल कबूल पण हे प्रिये, प्रलय उडवून देण्याची शक्ति तर तुझ्या रोमारोमात भरली आहे

(७) हे प्रिय, माझें हृदय म्हणजे एक अद्भुत चक्रव्यूह झाला आहे आणि त्यात तुझ्याबद्दलची आकांक्षा अडकून पडली आहे त्या आकांक्षावर कृपा दाखवून तिला ह्या पेचांतून सोडव ( म्हणजेच माझी तुझ्यासबधाची आकांक्षा फळाला येऊ द )

१४३ . . . दिल्से तेरी निगाह जिगर् तक् उतर गयी
दोनोको इक् अदामे रज़ामद कर गयी ॥ १ ॥
शक़ हो गया है सीना खुशा लज़्ज़ते फिराक
तक्लीफे परदादारीये जख्मे जिगर गयी ॥ २ ॥
वो बादये शबानाकी सरमस्तिया कहा
उठिये बस् अब् के लज़्ज़ते ख्वाब सहर गयी ॥ ३ ॥
उडती फिरे है खाक् मेरी कूये यार मे
बारे अब अये हवा हवसे बालो पर गयी ॥ ४ ॥

देखो तो दिल्ह फरेबीये अंदाजे नक्शे पा
मौजे खिरामे यारभी क्या गुल्ह कतर गयी ॥ ५ ॥

हर बूल हवस ने हुस्न परस्ती शिआर की
अब् आबरूये शेवये अहले नजर गयी ॥ ६ ॥

नज़्ज़ारे ने भी काम् किया वां नकाव् का
मस्तीसे हर निगाह तेरे रुखपर बिखर गयी ॥ ७ ॥

फ़र्दा वदीका तफ़र्का यक्बार मिट् गया
कल् तुम् गये के हमपे कियामत् गुजर गयी ॥ ८ ॥

मारा जमाने ने असदुल्लाखां तुम्हें
वो वल्वले कहां वो जवानी किधर गयी ॥ ९ ॥

( १ ) तुझी दृष्टि हृदयांतून उतरून काळजाला जाऊन भिडली म्हणजे एका दृष्टिक्षेपांत तू हृदय आणि काळीज काबीज करून टाकतेस.

( २ ) विरहाच्या वेदना मी फार कष्टानें लपवून ठेवीत होतों. आतां ह्या वेदनांमुळें छाती फाटून गेली. त्यामुळें वेदनांवरील पडदा हटला ; ही मोठ्या समाधानाची गोष्ट घडली.

( ३ ) त्या रात्रींच्या मैफिलीची गोडी आतां कुठें? आतां उद्या, पहाटेच्या स्वप्नाचीही लज्जत आता संपली.

( ४ ) मी धुळीला मिळालों. हे वायो, माझी धूळ उडवून तू प्रियेच्या परिसरांत नेऊन टाकीत आहेस हें बरें झालें. आता मला उडण्याची किंवा धडपड करण्याची आकांक्षा राहिली नाहीं.

( ५ ) प्रियेचीं पदचिन्हें जिथें जिथें उमटलीं गेलीं आहेत तिथें तिथें मनाला लुब्ध करील असा त्या जागेंत रंग भरून राहिला आहे.

( ६ ) सौंदर्याची उपासना रसिकांनीं करावी पण आजकाल कोणीही छचोर आणि आंबटशोकी माणूस सौंदर्याच्या मागें लागतो मग त्याची रसिकता खरी असो वा नसो त्यामुळें खऱ्या रसिकाची किंमत कमी होऊन गेली आहे.

( ७ ) माझी दृष्टि तुझ्या मुखापर्यंत पोहोंचून बेभान झाली. ती विखरल्यामुळें तुझें दर्शन घडणें अशक्य झालें. जणूं काय माझी विखुरलेली दृष्टि हाच तुझा पडदा बनला.

( ८ ) तू निघून गेल्यामुळें जी मनःस्थिति झाली त्यामुळें काळाचें भान मला राहिलें नाहीं. कल्पांताच्या वेळीं असेंच होतें असें म्हणतात. म्हणजे माझ्यावर कल्पांत कोसळला असें म्हणावयास हवें.

( ९ ) हे असदुल्लाखान, ( कवीचें नांव ) काळानें तुझापुरताच निकाल लावला. तें तुझें *तारुण्य अन् तारुण्यसुलभ आकांक्षा आणि हुरहुरी कुठें गेल्या.*

१४४... तस्कीन् को हम् न रोयें जो ज़ौके नज़र मिले ·
हूराने खुल्दमे तेरी सूरत मगर मिले ॥ १ ॥
अपनी गलीमे मुझको न कर दफ़्न् बाद कत्ल
मेरे पतेसे खल्कको क्यों तेरा घर मिले ॥ २ ॥
साकी गरी की शर्म् करो आज वर्ना हम्
हरशब् पियाही करते हैं मये जिस कदर मिले ॥ ३ ॥
तुझसे तो कुछ कलाम् नहीं लेकिन् अये नदीम्
मेरा सलाम् कहियो अगर नामाबर मिले ॥ ४ ॥
तुम्को भी हम् दिखायें के मजनूंने क्या किया
फुर्सत् कशाकशे ग़मे पिनहांसे गर मिले ॥ ५ ॥
लाज़िम् नहीं के खिज़्रकी हम् पैरवी करें
जाना के एक् बुजुर्ग् हमे हमसफ़र मिले ॥ ६ ॥
अये साकिनाने कूचये दिल्दार देखना
तुम्को कहीं जो ग़ालिबे आशुफ्तासर मिले ॥ ७ ॥

( १ ) स्वर्गांत तुझ्या स्वरूपाची अप्सरा लाभली तर मनाचें थोडें तरी समाधान होईल. पण तें अशक्य आहे.

( २ ) माझा वध केल्यानंतर आपल्या आळींत मला पुरूं नकोस. नाहींतर त्यामुळें माझ्या प्रतिस्पर्ध्यांना तुझ्या घरचा पत्ता कळायचा.

( ३ ) अरे साकी ( मद्य पाजणारा ), रोज मिळेल तितकी पिऊन आम्ही समाधान मानतों. आज आपल्या धंद्याचा कांहीं तरी अभिमान बाळग आणि आम्हांला हवी तितकी पिऊं दे पाहूं.

( ४ ) अरे मित्रा, निरोप देऊन मी एकाला माझ्या प्रियेकडे पाठविला तर तो तिच्या प्रेमांत गुरफटून वेडा होऊन रानोमाळ भटकतो आहे. तुझ्या विश्वासावर त्याच्या हातीं निरोप पाठविला. तुला मी कांहीं म्हणत नाहीं. पण तो वेडा भेटला तर त्याला माझा हात जोडून नमस्कार सांग.

(५) अगे, त्या प्रेमशोकांतून थोडी उसत तर मिळूं दे मग मी पण दाखवून देईन की मजनू (सुविख्यात प्रेमिक) माझ्यापुढें कांहींच नाहीं

(६) खिजर (उर्दू–फारसी वाङ्मयातील परमेश्वरी वाटाड्या. हा चिरंजीव आहे असें समजतात.) ह्यांचे अनुयायित्व आम्हाला पत्करण्यास नको आहे त्याच्याप्रमाणें आम्हींही परमेश्वरीमार्गांत भटकत आहोंत पार तर तो आमच्यासारखा मुमुक्षु होता एवढें आम्ही मानूं

(७) हे प्रियेच्या परिसरात वावरणाऱ्यानो, त्या प्रेमवेड्या गालिबचा कुठे शोध लागतो का पहा बरें!

१४५ . . . कोयी दिन् गर ज़िंदगानी और है
अपने जी मे हम्ने ठानी और है ॥ १ ॥
आतिशे दोज़खमे ये गरमी कहा
सोज़े गम्हाये निहानी और है ॥ २ ॥
बार हा देखी हैं उन्की रंजिशें
पर कुछ् अबकी सरगिरानी और है ॥ ३ ॥
देके खत् मूह देखता है नामाबर
कुछ तो पैगामे जबानी और है ॥ ४ ॥
क़ातेए आमार हैं अक्सर नुजूम्
वो बलाये आस्मानी और हैं ॥ ५ ॥
हो चुकीं गालिब् बलाये सब् तमाम्
एक मर्गे नागहानी और है ॥ ६ ॥

(१) आम्हाला अद्याप आयुष्य असलें तर आम्ही कांहीं तरी करून दाखविण्याचा निर्धार केला आहे

(२) आमच्या हृदयात पेटलेली जी आग आहे ती नरकातील उष्णतेंत कुठें सापडणार ?

(३) तिच रुसणें फुगणें पुष्कळदा पाहिलें आहे पण तिचा आजचा रंग औरच दिसत आहे

(४) प्रियेने दिलेलें पत्र मला दूत देऊन माझ्या तोंडाकडे का पाहात आहे प्रियेनें कांहीं तोंडी निरोप पण दिला आहे की काय ?

(५) वक्रदृष्टीनें ग्रह मनुष्याचा नाश करतात पण ही प्रिया त्याच्यापेक्षाही भयंकर आहे, कारण ती मरू देत नाहीं तर जीवतपणीं मरणाच्या यातना भोगण्यास लावीत आहे

(६) गालिब, सारीं सकटे सपली आता फक्त एक आकस्मिक घटना घडणें राहिलें आहे ती घटना म्हणजे मृत्यु होय

कोयी उम्मीद बर् नहीं आती
१४६ . . . कोयी सूरत् नजर् नहीं आती ॥ १ ॥
मौत का एक दिन् मोऐयन है
नींद क्यौं रात्भर् नहीं आती ॥ २ ॥
आगे आती थी हाले दिल्पे हसी
अब् किसी बात् पर् नही आती ॥ ३ ॥
जान्ता हू सवाने ताअतो जहद्
पर तबीयत उधर् नहीं आती ॥ ४ ॥
है कुछ् ऐसीही बात् जो चुप् हू
*वर्ना क्या बात् कर् नहीं आती ॥ ५ ॥*
क्यौं न चीरन् के याद् करते हैं
मेरी आवाज् गर् नहीं आती ॥ ६ ॥
दागे दिल गर् नजर नहीं आता
बूभि अये चारागर् नहीं आती ॥ ७ ॥
हम् वहा हैं जहासे हम्को भी
कुछ हमारी खबर् नहीं आती ॥ ८ ॥
मरते है आरजूमे मरनेकी
मौत आती है पर नहीं आती ॥ ९ ॥
काबा किस् मूँह से जावोगे गालिब्
शरम् तुम्को मगर नहीं आती ॥ १० ॥

(१) मला आता कोणतीच आशा राहिली नाहीं कोणताही मार्ग दिसत नाहीं

(२) मृत्यूचा दिवस ठरलेला असतो ना मग तो त्याशिवाय काही येत नाहीं पण ह्या झोपेला काय झाल आहे कुणास ठाऊक ती का वर येत नाहीं ?

(३) मागें मला स्वत च्या स्थितीबद्दल हसूं येत असे पण आता कोणत्याच गोष्टीचें हसू येत नाहीं इतका मी निराश झालों आहें

(४) पुण्याचरणाचं महत्त्व मला पटत नाहीं असें नाहीं पण काय करूं ? माझें मनच तिकडे वळत नाहीं

(५) आम्ही गप्प बसलों त्याला काहीं तरी कारण असलें पाहिजे आम्हाला बोलतां येत नाहीं असं थोडेंच आहे.

(६) मी गान्हाणें गायिलें नाहीं कीं प्रियेला वाटतें कीं आपल्यावरचें ह्याचें लक्ष उडालें म्हणून तिच्या समाधानाकरिता तरी मला सारखें सारखें आकंदन करावें लागतें.

(७) अरे वैद्या, माझ्या हृदयाच्या जखमा तुला दिसत नसतील पण म्हणून त्याचा वास लपून राहील काय ? मास जळूं लागलें कीं त्याचा वास सुटतो तसेंच हृदय जळत आहे तें दिसत नसलें तर जाणवत नाहीं असें थोडेंच आहे

(८) आमचें वेड ह्या थराला गेलें आहे कीं, आम्हाला स्वत चीच जाणीव राहिली नाहीं

(९) मरणाच्या इच्छेवर आम्ही जीव द्यायला बसलों आहोंत. पण मरण येत नाहीं, त्याला काय करावें

(१०) हे गालिब, तुला लाज कशी काय वाटत नाहीं अरे, तूं हा असा, मक्क्याची यात्रा करायला तुला तोंड आहे का ?

१४७ . . . दिले नादा तुझे हुवा क्या है
आखिर् इस दर्द् की दवा क्या है ॥ १ ॥
हम हैं मुश्ताक् और वो बज़ोर्
या इलाही ये माजरा क्या हैं ॥ २ ॥
मै भी मूँह् मे ज़बान रखता हूं
काश् पूछो के मुद्दुआ क्या है ॥ ३ ॥
जबके तुझ बिन् नहीं कोयी मौजूद
फिर् ये हंगामा अये खुदा क्या है ॥ ४ ॥
ये परी चेहरा लोग कैसे हैं
गम्ज़वो इश्वो अदा क्या है ॥ ५ ॥
शिकने ज़ुल्फ़े अंबरीन् क्यौं है
निगहे चश्मे सुर्मासा क्या है ॥ ६ ॥
सब्ज़ा वो गुल कहासे आये हैं
अब्र क्या चीज़ है हवा क्या है ॥ ७ ॥
हम को उनूसे वफा की है उम्मीद्
जो नहीं जानते वफा क्या है ॥ ८ ॥

हां भला कर तेरा भला होगा
और दरवेश् की सदा क्या है ॥ ९ ॥
जान् तुमपर् निसार करता हूं
मैं नहीं जान्ता दुवा क्या है ॥ १० ॥
मैंने माना के कुछ नहीं गालिब्
मुफ्त हात आये तो बुरा क्या है ॥ ११ ॥

(१) हे दुबळ्या जीवा, तुला झालें आहे तरी काय ? ह्या व्यथेचा इलाज तरी काय ?

(२) आम्हांला तिची आसक्ति आणि तिला आमचा कंटाळा. परमेश्वरा, ही काय भानगड आहे ?

(३) मलाही तोंड आहे म्हटलें, पण काय बोलायचें आहे हें विचारशील तर ना ?

(४) परमेश्वरा, जर तुझ्याशिवाय दुसरे कुणी नाहीं तर जगांत हा गोंधळ कशाचा माजून राहिला आहे ?

(५) ह्या सुंदर स्त्रिया, अन् त्यांचे हे नाजनखरे हीं काय आहेत पाहा तरी!

(६) सुगंधित केशकलापाची ही कुटिलता काय आहे आणि काजळ लावलेले डोळे काय दर्शवतात बरें!

(७) हा वसंतऋतु कोठून आला ? हे मेघ, हा वायु हें सारें आहे तरी काय ?

(८) आम्ही तिच्याकडून निष्ठेची अपेक्षा करतों अन् तिला निष्ठा ही काय भानगड आहे हें धड माहीत नाहीं.

(९) लोकाचें कल्याण कर. तुझेंही कल्याण होईल ह्यापरती फकीराची प्रार्थना ती काय असणार ?

(१०) तुझ्यासाठीं जीव द्यावा एवढेंच काय तें मला माहीत आहे. प्रार्थना, विनवण्या हें कांहीं मी जाणत नाहीं.

(११) हे गालिब, कशांत कांहींच नाहीं हें मलाही पटतें पण विनायास पदरांत पडत असेल तर काय हरकत आहे ?

१४८ . . . कहते हो तुम् सब के बुते ग़ालिया मू आये
एक् मर्तबा घबराके कहो कोयी के वो आये ॥ १ ॥
हूं कस्मकशे नज़ामे हां जज़्बे महब्बत्
कुछ कह न सकूं पर वो मेरे पूछने को आये ॥ २ ॥
हे साइका व शोला व सीमाब्का आलम्
आनाही समझमे मेरी आता नहीं गो आये ॥ ३ ॥

जाहिर है के घबराके न भागेंगे नकीरैन्
हां मूँहसे मगर् बादये दोशीना की बू आये ॥ ४ ॥
जल्लादसे डरते हैं न वाइजसे झगडते
हम् समझे हुये हैं उसे जिस् भेसमे जो आये ॥ ५ ॥
हा अहले तलब् कौन् सुने तानये नायाफ्त
देखाके वो मिलता नहीं अपनेहीको खो आये ॥ ६ ॥
अपना नहीं वो शेवा के आरामसे बैठें
उस् दरपे नहीं बार तो काबेहीको हो आये ॥ ७ ॥
की हम् नफसोंने असरे गिरियामे तक्रीर्
अच्छे रहे आप् उस्से मगर् मुझको डुबो आये ॥ ८ ॥
उस् अंजुमने नाज् की क्या बात् है गालिब्
हम् भी गये वा और तेरी तकदीर को रो आये ॥ ९ ॥

(१) प्रियेच्या विरहात माझी क्षात अवस्था झालेली पाहून, मित्रानो, तुम्ही ती सुगंधित केशकलापाची प्रिया सत्वर यावी अशी प्रार्थना करीत आहात पण हें पाहा, ती आलीच अस तुमच्यापैकी कोणीच का म्हणत नाहीं

(२) माझ्या मनाची विलक्षण ओढाताण चालली आहे प्रियेला पुष्कळ सांगावयाचें आहे पण ती येथें येईल तेव्हा ना या प्रेमा, तू आपल्या प्रभावान तिला इकडे त्वरित का आणत नाहींस ?

(३) प्रिया आली पण ती आली हें मला कळलें नाहीं कारण मला जो भाग झाला तो चपळ सौदामिनीच्या पेटलेल्या ज्वालेचा आणि चंचल पाऱ्याचा मग प्रिया मला दिसणार तरी कशी ?

(४) माझ्या पापपुण्याचा झाडा घेणारे देवदूत अनगाळी येऊ तर या माझ्या तोंडाला येणाऱ्या दारूच्या वासानें ते पळून गेल्याशिवाय राहाणार नाहींत

(५) प्रत्येक वस्तूत मला परमेश्वराचा साक्षात्कार होतो, मग तो वधकाच्या स्वरूपांत आला तर आम्हाला त्याची भीति नाहीं आणि धर्मप्रचारकाच्या स्वरूपात आला तर आम्ही त्याच्याशी भांडणार मुळा नाहीं

(६) आम्ही परमेश्वराच्या प्राप्तीसाठीं निघालों पण त्यात आम्हाला यश आलें नाहीं. त्यात आम्हाला वेड मात्र लागलें ते बरें झालें. लोकांचे टोमणे आणि निंदा समजण्याची आम्हाला क्षमता राहिली नाही

(७) आम्हाला स्वस्थ बसून राहाण्याची सवय नाहीं. तिच्या दारावर नाहींतर आम्ही काब्याच्या पायरीवर जाऊन बसून आलों.

(८) माझ्या मित्रांनीं रुदन आणि आक्रंदन ह्याची हकीकत प्रियेला सांगितली. तिच्यावर त्याचा कांहीं प्रभाव झाला नाहीं. उलट मी मात्र शरमिंदा झालों.

(९) काय त्या प्रियेच्या बैठकीतील मजा ? आम्हांला तर आनंद वाटला. पण गालिब, तूं तिच्या सहवासाला मुकलो आहेस हें पाहून आम्हांला वाईट वाटलें.

१४९ . . . फिर् कुछ एक् दिलको बेक़रारी है
सीना जोयाये ज़ख़्मकारी है ॥ १ ॥
फिर् जिगर् खोदने लगा नाख़ुन्
आमदे फस्ले लालाकारी है ॥ २ ॥
क़िब्लये मक़सदे निगाहे नियाज़
फिर वही परदये अमारी है ॥ ३ ॥
चश्मे दल्लाल जिन्से रुसवायी
दिल ख़रीदारे ज़ौक़ ख्वारी है ॥ ४ ॥
वोही सद्रंग् नाला फ़रसायी
वही सद् गूना अश्क़बारी है ॥ ५ ॥
दिल हवाये ख़िरामे नाज़से फिर्
महशरिस्ताने बेकरारी है ॥ ६ ॥
जल्वा फिर् अर्जे नाज़ करता है
रोज़ बाज़ारे जांसिपारी है ॥ ७ ॥
फिर् उसी बेवफापे मरते हैं
फिर् वही ज़िंदगी हमारी है ॥ ८ ॥
फिर् खुला है दरे अदालते नाज़्
गरम बाज़ारे फ़ौजदारी है ॥ ९ ॥
हो रहा है जहांमे अंधेर्
ज़ुल्फकी फिर् सिरश्तेदारी है ॥ १० ॥
फिर् दिया पारये जिगर्ने सवाल
एक् फ़रयादे आहोज़ारी है ॥ ११ ॥
फिर् हुये हैं गवाहे इश्क़ तलब्
अश्क़बारीका हुक्म जारी है ॥ १२ ॥

दिल व मिज़्गाका जो मुक़द्दमा था
आज् फिर् उसकी रूबकारी है ॥ १३ ॥
बेखुदी बेसबब् नहीं गालिब्
कुछ तो है जिसकी पर्दादारी है ॥ १४ ॥

(१) मला सारखें अस्वस्थ वाटत आहे फिरून एकदा हृदयाला मर्मावर आघात व्हावा असें वाटत आहे

(२) आता वसतऋतु आला आहे फिरून एकदा भरलेल्या जखमा उकरून काढण्याकरिता नखाची धडपड चालली आहे

(३) पुन्हा आमचे निष्ठेनें भरलेले डोळे प्रियेच्या आसनाकडे वळले आहेत

(४) डोळे हृदयाला पुन्हा आसक्तींत फसवूं पाहात आहेत

(५) हृदयाचें आक्रंदन पहिल्यासारखें पुन्हा चालू झालें आहे अश्रूंच्या धारा पुन्हा पूर्वीसारख्या वाहूं लागल्या आहेत

(६) प्रियेच्या हंसगतीच्या विचारानें हृदय पुन्हा अस्वस्थ होऊन प्रलयाचें स्थान बनलें आहे

(७) प्रियेच्या सौंदर्याचा पुन्हा आविष्कार होत आहे आणि त्याकरिता लोक पुन्हा प्राण पणाला लावूं लागले आहेत

(८) त्या चंचल प्रियेवर आम्ही पुन्हा आपला जीव धावयास बसलों आहोंत आणि मागचें तेच जीवन आम्हाला अनुभवास येऊं लागलें आहे

(९) प्रेमाचें न्यायालय पुन्हा उघडलें आहे आणि प्रेमाच्या गुन्ह्याची फिरून चौकशी चालू झाली आहे

(१०) केशकलापानीं न्यायालयाचें काम हातीं घेतलें आहे आणि त्यामुळें जगात अंधार पसरला आहे

(११) पुन्हा हृदयानें न्यायालयात हाक दिली जिकडे तिकडे गाऱ्हाणींच गाऱ्हाणीं आता ऐकूं येत आहेत

(१२) प्रेमाच्या साक्षीदाराना पुन्हा बोलावण्यात आलें आहे आणि न्यायालयाकडून अश्रु ढाळण्याचा हुकूम निघालेला आहे

(१३) हृदय आणि पापण्या ह्याचा खटला होता त्याची आज पुन्हा सुनावणी आहे

(१४) गालिब, ही स्वतःची विस्मृति विनाकारण दिसत नाहीं ह्याच्या मागें काहीं तरी दडलेलें दिसत आहे

१५०... जुनून् तोहमत्कशे तस्कीन् न हो गर शादमानी की
नमक्पाशे खराशे दिल है लज्जत् जिंदगानी की ॥ १ ॥
कशाकशहाये हस्तीसे करे क्या सओए आजादी
हुयी जंजीर मौजे आब्को फुर्सत र वानी की ॥ २ ॥
पस् अज मुर्दन भी दीवाना जियारत्गाहे तिफ्लां है
शरारे संग्ने तुरबत् पे मेरी गुलफिशानी की ॥ ३ ॥

(१) दुःखानंतर थोडेसें सुख लाभलें तर त्या सुखानंतर येणाऱ्या दुःखाची तीव्रता अधिक भासते. आमच्या वेडापासून थोडी उसंत मिळाली म्हणून आम्हांला बांधून ठेवू नका. कारण त्यापाठोपाठ येणाऱ्या वेडाच्या रोगावर ही उसंत म्हणजे मीठ शिंपडण्यासारखें आहे.

(२) जीवनाच्या संग्रामांतून मुक्ति कशी मिळेल ? ती पाहा समुद्रावरची लाट, पुढें सरकतांना तिला वाटतें आपण समुद्रांतून मुक्त होऊं. लगेच सांखळीनें ओढल्यासारखें तिला परतावें लागतें.

(३) प्रेमवेड्याच्या मृत्यूनंतरही मुलें त्याच्या थडग्यावर दगड फेंकतात. जणुं काय दगडांतील सुप्त अग्निपुष्पांची त्याच्या थडग्यावर वृष्टि होत आहे.

१५१... निकोहिश है सजा फर्यादीये बेदादे दिल्बर् की
मबादा खंदये दंदानुमा हो सुबहे महशर् की ॥ १ ॥
रगे लैलाको खाके दश्ते मजनूं रेशगी बख्शे
अगर् बो दे बजाये दाना दिहकान् नोकू निश्तर् की ॥ २ ॥
परे परवाना शायद् बादबाने कश्तीये मये था
हुयी मज्लिस् की गर्मी से र वानी दौरे सागर् की ॥ ३ ॥
करूं बेदादे जौके पुरफिशानी अर्जक्या कुद्रत्
के ताक़त् उडगयी उडने से पहले मेरे शहपर् की ॥ ४ ॥
कहांतक् रोवूं उस्के खैमे के पीछे कियामत् हैं
मेरी क़िस्मत् मे यारब क्या न थी दीवार पत्थर् की ॥ ५ ॥

(३) मैफिलीत दारूचे पेले धारण केलेलें तबक फिरत आहे. ह्या नावेला जणू दिव्यामागें येणारे पतंगाचे पंख वादवानाचें म्हणजे शीड हाकणाऱ्याचें काम करीत आहेत

(४) स्वैर भरारीचीं सुखदुःखें मी काय वर्णन करूं ! उडण्याच्या पूर्वी माझ्या पंखातील शक्ति नष्ट झाली आहे.

(५) प्रियेच्या तंबूच्या मागोमाग रुदन करीत मी किती फिरावे ? परमेश्वरा, त्याऐवजी दगडी भिंत माझ्या नशीबात दिली असतीस तर त्यावर डोकें आपटून मरून तरी गेलों असतों.

१५२ . . . बे एतिदालियोंसे सबुक सबमे हम् हुये
जितने ज्यादा होगये उतनेही कम् हुये ॥ १ ॥
पिन्हा था दाम् सख्त् करीब आशियाने के
उडने न पाये थे के गिरफ्तार् हम् हुये ॥ २ ॥
हस्ती हमारी अपनी फनापर् दलीट् है
या तक मिटे के आप् हम अपनी कसम हुये ॥ ३ ॥
सख्तीकशाने इश्ककी पूछे है क्या खबर्
वो लोग रफ्ता रफ्ता सरापा अलम् हुये ॥ ४ ॥
तेरी वफासे क्या हो तलाफी के दहर् मे
तेरे सिवा भी हम् पे बहोत से सितम् हुये ॥ ५ ॥
लिख्ते रहे जुनू की हिकायाते खूंचिकां
हरचंद इसमे हाथ हमारे कलम हुये ॥ ६ ॥
अल्लाहरे तेरी तुदीये खू जिसके बीमसे
अजजाये नाला दिल मे मेरे रिज्क हम हुये ॥ ७ ॥
अहले हवस की फतह है तर्के नबर्दे इश्क
जो पाव उठ गये वही उनके अलम हुये ॥ ८ ॥
नाले अदम् मे चंद हमारे सिपुर्द थे
जो वा न खिंचसके सो वो या आके दम् हुये ॥ ९ ॥
छोडी असद् न हमने गदायी मे दिल्लगी
साइल हुये तो आशिके अहले करम् हुये ॥ १० ॥

(१) स्वतःच्या अनिर्बंध वागणुकीनें आम्ही लोकांच्या नजरेंत तुच्छ ठरलों म्हणजे आम्ही जितके पर चढ्ढ पाहात होतों तितकेच खालीं पडलों.

(२) माझ्या घरट्याजवळच पारध्यानें जाळें लावून ठेवलें होतें. मी अजून उडण्यास सुरवात केली होती नव्हती तोंच मी जाळ्यांत अडकून पडलों.

(३) आमचें जीवन म्हणजे केवळ माया आहे. तें अस्तित्वांत नाहीं. फार तर शपथेलाही जीवन आमच्यापाशीं नाहीं अशी शपथ घेण्याइतपत ह्या जीवनाचा आम्हांला आधार आहे.

(४) प्रेमपीडिताची स्थिति काय विचारावी? से हळूहळू अतर्बाह्य शोकमय झाले.

(५) तू निद्रा दाखवून काय होणार आहे? तुझ्याशिवाय इतरांनीं माझा जो छळ केला त्याची भरपाई कशी होणार?

(६) आपल्या प्रेमवेडाची रक्तरंजित कहाणी, आमचे हात त्यात कलम झाले (छाटले) तरी आम्ही लिहीतच राहिलों.

(७) हे प्रिये, काय तुझा कडक स्वभाव! तुझ्या भीतीनें माझे नि:श्वास आणि आक्रंदनें आंतल्या आतच विलीन झालीं, तीं बाहेर पडू शकलीं नाहींत.

(८) प्रेमाचें उसनें अवसान आणणाऱ्या आवटयेकी प्रेमिकांचे पाय प्रेमक्षेत्रांत फार वेळ टिकत नाहींत. लवकरच उलडतात.

(९) मृत्युलोकात येण्यापूर्वी जे नि:श्वास आमच्या नशीबांत लिहिले होते त्यांपैकीं कांहीं ह्या लोकात आमचे श्वासोच्छ्वास बनले आहेत. म्हणजे तुम्हांला जे आमचे श्वासोच्छ्वास वाटतात ते वास्तविक आमचे प्रेमनि:श्वासच होत.

(१०) फकीरी नशीबीं आली पण प्रेम सुटलें नाहीं. पूर्वी सुंदर स्त्रियांच्या मागें लागत होतों. आता उदारहृदयी लोकांच्या मागें लागलों आहे.

१५२ . . . जो न नक़दे दाग़े दिलकी करे शोला पासबानी
तो अफ्सुर्दगी निहां है ये मकीने बेज़बानी ॥ १ ॥
मुझे उससे क्या तवक़्क़ो बज़माने जवानी
कभी कोदकी मे जिसने न सुनी मेरी कहानी ॥ २ ॥
यौंही दुख किसीको देना नहीं ख़ूब् वर्ना कहता
के मेरे अदूको यारब् मिले मेरी ज़िंदगानी ॥ ३ ॥

(१) हृदयावरील डाग सोन्याच्या नाण्यासारखा तळपत आहे. माझ्या प्रेमज्वालांनीं त्याचें रक्षण केलें नाहीं तर हृदय उद्विग्न होऊन जाईल.

(२) बालकाना गोष्टी आवडतात; पण प्रियेनें लहानपणीं कुठें माझी गोष्ट ऐकिली म्हणून तरुणपणीं तिला माझ्या प्रेमाची कहाणी आवडणार आहे.

(३) कुणाला दुःख देणें चांगलें नाहीं म्हणून नाहीतर मी परमेश्वराला विनवणी केली असती, कीं हे प्रभो, माझ्यासारख्याचें संकटमय जीवन माझ्या शत्रूच्या नशीबीं येऊं दे.

१५४ . . . जुल्मत्कदेमे मेरे शबे गम्का जोश है
इक् शमा है दलीले सहर् सो खमूश है ॥ १ ॥
नै मुज्दये विसाल् न नज्जारये जमाल्
मुद्दत् हुयी है के आश्तीये चश्मो गोश् है ॥ २ ॥
मये ने किया है हुस्ने खुद्आरा को बेहिजाब्
अय् शौक या इजाज़ते तस्लीमो होश् है ॥ ३ ॥
गौहर को अकदे गर्दने खूबा मे देखना
क्या औजपर् सितारये गौहर फरोश है ॥ ४ ॥
दीदारे वादा हौसल्ला साक़ी निगाह मस्त्
बज्मे खियाल मैकदये बे खरोश् है ॥ ५ ॥
अय् ताज़ावारदाने बिसाते हवाये दिल्
जिन्हार अगर् तुम्हे हवसे नायेब नोश् है ॥ ६ ॥
देखो मुझे जो दीदये इब्रत् निगाह हो
मेरी सुनो जो गोशे नसीहत नियोश है ॥ ७ ॥
साकी बजल्वये दुश्मने ईमानो आगही
मत्रिब् बनग्मा रहज़ने तम्कीनो होश है ॥ ८ ॥
या शब् को देखते थे के हर गोशये बिसात्
दामाने बाग्बानो कफ़े गुल्फरोश है ॥ ९ ॥
लुत्फे खिरामे साकी व जौके सदाये चग्
ये जन्नत् निगाह वो फिरदौस् गोश है ॥ १० ॥
या सुबहदम् जो देखिये आकर तो बज्म मे
नै वो सुरूरे सोज् न जोशो खुरोश है ॥ ११ ॥
दागे फिराके सुहबते शब्की जली हुयी
इक् शमा रहगयी है सो वो भी खमूश हे ॥ १२ ॥
आते हैं गैब् से ये मज़ामीं खियालमे
गालिब् सरीरे खामा नवाये सरोश है ॥ १३ ॥

( १ ) माझ्या हृदयांत शोकाची रात्र पसरली आहे. ती विरत चालली आहे, ह्याचें प्रमाण म्हणजे दिवा असावा पण तोही विझलेला आहे.

( २ ) युगें लोटलीं आहेत. कानानीं प्रियामीलनाचें गीत ऐकिलें नाहीं आणि डोळ्यांनीं प्रियेला पाहिलें नाहीं. आपसांतील प्रतिस्पर्धेचें कारण राहिलें नाहीं म्हणून डोळे आणि कान ह्यामध्यें आजकाल सलोखा झालेला दिसतो.

( ३ ) प्रिया मद्यपान करून बेपर्वा आणि निःसंकोच झाली आहे. हे रसिकते, आतां तुला मोकळेपणानें वागण्यास पूर्ण संमति आहे.

( ४ ) प्रियेच्या गळ्यांतील मोत्यांची माळ पाहा. मोतीविक्याचें नशीब काय जोरांत आहे पहा !

( ५ ) मद्यालयांत नेहमीं गोंगाट आणि गोंधळ चालतो ; पण कल्पनेच्या मद्यालयांत हा प्रकार नाहीं. प्रियेचें चिंतन म्हणजे कधीं न संपणारी दारू आहे. गोंगाट न करतां तिचें हवें तितकें पान करता येतें.

( ६ ) हे प्रेमशेत्रांत नव्यानें पदार्पण करणाऱ्यांनो, तुम्हांला संगीत ऐकण्याची आणि मद्य पिण्याची ( प्रेमाचें ) इच्छा आहे ना ?

( ७ ) मग माझ्याकडे पाहा. माझी काय स्थिति झाली आहे ती पाहा आणि माझे उपदेशाचे बोल ऐका.

( ८ ) साकी ( प्रिया ) आपल्या सौंदर्यानें तुमची बुद्धि आणि धर्मावरील श्रद्धा हरण करून टाकील आणि गायक आपल्या मधुर संगीतानें तुम्हाला देहभान विसरण्यास लावील.

( ९ ) रात्रीं मैफिलींत फुलांचा सडा पडलेला दिसतो. जणू काय माळ्याची फुलांची रास मैफिलींत येऊन पडली आहे.

( १० ) साकीचें, ( प्रिया ) आकर्षक चालणें म्हणजे डोळ्यांना स्वर्गदर्शनाचें सुख लाभणें आणि गायकाचें गाणें म्हणजे कानांना स्वर्गीय संगीताचा लाभ होणें आहे.

( ११ ) पण ह्याच मैफिलींत दिवसा उजेडीं येऊन पाहा. ती रात्रीची मौज आणि कर्णमधुर संगीत कुठें ? चहूंकडे उदास वातावरण दिसतें.

( १२ ) ह्या मैफिलीचा अवशेष म्हणजे एक दिवा शिल्लक राहिलेला आणि तोही मैफिल संपली ह्या दुःखानें विझून गेला आहे.

( १३ ) ह्या कल्पना मला अंतराळांतून येत असल्या पाहिजेत. कागदावर ह्या कल्पना उतरवीत असतां लेखणीचा जो ध्वनि होतो तो म्हणजे देवदूतांचे संदेश म्हटले पाहिजेत.

१५५ . . . आ के मेरी जान को क़रार नहीं है
ताक़ते बेदादे इंतिज़ार् नहीं है ॥ १ ॥
देते हैं जन्नत हयाते दहर के बदले
नशा ब अंदाज़ये ख़ुमार् नहीं है ॥ २ ॥
गिरिया निकाले है तेरी बज़्मसे मुझको
हाये के रोनेपे इख़्तियार नहीं है ॥ ३ ॥
हमसे अबस है गुमाने रंजिशे ख़ातिर्
ख़ाक़ मे उश्शाक़्के ग़ुबार् नहीं है ॥ ४ ॥
दिलसे उठा लुत्फ़े जल्वहाये मआनी
ग़ैरे गुल्ल आयीनये बहार् नहीं है ॥ ५ ॥
क़त्ल का मेरेकिया है अह्द तो बारे
वाये अगर् अह्दे उस्तुवार नहीं है ॥ ६ ॥
तूने क़सम् मैकशी की खायी है ग़ालिब्
तेरी क़सम् का कुछ एतिबार् नहीं है ॥ ७ ॥

(१) हे प्रिये, लवकर ये. माझें मन अस्वस्थ आहे आणि प्रतीक्षेची शक्ति माझ्यांत राहिली नाहीं.

(२) जगांतील दुःखाच्या मोबदल्यांत आम्हांला स्वर्गांतील सुखें लाभलीं तर ते कांहीं परमेश्वराचे उपकार नव्हत; कारण जगांतील दुःखें इतकीं आहेत कीं स्वर्गीयसौख्य हा कांहीं त्यांचा पुरेसा मोबदला नव्हे. मद्यपानानंतरचा उतार आणि आधीची नशा ह्यांचें प्रमाण बरोबर नाहीं.

(३) अरेरे, तुझ्या बैठकींत मला आपलें आक्रंदन थांबवितां आलें नाहीं आणि ह्यांच्या पायींच मला तुझ्या बैठकींतून बाहेर काढण्यांत आलें.

(४) तुझ्याबद्दल माझ्या मनांत गैरसमज किंवा अढी आहे असें समजू नकोस. आम्हा प्रेमिकांच्या मातींत धूळ मुळीच नाहीं.

(५) वसंतऋतूचें प्रतिबिंब उमटलेल्या फुलांत दिसायचें, तसेंच आमच्या वाणीचें सौख्य अनुभवायचें असेल तर आमच्या हृदयाच्या दर्पणांत डोकावून पाहा.

(६) तिनें माझ्या वधाचा निश्चय केला आहे ही समाधानाची गोष्ट आहे; पण तो निश्चय टिकावू नसेल तर मात्र आमचें दुर्दैव !

(७) हे गालिब, आतां मद्यपान करणार नाहीं अशी तूं शपथ घेतली आहेस; पण तुझ्या शपथेचा आम्हांला विश्वास येत नाहीं.

१५६ . . . हुजूमे ग़मसे यांतक् सरनिगूनी मुजको हासिल् है
के तारे दामन् व तारे नजर मे फर्क मुश्किल् है ॥ १ ॥
रफूये ज़ख्मसे मतलब् है लज़्ज़त् ज़ख्मे सोज़न् की
समझियो मत् के पासे दर्दसे दीवाना ग़ाफिल् है ॥ २ ॥
वो गुल् जिस् गुलिस्तांमे जल्वाफर्मायी करे ग़ालिब्
चटकना ग़ुंचावो गुल्का सदाये ख़ंदये दिल् है ॥ ३ ॥

( १ ) अपार शोकामुळें माझें डोकें मांडीवर टेकलें आहे. त्यामुळें डोळे आणि कूस एक झाल्यासारखे वाटत आहेत.

( २ ) माझ्या जखमांना टांके पडत आहेत. ह्यावरून प्रेम कमी झालें असें समजूं नकोस. सुईनें जखमा जेव्हां शिवल्या जातात त्या वेळीं सुईच्या टोंचण्यानें जखमांची औरच लज्जत वाटते.

( ३ ) प्रिया बागेंत आली त्या वेळीं फुलें उमलतात; जणूं काय त्यांनी तिच्या आगमनाप्रीत्यर्थ आनंदानें आपलीं हृदयें उघडीं केलीं.

१५७ . . . पाबदामन् हो रहाहूं बस्के मै सहरा नवर्द
ख़ारेपा हैं जौहरे आयीनये जानू मुझे ॥ १ ॥
देखना हालत् मेरे दिल्की हम् आग़ोशी के वक्त
है निगाहे आशना तेरा सरे हर मू मुझे ॥ २ ॥
हूं सरापा साजे आहंगे शिकायत् कुछ् न पूछ
है यही बेहतर के लोगों मे न छेडे तू मुझे ॥ ३ ॥

( १ ) उर्दू काव्यांत मांडीला आरशाची उपमा देतात. कारण शृंगारांत आरसा मांडीवर ठेवून केशविरचना किंवा डोळ्यात काजळ घालण्याची पद्धत आहे. मांडी आणि आरसा ह्याच्या ह्या सांनिध्यामुळें मांडीला आरशाची उपमा देतात. कवि म्हणतो, प्रेमवेडांत मी रानोमाळ भटकून थकून गेलों आहें आणि आतां पाय मांडीवर टाकून बसलों आहें. माझे पाय म्हणजे मांडीवर टेकलेला आरसा आणि पायांत बोंचलेले कांटे म्हणजे त्या आरशाचे घटक होत.

( २ ) मीलनाच्या वेळीं माझ्या मनस्वी आनंदाचा प्रियेला रोमरोमांतून अनुभव येईल; कारण तिला माझ्या प्रेमाची पूर्ण जाणीव आहे.

( ३ ) मी निःश्वास आणि गान्हाणीं ह्यांनीं परिपूर्ण असलेलें वाद्य बनलों आहें. उगीच चारचौघांत मला छेडूं नकोस; नाहीं तर माझे गान्हाण्याचे सूर बाहेर पडूं लागतील.

१५८. . . जिस् बज़्म मे तू नाज़से गुफ़्तार मे आवे
जान काल्बुदे सूरते दीवार मे आवे ॥ १ ॥
साये की तरह साथ फिरें सर्व व सनोबर
तू इस् कदे दिल्कशसे जो गुल्ज़ार मे आवे ॥ २ ॥
तब् नाज़े गिरांमायगीये अश्क बजा है
जब् लख्ते जिगर् दीदये खूंबार् मे आवे ॥ ३ ॥
दे मुझको शिकायत की इजाज़त के सितमगर्
कुछ तुझको मज़ामी मेरे आज़ार् मे आवे ॥ ४ ॥
उस चश्मे फ़ुसूंगर् का अगर पाये इशारा
तूती की तरह आयीना गुफ़्तार् मे आवे ॥ ५ ॥
कांटोंकि ज़बां सूख् गयी प्यास से यारब्
इक् आबलापा वादीये पुरख़ार मे आवे ॥ ६ ॥
मरजावूं न क्यों रश्कसे जब वो तने नाज़ुक्
आग़ोशे ख़मे हल्क़ये ज़ुन्नार् मे आवे ॥ ७ ॥
ग़ारतगरे नामूस नहो गर हवसे ज़र्
क्यों शाहिदे गुल् बाग़से बाज़ार् मे आवे ॥ ८ ॥
तब् चाके गरेबांका मज़ा है दिले नालां
जब् यक् नफ़स उलझा हुवा हरतार मे आवे ॥ ९ ॥
आतिश् कदा है सीना मेरा राज़े निहांसे
अये वाये अगर मारिज़े इज़्हार मे आवे ॥ १० ॥
गंजीनये मानी का तिलिस्म उसको समझिये
जो लफ़्ज़् के ग़ालिब् मेरे अशआर मे आवे ॥ ११ ॥

(४) मला गान्धार्णे खागण्याची तरी, हे प्रिये, मला परवानगी दे म्हणजे माझीं दु खें ऐकण्यात तुला आनंद वाटेल

(५) पोपटाला बोलायला शिकविताना त्याला आरशासमोर ठेवतात कवि म्हणतो, कीं प्रियेचे मोहक आणि बोलके डोळे आरशात प्रतिबिंबित झाले कीं पोपटाप्रमाणें आरशालाही वाचा फुटेल

(६) ह्या भयाण वनात उष्णतेनें काट्याच्या जिभा सुकून गेल्या आहेत कोणी प्रेमवेडा भक्त इकडे येवो म्हणजे त्याच्या पायाचा फोड ह्या काट्यावर फुटून त्याच्या जिभाना ओलावा तरी लाभेल

(७) प्रियेच्या गळ्यात माळ पडली आहे ह्या माळेला प्रियेचें सानिध्य लाभावें आणि मला लाभू नये ह्याचा मला हेवा वाटतो

(८) प्रसिद्धीची आणि लाभाची हौस स्वाभिमानाला मारक ठरते पहा कळी उमलून तिने लाभाच्या अपेक्षेनें आपले हात पसरले आणि तीं बाजारात जाऊन पडली तिनें असे हात पसरले नसते तर बाजारात जाऊन पडण्याची तिच्यावर पाळी कशाला आली असती !

(९) प्रेमवेडात कपडे फाडण्याची मौज आहे, पण केव्हा ? कपड्याच्या एकेका तंतूंत एकेक नि श्वास कालवला जाईल तेव्हा

(१०) प्रेमरहस्यामुळें माझें हृदय म्हणजे अभिकुंड बनलें आहे जर का तें उघडें पडलें तर कहर गुदरेल

(११) माझ्या काव्यात जे शब्द येतात त्याना तुम्ही मोहक आणि अर्थपूर्ण कल्पनांचा खजिना समजा

१५९ . . . हुस्ने माहू गरचे बहगामे कमाल अच्छा है
उससे मेरा माहे खुर्शीद् जमाल अच्छा है ॥ १ ॥
बोसा देते नहीं और् दिलपे है हर लहज़ा निगाह
जी मे कहते हैं के मुफ्त आये तो माल अच्छा है ॥ २ ॥
और् बाजारसे ले आये अगर टूट् गया
सागरे जम्से मेरा जामे सिफाल अच्छा है ॥ ३ ॥
बे तलब् दे तो मजा उसमे सिवा मिलता है
वो गदा जिसको न हो खूये सवाल अच्छा है ॥ ४ ॥
उनके देखेसे जो आजाती है मूहपर् रौनक
वो समझते हैं के बीमार् का हाल अच्छा है ॥ ५ ॥
देखिये पाते हैं क्या उश्शाक बुतोसे फैज
एक् बरहमनने कहा हैं के साल अच्छा है ॥ ६ ॥

हम् सुखन् तेशाने फरहाद् को शीरीं से किया
जिस् तरहका के किसी मे हो कमाल अच्छा है ॥ ७ ॥
कत्रा दरियामे जो मिट्ट जाये तो दरिया हो जाये
काम अच्छा है वो जिस्का के माआल अच्छा है ॥ ८ ॥
खिज्र सुल्तान्को रखे खालिके अकबर् सरसब्ज्
शाहके बाग मे ये ताजानिहाल अच्छा है ॥ ९ ॥
हम्को मालूम् है जन्नत् की हकीकत् लेकिन्
दिलके खुश रखने को गालिब् ये खियाल अच्छा है ॥ १० ॥

(१) पौर्णिमेचा चंद्र सुंदर आहे पण सूर्यासारखें तेजस्वी सौंदर्य धारण करणारी माझी प्रिया त्यापेक्षाही सुंदर आहे

(२) हे प्रिये, तू चुंबन देत नाहींस आणि माझ्या हृदयाकडे तुझें सारखें लक्ष आहे. तुला वाटतें विनामोबदला हृदय हस्तगत झालें तर काय हरकत आहे

(३) माझें मदिरापात्र जमशीदच्या पात्रापेक्षाही चांगलें आहे कारण माझें पात्र मातीचें आहे फुटलें तर बाजारातून नवीन आणता येतें जमशीदच्या पात्राची गोष्ट तशी नाहीं

(४) न मागतां वस्तु मिळण्यात मौज आहे ज्याला हात पसरण्याची सवय नाहीं तो भिक्षेकरी चांगला म्हटला पाहिजे

(५) प्रियेला पाहून आजारी प्रियकराच्या चेहऱ्यावर कळा येते आणि मग तिला वाटतें कीं त्याची प्रकृति सुधारली म्हणून

(६) वधावें प्रेमिकाना प्रेयसीच्याकडून काय लाभ होतो तो कारण यंदाचें वर्ष चांगलें जाणार असें ज्योतिषि म्हणतो

(७) फरहाद हा साधा मजूर होता आणि शीरीन ही राजकन्या पण आपल्या धंद्यात तो वाकबगार होता म्हणून त्याला शीरीनशीं घोरायला मिळालें धंदा कोणता कां असेना त्यात पूर्ण कौशल्य हें अशा रीतीनें लाभदायक ठरतें

(८) जलबिंदु समुद्रात मिसळून समुद्र बनला आत्म्याचें परमात्म्यांत विलीन होणें हें ध्येय आणि त्याची पूर्ति ही योग्य घटना आहे, तद्वत्च जलबिंदूचें होय ज्याचा शेवट चांगला तें काम चांगलेंच म्हटलें पाहिजे

(९) बहादुरशहाचा मुलगा खिजर सुल्तान याला, परमेश्वरा, सुखात ठेव राजपराम्यां तील बागेंतील हें रोप फार चांगलें आहे

(१०) स्वर्गांत काय आहे आणि काय नाहीं हें आम्हाला कोणी सांगायास नको आम्हाला सगळें माहीत आहे पण मनाच्या करमणुकीकरितां स्वर्गाची कल्पना करायला बरी त्यापेक्षा जास्त कांहीं नाहीं

१६० . . . न हुयी गर मेरे मरने से तसल्ली न सही
इम्तिहा और भी बाकी हो तो ये भी न सही ॥ १ ॥
खारेखार अलमे हसरते दीदार् तो है
शौके गुलचीने गुलिस्ताने तसल्ली न सही ॥ २ ॥
मय् परस्तान खुमे मय् मूहसे लगाये ही बने
एक् दिन् गर न हुवा बज्म मे साकी न सही ॥ ३ ॥
नफसे कैस के हैं चश्मो चिरागे सहरा
गर नही शमय सियाखानये लेला न सही ॥ ४ ॥
एक हगामे पे मौकूफ् है घर की रौनक्
नौहे गम् ही सही नग्मये शादी न सही ॥ ५ ॥
न सतायिश् की तमन्ना न सिलेकी पर्वा
गर नहीं हैं मेरे अशआर मे मानी न सही ॥ ६ ॥
इशरते सुहबते खूबाही ग्नीमत् समझो
न हुयी गालिब् अगर उम्रे तबई न सही ॥ ७ ॥

(१) प्रिये, तुझ्या पायीं मी आपला जीव दिला आहे इतक्यानें तुझें समाधान झालें नाहीं तर साग अजून कोणत्या रीतीन माझी परीक्षा घेण्याचं तू ठरविलं आहेस ? त्यालाही माझी तयारी आहे

(२) रसिकतेला बाग पाहून समाधान लाभलं नाहीं तर हरकत नाहीं प्रियादर्शनाची हुरहुर तिला लागली आहे हें काय कमी आहे ?

(३) अरे मद्यप्यानो, आज मैफलींत साकी नसला म्हणून काय झालें ? तुम्हाला मदिरा मनसोक्त पिण्यास हवी आहे ना ? मग सुरइच तोंडाला लावीनात कसे !

(४) मजनूनच्या नि श्वासाना हें लैलाच्या घरातील ज्योत बनून राहाणें लाभलें नाहीं तर हरकत नाहीं त्याच्या नि श्वासानीं रानंवनें उजळलीं हें काय कमी आहे ?

(५) सुखदु खें हीं सारखींच आहेत तीं जीवनाचीं लक्षणें होत म्हणून घराच जीवन कांहींना कांहीं घडण्यावर अवलंबून आहे मग त्या सुखकारक असोत कीं दु खकारक, हें जीवन संपलें तर सुख काय, दु ख काय दोन्ही राहाणार नाहींत

(६) माझ्या काव्यात अर्थ नसला तर नसूंदे, मला कोणाच्या बक्षीसाची किंवा वाखाणणीची पर्वा नाहीं

(७) प्रेमामुळें तुझें आयुष्य कमी झालें तर काय बिघडलें ! पण जें आयुष्य तुला लाभलें तें सुंदरीच्या सहवासांत व्यतीत झालें हें काय कमी समाधान आहे !

१६१ . . . अजब् निशातसे जल्लादके चले हैं हम् आगे
के अपने सायेसे सर पांवसे है दो कदम आगे ॥ १ ॥
कजाने था मुझे चाहा खराबे बादये उल्फत्
फक़त् खराब् लिखा बस् न चल सका कलम आगे ॥ २ ॥
ग़मे जमाने ने झाडी निशाते इश्ककी मस्ती
वर्ना हम् भी उठाते थे लज़्ज़ते अलम् आगे ॥ ३ ॥
खुदाके वास्ते दाद इस जुनूने शौककी देना
के उस्के दरपे पोहोचते हे नामाबर्से हम आगे ॥ ४ ॥
ये उम्र भर् जो परीशानियां उठायी हैं हम्ने
तुम्हारे आये वाये तुर्रहाये खम्ब खम् आगे ॥ ५ ॥
दिलो जिगरमे पुर् अफशां जो एक मौजये खूं है
हम् अपने जोमूसे समझें हुये थे उसको दम् आगे ॥ ६ ॥
कसम् जनाज़े पे आनेकी मेरे खाते हैं ग़ालिब
हमेशा खाते थे जो मेरी जान की कसम् आगे ॥ ७ ॥

( १ ) वधकाकडे आम्ही आनंदानें आणि उत्कंठेनें चाललों आहों. आमची सावली आमच्यापुढं आहे. म्हणजे आमचें डोकें ( सावली ) आमच्या पायांपेक्षाही दोन पावलें पुढें आहे. इतकी आमची उत्सुकता शिगेला पोहोंचली आहे.

( २ ) परमेश्वरानें माझ्या नशीबीं प्रेममदिरेपायी दुर्दशा हें लिहिण्याचें ठरविलें पण तें जमलें नाहीं. फक्त दुर्दशा हाच शब्द लिहिला गेला. त्यामुळें फक्त दुर्दशाच नशीबी आली. प्रेममदिरेचा लाभ झाला नाहीं.

( ३ ) जीवनाच्या शोकापुढं आम्हांला प्रेमभावना विसरावी लागली नाहीं तर पूर्वी आम्ही प्रेमव्यथेची गोडी अनुभवीत होतों.

( ४ ) आमचें प्रेमवेड कितीं विलक्षण आहे पाहा ! प्रियेकडे संदेश पाठविला पण दूताच्या आधीं आम्ही घाईघाईनें प्रियेच्या दारावर जाऊन थडकलों.

( ५ ) हे प्रियेच्या कुरळ्या कुंतलानो, तुमच्यामुळें भलें श्रम भोगावे लागले. तुमच्यामुळें माझें सर्व कांहीं विस्कटून ( परेशान ) गेलें आहे. हीच स्थिति तुमच्या नशीबीं येवो.

( ६ ) आमच्या हृदयांत रक्त सळसळत होतें त्याला आम्ही श्वास समजत होतों. प्रेमामुळें हृदयांतलें रक्त बाहेर पडूं लागलें तेव्हां आमची खात्री झाली की हा श्वासोच्छ्वास नव्हे तर हृदयांतील रक्त बाहेर पडत आहे.

( ७ ) पूर्वी प्रिया माझ्या प्राणाची शपथ घेत असे पण आतां ती माझ्या प्रेतयात्रेलाही न येण्याची शपथ घेत आहे काय देवगति विचित्र आहे पाहा!

१६२ . . . शिकवे के नामसे बे मेहर खफा होता है
ये भी मत् कह के जो कहिये तो गिला होता है ॥ १ ॥
पुर् हू शिकवेसे यौं रागसे जैसे बाजा
इक जरा छेडिये फिर् देखिये क्या होता है ॥ २ ॥
गो समझता नहीं पर् हुस्ने तलाफी देखो
शिकवये जोर से सरगरमेजफा होता है ॥ ३ ॥
इश्क की राहमे है चर्खे मकौकब् की वो चाल
सुस्तरो जेसे कोयी आबलापा होता है ॥ ४ ॥
क्यौं न ठहरे हदफे नावके बेदाद् के हम्
आप् उठा लाते हैं गर् तीर खता होता है ॥ ५ ॥
खूब था पहलेसे होतें जो हम् अपने बद्ख्वा
के भला चाहते हैं और् बुरा होता हैं ॥ ६ ॥
नाला जाता था परे अर्शसे मेरा और् अब्
लब् तक आता है जो ऐसाहि रसा होता है ॥ ७ ॥
खामा मेरा के वो है बार्बदे बज्मे सुखन
शाह की मदह मे यौं नग्मासरा होता हैं ॥ ८ ॥
अये शहन्शाहे क्वाकब सिपाह व मेहरे अलम्
तेरे इकरामका हक किससे अदा होता है ॥ ९ ॥
सात् इक्लीम् का हासिल् जो फराहम् कीजे
तो वो लष्कर् का तेरे नाले बहा होता है ॥ १० ॥
हर महीनेमे जो ये बदरसे होता है हिलाल
आस्तान पर तेरे माह नासियासा होता है ॥ ११ ॥
मै जो गुस्ताख हू आयीने गजल् ख्वानी मे
येभि तेराही करम् जौक फिजा होता है ॥ १२ ॥
रखियो गालिब् मुझे इस् तल्ख नवाई मे मुआफ्
आज कुछ दर्द मेरे दिल मे सिवा होता है ॥ १३ ॥

२२१ . . . .

(१) गान्हाण्याचें भाव काढलें कीं ती निष्ठुर रागावते ती अशी रागावते हेंसुद्धा म्हटलेलें तिला खपत नाहीं

(२) वाद्यात सुर भरलेले असावेत तसा मी गाऱ्हाण्यानीं भरलों आहें जरा छेड तर खरें मग पहा काय होतें तें

(३) माझ्या गान्हाण्याचा अर्थ अल्लडपणामुळें ती समजू शकत नाहीं पण तिची हुशारी पाहा कीं गान्हाणें केलें कीं ती अधिक छळ करूं लागते

✓(४) प्रेमाच्या प्रवासात माझे मद इतके दूदूदू चालत आहेत कीं कुणाला वाटवें कीं ते पायात फोड आलेल्या प्रवाशासारखे रेंगाळत आहेत

(५) त्या शरसधान करणाऱ्या प्रियेनें आमची चेष्टा कां करू नये ? तिचा बाण एखादे वेळीं चुकला तर तो आम्ही तिला परत नेऊन देतों

(६) स्वत चें भलें चिंतावें तों वाईटच घडतें आता आपलं अनिष्ट चिंतणें बरें म्हणजे त्याच्या उलट तरी घडेल

(७) माझें आक्रदन पूर्वी आकाशापर्यंत पोहोंचत असे, पण अशक्ततेमुळें हें आक्रंदन जास्तींत जास्त ओठापर्यंत येतें पुढें जाऊं शकत नाहीं

(८) माझी लेखणी म्हणजे काव्यमैफिलींतील गायिका होय बादशाहाच्या स्तुतींत ती आपलं मधुर सगीत अशा रीतीनें सुरू करते

(९) हे बादशाहा, तुझी फौज आकाशातील तारकांसारखी अगणित आणि तुझा ध्वज म्हणजे सूर्यासारखा तेजस्वी तुझ्या कृपेचे उतराई होण्याची कुणाला शक्ति आहे ?

(१०) जगाच उत्पन्न गोळा करून आणलें तर फक्त तुझ्या सैन्याच्या नाल्यदीचा खर्च भागेल

(११) चंद्र तुझ्या दारावर विनवणी करीत करीत क्षीण होतो आणि शेवटीं त्याची बारीक कोर बनते

(१२) गझलाची रीत मोडून मी तुझी स्तुति करीत आहें पण त्याला सुद्धा तुझ्या कृपेमुळें उत्तेजन मिळालं आहे

(१३) माझ्या तोंडून आज कटु शब्द निघत आहेत त्याची क्षमा करा, कारण आज हृदय तळमळीमुळें अस्वस्थ झालं आहे

१६३ . . . हर एक बात पे कहते हो तुम के तू क्या है
तुम्हीं कहो के ये अदाजे गुफ्तगू क्या है ॥ १ ॥
न शोलेमे ये किरिश्मा न बर्क़मे ये अदा
कोयी बताओ के वो शोखे तुदख़ू क्या है ॥ २ ॥

ये रश्क है के वो होता है हम् सुखन् तुम्से
वगरना खौफे बद् आमोजीये अदू क्या है ॥ ३ ॥
चमक् रहा है बदन्पे लहूसे पैराहन्
हमारी जेबको अब् हाजते रफू क्या है ॥ ४ ॥
जला है जिस्म् जहा दिल भी जल गया होगा
कुरीदते हो जो अब् राख जुस्तजू क्या है ॥ ५ ॥
रगोमे दौडने फिरनेके हम् नहीं काइल
जब् आंखहीसे न टपका तो फिर लहू क्या है ॥ ६ ॥
वो चीज जिसूके लिये हम्को हो बिहिश्त अजीज
सिवाये बादये गुल्फामे मिश्कबू क्या है ॥ ७ ॥
पिऊं शराब् अगर् खुम् भी देख लू दोचार
ये शीशा व कदह् व कूजा व सुबू क्या है ॥ ८ ॥
रही न ताकते गुफ्तार् और अगर् हो भी ।
तो किस् उम्मीदपे कहिये के आरजू क्या है ॥ ९ ॥
हुवा है शाहका मुसाहिब फिरे है इतराता
वगरना शहरमे ग़ालिब् की आबरू क्या है ॥ १० ॥

(१) प्रत्येक गोष्टीवर मला तू अरेतुरे करू लागली आहेस तूंच साग ही काय भाषणाची रीत झाली ?

(२) तिच्या तीक्ष्ण स्वभावामुळें मी तिला आग म्हणावी तर आगींत इतका प्रभाव दिसत नाहीं. बरें, तिला वीज म्हणावी तर विजेंत हे नाजनखरे दिसत नाहींत. तिला उपमा द्यायची तरी कशाची ?

(३) प्रतिस्पर्धी माझ्या विरुद्ध तुझे कान भरतात ह्याचे मला काहीं वाटत नाहीं. हेवा वाटतो तो त्याना तुझ्याशीं बोलण्याची संधि मिळते ह्याचा

(४) प्रेमवेडात माझे फाटलेले कपडे परत शिवण्याची आवश्यकता नाहीं, कारण माझ्या रक्तानें भरलेल्या शरीराला ते बेमालूमपणें चिकटलेले आहेत.

(५) अगे, माझ्या राखेंत काय शोधीत बसली आहेस ? जेथें माझें शरीर जळून गेलें आहे, तेथें माझें हृदयही जळून गेलें असणार.

(६) धमन्यातून सथपणें वाहणाऱ्या रक्ताला आम्ही रक्त म्हणण्यास तयार नाहीं. जें नेत्रावाटे वाहात नाहीं तें रक्त कसलें ?

(७) आम्हांला स्वर्ग कां आवडतो माहीत आहे ? अहो, तेथें उंची दारू आणि तीही हवी तितकी मिळेल म्हणून.

(८) दारूच्या दोनचार सुरया तोंडाला लावण्याची माझी तयारी आहे. त्या मग ह्या बाटल्या आणि पात्रें डोळ्यांत थोडेच भरणार आहेत ?

(९) आता बोलण्याची शक्ति राहिली नाहीं. ती शक्ति असती तरी आम्ही कोणत्या आशेवर तिला आमची इच्छा काय आहे हें कळवायचें ?

(१०) बादशहाचा आवडता म्हणून, ग़ालिब, तू ऐटीनें फिरत आहेस. नाहीतर शहरांत तुझी किंमत काय आहे !

१६४ . . . मैं उन्हे छेडूं आर् कुछ न कहें
चल्द निकलते जो मय् पिये होते ॥ १ ॥
क़हर् हो या वला हो जो कुछ हो
काश् के तुम् मेरे लिये होते ॥ २ ॥
मेरी क़िस्मत्मे ग़म् गर इतना था
दिल भी यारब् कयी दिये होते ॥ ३ ॥
आही जाता वो राह पर ग़ालिब्
कोयी दिन् और भी जिये होते ॥ ४ ॥

(१) मी तिला चिडवावें आणि तिनें चिडूं नये, हें मोठें आश्चर्य आहे. हेंच तिनें मदिरेचें पान केलें असतें तर तिनें माझें चिडविणें मुकाट्यानें ऐकून घेतलें असतें कां ?

(२) तू काहींही ऐस, प्रळय ऐस कीं महत्संकट ऐस. पण माझ्यासाठीं तू असतीस तर किती बरें झालें असतें ?

(३) परमेश्वरा, माझ्या नशीबीं अनंत दुःखें लिहून ठेविलीं होतीस तर त्या मानानें सहन करण्याकरिता म्हणून अनंत हृदयें कां नाहीं दिलींस ? ह्या एका हृदयानें काय काय म्हणून सहन करावें ?

(४) ग़ालिब, तू अजून कांहीं दिवस जिवंत राहिला असतास तर ती सामोपचारानें वागूं लागली असती.

१६५ . . . ग़ैर लें महफ़िल्मे बोसे जाम् के
हम् रहें यौं तिश्नालब् पैग़ाम् के ॥ १ ॥
खस्तगी का तुमसे क्या शिकवा के ये
हथकंडे हैं चर्खे नीली फ़ाम् के ॥ २ ॥

ख़त् लिखेंगे गरचे मतलब् कुछ न हो
हम् तो आशिक़ हैं तुम्हारे नाम् के ॥ ३ ॥

रात पी ज़म्ज़म् पे मय् और सुब्हदम्
धोये धब्बे जामये एहराम के ॥ ४ ॥

दिल को आखोंने फसाया क्या मगर्
ये भी हल्क़े हैं तुम्हारे दाम्के ॥ ५ ॥

शाह की है ग़ुस्ले सेहत् की ख़बर्
देखिये कब् दिन् फिरे हम्माम् के ॥ ६ ॥

इश्क़ ने ग़ालिब् निकम्मा करदिया
वर्ना हम्भी आदमी थे काम् के ॥ ७ ॥

( १ ) परक्यानीं तुझ्या मैफिलींत तू दिलेल्या मद्यपानाला ओंठ लावावेत आणि आम्हीं मात्र तुझ्या संभाषणालाही मुकावें हें गाय दुर्दैव आहे !

( २ ) आमच्या दुर्दैवाचा बोल तुला का लावावा ? हा तर नियतीचा खेळ आहे

( ३ ) आम्ही तुला पत्र लिहू. पत्रात मजकूर नसला तरी चालेल. वर तुझ्या नावाचा पत्ता राहील आणि आम्ही तर तुझ्या नावाचे भोक्ते आहोंत

( ४ ) जमजमच्या पवित्र विहिरीवर बसून आम्हीं मद्यपान केलें आणि आमच्या यात्रेच्या कपड्यावर मद्याचे पडलेले डाग आम्ही धूत आहोत

( ५ ) तुझ्या डोळ्यानीं माझें हृदय काबीज केलें. ते डोळे नव्हत तर तूं पसरलेलें गोल जाळें आहे

( ६ ) बादशहाची प्रकृति सुधारत आहे असें ऐकतों आणि ते आरोग्यनिदर्शक स्नान करणार असें ऐकण्यात आहे म्हणजे स्नानगृहाचें भाग्य आतां लवकरच उदयाला येईल म्हणायचें.

( ७ ) ह्या प्रेमामुळें गालिब, आम्ही निकामी झालों, नाहीं तर आम्हीही कामाचीं माणसें होतों.

१६६ . . . फिर् उस् अदाज़से बहार आयी
के हुये मेह्रो माह् तमाशायी ॥ १ ॥

देखो अय् साकिनाने ख़ित्तये ख़ाक्
इसको कहते हैं आलम् आरायी ॥ २ ॥

२२५ . . . .

के जमीं होगयी है सर ता सर्
रूकशे सतहे चर्खे मीनायी ॥ ३ ॥
सब्ज़े को जब कहीं जगह् न मिली
बन् गया रूये आब पर्कायी ॥ ४ ॥
सब्जावो गुल् के देखने के लिये
चश्मे नर्गिस् को दी है बीनायी ॥ ५ ॥
है हवामे शराब् की तासीर्
बादा नोशी है बादपैमायी ॥ ६ ॥
क्यों न दुनिया को हो खुशी गालिब्
शाहे दीन्दारने शफा पायी ॥ ७ ॥

(१) वसतऋतूचें आगमन अशा थाटात झालें आहे, कीं सूर्य आणि चंद्र पाहातच राहिले आहेत

(२) हे भूलोकींच्या रहिवाशानो, ह्याला स्वर्गाची सुंदर सजावट म्हणतात

(३) पृथ्वी हिरव्या वनश्रीनें नटली आहे आणि ह्या गोष्टींत आकाशाशीं प्रतिस्पर्धा करीत आहे

(४) जगात सगळीकडे भरल्यानंतर पुरुन उरलेली हिरवळ आता पाण्यावर शेवाळे बनून तरंगू लागली आहे.

(५) नर्गिसचें फूल आधळें असतें असा कविसंकेत आहे; पण कवि म्हणतो, कीं वसतऋतूची बहार लुटण्याकरिता परमेश्वराने नर्गिसला सुद्धा दृष्टि दिली आहे

(६) ह्या वसतऋतूंत वायूमध्यें मदिरेचा प्रभाव निर्माण झाला आहे आता मदिरेचें सेवन करणें व्यर्थ आहे

(७) बादशहाला आरोग्याचा लाभ झाला मग साऱ्या जगाला आनंद का वाटू नये ?

१६७ . . . तगाफुलदोस्त हू मेरा दिमाग अजज़ आली है
अगर् पहलूतही कीजे तो जा मेरी भी खाली है ॥ १ ॥
रहा आबाद् आलम् अहले हिम्मत् के न होनेसे
भरे हैं जिस् कदर् जामो सुबू मैखाना खाली है ॥ २ ॥

(१) मी तगाफुल म्हणजे स्वस्थतेचा शौकीन आहें आणि माझी अवस्था लाचारीची झाली आहे " माझ्याशीं " तू पहलूतही म्हणजे दुर्लक्ष करू लागलीस तर तुझें माझ्यावर प्रेम आहे असें समजून माझ्या मनात तुझ्याबद्दल आदर निर्माण होईल

(२) जगात सगळींच माणसें निर्धाराचीं आणि जगाला तृणप्राय समजणारीं असतीं तर जगात कोणीच शिल्लक राहिलें नसतें पण जग तर माणसानीं गजबजलेलें आहे. मद्यालयात सुरया आणि पात्रें मद्यानीं भरलेलीं आहेत ह्याचा अर्थच असा कीं मद्यालयात मद्यपी नाहींत तसेंच जग माणसानीं गजबजलेले असणें ह्याचाच अर्थ म्हणजे जगात निर्धाराच्या माणसाची वाण आहे

१६८ . . . वक्त् वो सुनता हैं कहानी मेरी
और् फिर् वो भी जबानी मेरी ॥ १ ॥
खलिशे गम्जये खूरेज् न पूछ्
देख् खूनाबा फिशानी मेरी ॥ २ ॥
क्या बया करके मेरा रोयेंगे यार्
मगर् आशुफ्ता बयानी मेरी ॥ ३ ॥
हू अज् खुद् रफ्तये बेदाये खियाल
भूल जाना हे निशानी मेरी ॥ ४ ॥
मुतकाबिल हें मुकाबिल मेरा
रुक् गया देख् खानी मेरी ॥ ५ ॥
कद्रे सगे सरे राह रखता हू
सख्त् अर्जा हे गिरानी मेरी ॥ ६ ॥
गरदे बादे राहे बेताबी हू
सर्सरे शौक् हें बानी मेरी ॥ ७ ॥
दहन् उसका जो न माद्रम् हुवा
खुद गयी हेचमदानी मेरी ॥ ८ ॥
कर दिया जोफने आजिज् गालिब्
नगे पीरी हे जवानी मेरी ॥ ९ ॥

(१) ती माझी हकीकत आणि तीही माझ्या तोंडून, ऐकते कुठे ?

(२) तिच्या खुनी नयनशराची तीव्रता विचारू नकोस माझ्या रक्ताश्रूकडे पाहा म्हणजे समजेल

(३) माझे मित्र माझी कोणती आठवण काढून रडणार आहेत ? माझ्या प्रेम-वेडाचीच ना ?

( ४ ) कल्पनेच्या वाळवंटांत, स्वतःला विसरून गेलेला मी प्रवासी आहें. माझी विस्मृतावस्था हीच माझी खूण आहे.

( ५ ) माझा आणि प्रियेचा स्वभाव सारखा आहे. ती चंचल, मीही चंचल. माझ्या स्वभावांतील चंचलपणा पाहून तिनें आपल्या चंचलपणाला मुरड घातली.

( ६ ) मी वाटेवर पडलेल्या दगडासारखा आहें. कुणीही यावें आणि डोक्यावर पाय देऊन जावें. पहावा तर मी जड ( मूल्यवान ) आहें पण लोकांच्या वागणुकीनें मी मूल्यानें हलका बनलों आहें.

( ७ ) मी रसिकतेच्या वादळांतून निर्माण झालेला धुलिकण आहें आणि म्हणून वादळासारखा अस्वस्थ आणि सारखा भटकणारा आहें.

( ८ ) सुंदरीचें दहन म्हणजे तोंड ( ओष्ठद्वय ) इतकें लहान असतें कीं कमरेप्रमाणेंच त्याचें अस्तित्व नाहीं असा कविसंकेत आहे. कवि म्हणतो कीं प्रयत्न करूनही मला प्रियेचें तोंड सापडलें नाहीं ह्यांत माझी अप्रतिष्ठा दिसून आली.

( ९ ) अशक्ततेनें मला लाचार करून सोडलें आहे. माझें तारुण्य म्हणजे जरठ जराच होय.

१६९ . . . नक़्शे नाज़े बुते तन्नाज़ ब आग़ोशे रक़ीब
पाये ताऊस् पये ख़ामये मानी मांगे ॥ १ ॥
तू वो बदख़ू के तहैयुर को तमाशा जाने
ग़म् वो अफ़साना के आशुफ़्ता बयानी मांगे ॥ २
वो तपे इश्क़ तमन्ना है के फिर सूरते शमा
शोला ता नब्ज़े जिगर रेशा दवानी मांगे ॥ ३ ॥

( १ ) मोर हा सुंदर असला तरी त्याचे पाय दिसायला कुरूप असतात. कवि म्हणतो कीं प्रिया संकेत करीत प्रतिस्पर्ध्याच्या अंकावर बसली आहे. तेव्हां हें चित्र काढतांना प्रिया मोरासारखी सुंदर आणि प्रतिस्पर्धी मोराच्या पायासारखा कुरूप असें चित्र चित्रकारानें काढावें.

( २ ) मी अचंब्यांत पडलों आहें आणि तू स्वभावानें इतकी वाईट आहेस कीं माझा अचंबा म्हणजे तुला करमणूक वाटते आहे. बरें, मी गप्प कां तर आमची दुःखद कहाणी सांगणें मला शक्य होत नाहीं. म्हणून दुःख व्यक्त करायला प्रेमवेड लागायला पाहिजे आणि तें तर तुला आवडत नाहीं. ह्या ओढाताणीनें मी गप्प बसलों आहें.

( ३ ) मला असा प्रेमाग्नि हवा आहे कीं ज्यांच्या ज्वाळा नसानसांतून भडकून शरीर जाळून टाकतील.

१७० ... गुलशन् को तेरी सुहब्बत अज् बस्के खुश आयी है
हर् गुंचेका गुल् होना आगोशरशायी है ॥ १ ॥
वा कुंगुरे इस्तिग्ना हरदम् है बल्दी पर
या नालेको और् उलटा दावये रसायी हैं ॥ २ ॥
अज् बस्के सिखाता है गम्ज़ब्त के अदाज़े
जो दाग् नजर आया इक् चश्म नुमायी है ॥ ३ ॥

(१) हे प्रिये, उपवनाला तुझा सहवास आवडलेला दिसतो त्या पहा कळ्या तुला पाहून आनंदाने विकसित होत आहेत

(२) तिकडे प्रिया उपेक्षेची कमाल करीत आहे, उलट आमच्या निश्वासाना वाटते की आपला प्रभाव तिच्यावर पडू लागला आहे

(३) शोक मला संयम शिकवू पाहात आहे आणि हृदयावरचे डाग हे शिक्षकाचे डोळे बनून मला संयम बाळगण्याची जणू खूण करीत आहेत

जिस् ज़ख्म की हो सकती हो तद्बीर रफ़ूकी
१७१ ... लिख दीजियो यारब् उसे किस्मत् मे अदूकी ॥ १ ॥
अच्छा है सर् अंगुश्ते हिनायी का तसव्वुर
दिल्मे नज़र आती तो हैं इक् बूंद् लहूकी ॥ २ ॥
क्यों डरते हो उश्शाक़ की वे हौसलगीसे
या तो कोयी सुनता नहीं फरयाद् कसूकी ॥ ३ ॥
दश्ने ने कभी मूंह् न लगाया हो जिगर् को
खंजर ने कभी बात न पूछी हो गलेकी ॥ ४ ॥

( ३ ) आम्ही आपली गाऱ्हाणीं आणि आक्रंदन परमेश्वरापाशीं सांगूं ह्याची, हे प्रिये, तुला भीति वाटते होय ? पण भिण्याचें कारण नाहीं कारण आमचीं गाऱ्हाणीं ऐकून घेण्यास कोणी तयार नाहीं.

( ४ ) प्रियेचें खंजीर आणि कट्यारींनीं ज्या प्रियकराच्या गळ्याचा किंवा काळजाचा ठाव घेतला नाहीं त्याच्या मनाची हुरहुर काय वर्णावी ?

✓( ५ ) ज्या प्रियकराला तापट प्रेयसीची तळमळ जन्मभर लागावी आणि तरीही ती पूर्ण होऊं नये ह्यापरतें दुर्दैव काय असूं शकेल !

१७२ . . . सीमाबपुस्त गरमीये आयीना दे है हम्
हैरां किये हुये हैं दिले बे क़रारके ॥ १ ॥
आग़ोशे गुलकुशूदा बराये विदाअ् है
अय अंदलीब् चल के चले दिन् बहारके ॥ २ ॥

( १ ) कांचेवर पारा लावला कीं त्याचा आरसा बनतो तसेंच अस्वस्थतेचा पारा आमच्या हृदयावर चढला आहे आणि त्यामुळें हृदय आरशासारखें हैरान म्हणजे बुचकळ्यांत पडलें आहे. ( उर्दू काव्यांत बुचकळ्यांत पडणाऱ्या स्थितीला आरशाची उपमा देतात. आरशासारखा बुचकळ्यांत पडला असें म्हणणें उर्दूंत रूढ आहे. )

( २ ) जीवन क्षणभंगुर आहे. फुलांचें उमलणें म्हणजे त्यांचें आयुष्य संपत आलें ह्याची सूचना होय. कवि म्हणतो कीं हे कोकिळे, पाहा कळ्या उमलल्या आहेत. आतां त्या परलोकीं जाण्याच्या तयारींत आहेत. वसंतऋतुही लवकरच निघून जाईल. फुलांचा निरोप घेऊन तूंही चालायला लाग कशी.

१७३ . . . ✓है वस्ल हिज्र आलमे तम्कीनो ज़ब्त मे
माशूक़ शोख़ व आशिक़े दीवाना चाहिये ॥ १ ॥
✓ उस् लब्से मिल ही जायेगा बोसा कभी तो हां
शौक़े फ़ुजूल व जुर्अते रिंदाना चाहिये ॥ २ ॥

✓( १ ) मीलनाची गोडी चाखण्यास प्रेयसी चंचल आणि प्रियकर धीट हवा नाहींतर दोघेंही संयम पाळीत बसलें तर तें मीलन कसलें ! तो विरह होय.

( २ ) तिच्या ओठांची चुंबनें हटकून मिळतील. त्याकरितां फक्त दोन गोष्टी हव्या. एक आसक्ति आणि दुसरें मद्यप्यासारखें धाडस म्हणजे कांहीं अवघड नाहीं.

१७४ चाहिये अच्छो को जितना चाहिये
ये अगर् चाहे तो फिर् क्या चाहिये ॥ १ ॥
सुहबते रिंदासे वाजिब् है उजर्
जाये मय अपने को खींचा चाहिये ॥ २ ॥
चाहने को तेरे क्या समझा था दिल्
बारे अब् इससेभि समझा चाहिये ॥ ३ ॥
चाक् मत् कर जेब वे अय्यामे गुल्
कुछ इधर् का भी इशारा चाहिये ॥ ४ ॥
दोस्ती का पर्दा है बेगानगी
मूंह छिपाना हम्से छोडा चाहिये ॥ ५ ॥
दुश्मनीनें मेरी खोया गैर को
किस् कदर् दुश्मन् है ? देखा चाहिये ॥ ६ ॥
अपनी रुसवायीमे क्या चल्ती है सअी
यार ही हगामा आरा चाहिये ॥ ७ ॥
मुनहसिर् मरनेपे हो जिसकी उमीद्
ना उमीदी उसकी देखा चाहिये ॥ ८ ॥
गाफिल इन् माहतलअतोंके वास्ते
चाहने वाला भी अच्छा चाहिये ॥ ९ ॥
चाहते हैं खूबरूयोंको असद्
आपकी सूरत् तो देखा चाहिये ॥ १० ॥

(५) प्रिये, तू तोंड का लपवितेस? प्रतिस्पर्ध्याशीं मोकळेपणानें बोलतेस तसेंच माझ्याशींही कर कारण तू तोंड लपवितेस ह्याचा अर्थ संकोच करतेस आणि संकोच म्हणजे प्रेमाचें लक्षण समजतात तुझ्या अशा वागणुकीनें तुझें माझ्याकडे लक्ष आहे हें समजून नाहीं का येणार?

(६) प्रतिस्पर्धी हा माझी निंदा करी निंदेच्या निमित्तानें का होईना माझा उल्लेख प्रियेला सहन झाला नाहीं आणि ह्याचा परिणाम म्हणजे माझ्या प्रतिस्पर्ध्याशीं ती शत्रुत्व करूं लागली

(७) आम्ही प्रेमरहस्याचा स्फोट करूं म्हटलं तरी शक्य नाहीं; पण प्रियेनें मात्र आपल्या सौंदर्याचा आविष्कार केला कीं आमच्या भावना उघड्या पडून आमचें प्रेम जग-जाहीर होईल, ह्यात शंका नाहीं

(८) केवळ मृत्यूवरच ज्याच्या सर्व आशा केंद्रित झाल्या आहेत, त्याची निराशा किती भयंकर असेल ह्याची कल्पनाच केलेली बरी

(९) अरे मूर्खा, त्या चंद्रमुखींच्या वर प्रेम करण्याचा हव्यास ज्याला आहे तोसुद्धा चांगला आणि देखणा हवा

(१०) हे असद्, तुला सुंदर स्त्रिया आवडतात पण तू आपला चेहरा कधीं आरशात पाहिलास काय?

१७५... हर् कदम् दूरीये मंज़िल् हे नुमाया मुझसे
मेरी रफ्तार्से भागे है बियाबा मुझसे ॥ १ ॥
दर्से उनवाने तमाशा बतगाफुल् खुश्तर
हैं निगाह रिश्तये शीराज़ये मिज़गा मुझसे ॥ २ ॥
वहशते आतिशे दिल्से शबे तन्हायी मे
सूरते दूद रहा साया गुरेज़ा मुझसे ॥ ३ ॥
गमे उश्शाक् न हो सादगी आमोज़े बुतान्
किस कदर खानये आयीना हैं वीरा मुझसे ॥ ४ ॥
असरे आबलासे जादये सहराये जुनून्
सूरते रिश्तये गोहर है चिरागा मुझसे ॥ ५ ॥
बेख़ुदी बस्तये तमहीदे फरागत् हो जो
पुर् है साये की तरह मेरा शबिस्ता मुझ् से ॥ ६ ॥
शौके दीदार् मे गर तू मुझे गर्दन् मारे
हो निगाह मिस्ले गुलेशमा परीशां मुझसे ॥ ७ ॥

बेन्सीहाये शबे हिज्र की वहशत है है
साये खुर्शीद् कियामत मे है पिन्हा मुझसे ॥ ८ ॥
गर्दिशे सागरे सद् जल्वये रगीं तुझसे
आयीनादारीये यक् दीदये हैरां मुझसे ॥ ९ ॥
निगहे गरम् से इक् आग् टपकती है असद्
है चरागा खसो खाशाके गुलिस्ता मुझसे ॥ १० ॥

( १ ) आपले ध्येय गाठण्याकरिता मी जितक्या जलद चालत आहे तितकेंच ध्येय दूरदूर सरकत चालल्यासारखें वाटतें जणू काय माझ्या इतक्याच तीव्र गतीने माझ्या समोरचें मैदान पुढें सरकू लागलें आहे

( २ ) प्रियेच्या मुखरूपी ग्रंथाचें आम्ही सतत पारायण करावं आणि तिचे लक्ष आमच्याकडे नसाव ह्यापेक्षा आनंद कोणता ?

( ३ ) विरहावस्थेत माझ्या हृदयात पेटलेल्या अग्नीमुळें माझी सावली सुद्धा माझ्या पासीं फिकेनाशी झाली आहे अग्नीपासून धुराचे लोट दूर जातात तसेच माझी सावली पण माझ्यापासून दूर चालली आहे

( ४ ) आम्हा प्रेमिकाच्या शोकाचा प्रभाव पडून प्रेयसींनीं सौंदर्यप्रसाधनाचा त्याग केला तर मोठी पंचायत पडेल मी मेल्यानंतर प्रियेने आरशात आपलें रूप न्याहाळणें सोडून दिले आहे आणि त्यामुळें आरसा निर्जन झाला आहे सर्व प्रेयसींची ही स्थिति झाली तर जगातील आयनेमहाल उध्वस्त होऊन जातील ह्यात शंका नाही

( ५ ) प्रेमवेडात वैराण वाळवंटात भटकता भटकता माझ्या पायात जे फोड आले आहेत ते मोत्यासारखे चमकत आहेत आणि त्यांचीं चिन्हे रस्त्यात उमटल्यामुळें हा रस्ता म्हणजे मोती ओवलेल्या सूत्रासारखा वाटत आहे आणि वाळवंटात प्रकाशाची आरास झाली आहे

( ६ ) माझी विस्मृतावस्था ही माझ्या अंतिम नाशाची प्रस्तावना ठरो, कारण माझ्या विस्मृतावस्थेनें माझं हृदयागार अंधाराने रात भरून जाते तसें भरून टाकलें आहे

( ७ ) तुझ्याकडे पाहातों म्हणून तू माझें डोकें उडविलेस तरी दिव्याची वात थोडी छाटल्यावर दिवा जसा पुन्हा प्रज्वलित होतो त्याप्रमाणें माझी दृष्टि तुझ्याकडे आणखी तीव्र पणानें पाहू लागेल

( ८ ) विरहरात्रीने माझ्या हृदयात जी आग पेटली आहे त्यामुळें माझी सावली माझ्यापासून लपली आहे सूर्याची सावली सूर्यापासून तोंड लपविते तद्वत माझी स्थिति झाली आहे

( ९ ) सौंदर्याची मदिरा हे प्रिये, तुझ्यामुळें चहूकडे फिरत आहे आणि अचंब्याचा आरसा माझ्यामुळें स्तब्ध आहे ९

. . . . २३४

(१०) हे असद्, माझ्या तस नेत्रातून अश्रूंचा वर्षाव होत आहे आणि उपवनात ह्या ज्वाळा भडकताना दिसतात त्या माझ्या नेत्रातील आश्रू होत

१७६ . . . नुक्ताचीं हे गमे दिल उसको सुनाये न बने
क्या बने बात जहा बात् बनाये न बने ॥ १ ॥
मैं बुलाता तो हूँ उसको मगर् अय् जज्बये दिल
उसपे बन जाये कुछ ऐसी के बिन् आये न बने ॥ २ ॥
खेल समझा है कहीं छोड न दे भूल न जाये
काश् यौं भी हो के बिन् मेरे सताये न बने ॥ ३ ॥
गर् फिरता है लिये यौं तेरे खतूको के अगर्
कोयी पूछे के ये क्या है तो छिपाये न बने ॥ ४ ॥
इस् नजाकत् का बुरा हो वो भले हैं तो क्या
हाथ आवें तो उन्हे हात लगाये न बने ॥ ५ ॥
कह सके कौन् के ये जल्वागरी किस्की है
पर्दा छोडा है वो उसने के उठाये न बने ॥ ६ ॥
मौत् की राह न देखू के बिन् आये न रह
तुम् को चाहू के न आओ तो बुलाये न बने ॥ ७ ॥
बोझ वो सरसे गिरा है के उठाये न उठे
काम् वो आन् पडा है के बनाये न बने ॥ ८ ॥
इश्क पर् जोर् नहीं है ये वो आतिश् गालिब्
के लगाये न लगे औंर् बुझाये न बने ॥ ९ ॥

(१) प्रिया प्रत्येक गोष्टींत वारकाइ काढते आहे तिला हृदयाचे दुःख ऐकविण्याची सोय नाहीं जेथ सोयीचे बोलणें नाहीं तथें काय बोलायचे ?

(२) हे भावने मी तिला बोलावतों पण ती यईल असें वाटत नाहीं यथ तूं तिला माझ्याकडे ओढून आणण्यात मदत करूं शकशील काय ?

(३) छळ करणें म्हणजे तिला खेळ वाटतो कुठ तिने खेळ विसरून जाऊं नये म्हणजे बरं कारण आम्हाला छळ झाल्याशिवाय आनन्द तो तिला छळण्याची सवय जगावी म्हणजे घटकाभरचे खेळणे समजून ती विसरून जाणार नाहीं

(४) अग, तूं प्रतिस्पर्ध्यांना लिहिले आहेस तें पत्र तो इतक्या उघडपणें मिरवीत आहे कीं तें पत्र लपविण्याची सोय राहिली नाहीं तुझ्या प्रेमाचें गुपित उघडं पडायचें

(५) ती इतकी नाजुक कशी? हातीं लागली तर तिला हात लावावा कीं नाहीं ह्याचा संकोच वाटू लागतो

(६) ही सृष्टि कुणाच्या सौंदर्याचा आविष्कार आहे? त्या शक्तीवर पडलेला पडदा उचलणें कुणालाही शक्य दिसत नाहीं

(७) मृत्यूची वाट पाहाण्यात काय अर्थ! तो तर येणारच आहे; पण तूं यावेंस असें वाटलें तरी तू येणार नाहींस ह्या भीतीनें तुला बोलावण्यास संकोच वाटतो

(८) माझ्या डोक्यावरून एक ओझें खालीं पडलें आहे मी तें ओझें उचलूं शकत नाहीं हें काम माझ्याच्यानें सुधरत नाहीं

(९) हे गालिब, प्रेमावर कुणाचा प्रभाव चालू शकेल? ती एक आग आहे लावू म्हटल्यान लागत नाहीं आणि विझवू म्हटल्यान विझत नाहीं

१७७ . . . चाक की ख़्वाहिश अगर वहशत ब उर्यानी करे
सुबह के मानिंद ज़ख़्मे दिल गरेबानी करे ॥ १ ॥
जल्वे का तेरे वो आलम है के गर कीजिये ख़याल
दीदये दिल को ज़ियारत् गाहे हैरानी करे ॥ २ ॥
है शिकस्तन से भी दिल नौमीद यारब् कब् तलक्
आबगीना कोहपर् अर्ज़े गिराजानी करे ॥ ३ ॥
मैकदा गर चश्मे मस्ते नाज़ से पावे शिकस्त्
मूयेशीशा दीदये साग़र् की मिज़्गानी करे ॥ ४ ॥
ख़ते आरिज़ से लिखा है ज़ुल्फ को उल्फत् ने अहद
यक् क़लम् मंज़ूर है जो कुछ परीशानी करे ॥ ५ ॥

(१) वेडात कपडे फाडण्याची इच्छा होते पण अगावर कपडे नसले तर अ जखमा फाटल्या जातात जशी प्रभात हळुहळू उघडत जाते तसे माझ्या जखमा उघडू लागतात

(२) तुझ्या सौंदर्याचा आविष्कार पाहून माझेंही मन अचंब्याच आगर बनलें आहे

(३) प्रियेच हृदय म्हणजे कठिण पाषाणाचा डोंगर आणि माझें हृदय म्हणजे नाजूक काचेचें पान भाग्य शेवट कर असें काचपात्रानें डोंगराला किती वेळ विनवावें! त्यातही निराशा पदरीं पडत आहे

(४) प्रियेच्या चंचल नेत्रांमुळें सारें मद्यालय प्रभावित झालें आहे आणि मद्यपात्रें प्रियेकडे अचंब्यान पाहात आहेत

(५) प्रियेच्या गालावर ज्र आहे ती ज्र नव्हे तर प्रेमानें केशकलापाला लिहून दिलेला हा करार आहे कीं तुझा प्रेमक्षेत्रात जें काहीं करावयाचें आहे तें मला पूर्णपणें समत आहे

१७८ . . . वो आके ख्वाब् मे तस्कीने इज्तिराब् तो दे
व ले मुझे तपिशे दिले मजाले ख्वाब तो दे ॥ १ ॥
करे है कत्ल लगावट मे तेरा रो देना
तेरी तरह कोयी तेगे निगाह को आब् तो दे ॥ २ ॥
दिखाके जुम्बिशे लब् ही तमाम् कर हम् को
न दे जो बोसा तो मूह से कहीं जवाब् तो दे ॥ ३ ॥
पिला दे अवक से साकी जो हम् से नफरत हैं
प्याला गर् नहीं देता न दे शराब् तो दे ॥ ४ ॥
असद् खुशीसे मेरे हात पाव फूल गये
कहा जो उसने जरा मेरे पाव दाब तो दे ॥ ५ ॥

(१) प्रिया स्वप्नात येऊन माझें समाधान करील कदाचित् पण हृदयातील अस्वस्थते मुळें झोप येत नाहीं त्याला काय करावयाचें ?

(२) तुझ्या डोळ्यात प्रेमाश्रु पाहून त्यावर जीव ओवाळावासा वाटतो अगे, ते अश्रु नव्हेत तर प्रेमिकाचा वध करण्यास नयनाच्या समशेरीला अधिक पाणीदार करीत आहेत

(३) नुसते ओठ हलवून आमचा निकाल लाव क्या अगे, चुंबन देण्यास तुझ्या पाशीं ओठ नसले तरी दोन शब्द बोलण्यास तोंड आहे ना ?

(४) साकी, आम्ही तुला आवडत नाहीं आणि म्हणून आम्हाला तू दारूचीं पात्रं देत नाहींस ना ? नको देऊंस आम्ही ओंजळीनें दारू पिण्यास तयार आहोंत आम्हाला दारू पिण्याशीं मतलब पात्रं घेऊन काय करायचें आहे ?

(५) प्रियेनें म्हटले कीं माझे हातपाय दाबून दे तें ऐकून आनंदानें माझें अगन् अग फुलून आलें

१७९ . . . तपिश् से मेरी वक्फे कश् मकश हर तारे बिस्तर है
मेरा सर् रजे बालीन है मेरा तन् बारे बिस्तर है ॥ १ ॥
सरश्के मरनसहरा दादा नूरुल ऐने दामन् है
दिल बेदस्तोपा उफ्तादा बरखुरदारे बिस्तर है ॥ २ ॥

खुशा इक्वाले रजूरी इयादत को तुम् आये है
फरोगे शमेए बालीन ताले वेदारे निस्तर है ॥ ३ ॥

ब तफ़ान्गाहे जोशे इग्तिरावे शामे तनूहायी
शुआये आफ़तावे सुबहे महशर् तारे बिस्तर है ॥ ४ ॥

अभी आती है बू बालिश् से उसकी जुल्फे मिश्कीं की
हमारी दीदको ख्वाबे जुलेखा आरे बिस्तर है ॥ ५ ॥

कहू क्या दिल की क्या हालत् है हिज्रे यार् मे गालिब्
के बेताबीसे हर यक् तारे विस्तर खारे विस्तर है ॥ ६ ॥

(१) माझ्या अस्वस्थतेमुळें माझ्या बिछान्याचा एकेक तंतू अस्वस्थ झाला आहे उशाना माझ्या डोक्याचा आणि बिछान्याला माझ्या शरीराचा भार वाटत आहे

(२) माझे अश्रु वाहत वाहत बाळंतपर्यंत जाऊन पोहोंचले आहेत त्यामुळें तेथपर्यंत माझी एक तार बाधली गेल्यासारखें झालें आहे, आणि इकडे मान मी असहाय स्थितींत बिछान्यावर पडलों आहे जणू काय माझ्या बिछान्याला माझ्या हृदयाबद्दल प्रेमाचा पुळका आला आणि तो (बिछाना) मला सोडूं इच्छित नाहीं

(३) माझ्या आजाराचें नशीव पाहा! तू विचारपूस करण्यासरिता माझ्या उशाशीं आली आहेस जणू काय तूं आल्यानें माझें नशीव दुखणाइताच्या उशागतीं ठेवलेल्या दिव्या-सारखें प्रज्वलित झालें आहे

(४) ह्या विरहाच्या रात्रीं तळमळीचीं वादळें उठलीं आहेत आणि बिछान्याचा धागान्धागा कल्पातीच्या सूर्याचा तप्तकिरण बनल्यासारखा भासत आहे

(५) माझ्या उशीला अजून प्रियेच्या केशकलापाचा सुगंध येत आहे प्रियानें मीलनानंतर सुकाच शय्यात्याग केला आहे जुलेखासारखें स्वप्नातील मीलन म्हणजे शय्येचा अपमान होय

(६) विरहाची अवस्था काय वर्णूं! ह्या शय्येचा प्रत्येक तंतू म्हणजे खोल रुतणारा एकेक काटा बनला आहे

१८० . . . खतर है रिश्तये उल्फत् रगे गर्दन् न होजावे
गुरूरे दोस्ती आफत् है तू दुश्मन् न होजावे ॥ १ ॥

समझ इस् फसल मे कोताहीये नशो नुमा गालिब्
अगर् गुल सर्व की कामत् पे पेराहन् न होजावे ॥ २ ॥

(१) आपल्या प्रेमामुळें मला गर्व चढेल कीं काय अशी भीति वाटते आणि मी असा गर्व करू लागलों कीं तू माझ्यावर चिडशील ह्याची भीति वाटते

(२) वसंतऋतूंत फुलं इतकीं फुलतात कीं गुलच्या झाडाशीही झाकून टाकतात असें झालें नाहीं तर समजाव कीं यंदाचा वसन्तऋतु पूर्ण बहरांत नव्हता

१८१ . . . फरयाद् की कोयी लय् नहीं है
नाला पाबंदे नय् नहीं है ॥ १ ॥
क्यौं बोते हैं बाग़बान तोंबने
गर् बाग गदाये मय् नहीं है ॥ २ ॥
हरचंद हर एक् शय् मे तू है
पर् तुझसे तो कोयी शय् नहीं है ॥ ३ ॥
हा खाइयो मत् फरेबे हस्ती
हरचद् कहे के है नहीं है ॥ ४ ॥
शादीसे गुजर् के गम् न होवे
उर्दी जो न हो तो दय् नहीं है ॥ ५ ॥
क्यौं रद्दो कदह करे है जाहिद्
मय् है ये मगस् की कय् नहीं है ॥ ६ ॥
हस्ती है न कुछ् अदम् है गालिब्
आख़िर् तू क्या है अय नहीं है ॥ ७ ॥

(१) गाऱ्हाणें कोणीही गात त्याला कुणाचं बंधन नाहीं तसेंच आक्रंदनाची त्यात कृत्रिमता नसली म्हणजे झाल

(२) माळी शेतात भोपळ्याच्या बिया का पेरतात ? भोपळ्यातून फकीराचें भिक्षापात्र आणि भोपळ्यातून दारू काढतात त्यांनीं बागेलाही दारू हवीशी वाटते नाहीं तर भोपळे बागेंत लावण्याचं काय कारण ?

(३) परमेश्वरा, तू प्रत्येक वस्तूंत आहेस पण कोणतीही वस्तु तुझ्यासारखी नाहीं

(४) ह्या जगाच्या धोक्यात पडूं नका ही सर्वसृष्टि म्हणजे माया आहे

(५) सुखें लाटून घेऊं नकोस म्हणजे तुला दुःखें भासणार नाहींत वसंतऋतु नसला तर हिंवाळाही नाहीं असें समज

(६) हा प्रवचनकार मागें पुढें काय करीत आहे ? त्याला म्हणावें ही दारू आहे मधमाशीचं वमन (मध) नाहीं

(७) अस्तित्वही नाहीं आणि मायाही नाहीं मग हे गालिब, हें सगळें आहे तरी काय ?

१८२ . . . न पूछ नुस्खा मरहमे जराहते दिल का
के उसमे रेजये अल्मास् जुज्वे आज़म् हे ॥ १ ॥
बहोत दिनों मे तगाफुल ने तेरे पैदा की
वो यक् निगाह के बजाहर निगाह्से कम् हैं ॥ २ ॥

( १ ) हृदयाच्या जखमाचा इलाज काय हे मला विचारू नकोस अरे, औषधात वज्राचा चुरा वापरावा लागतो आणि त्यामुळें जखमा वाणरी चिघळतात

( २ ) इतके दिवस तू उपेक्षा करीत होतीस आता माझ्याकडे दृष्टिक्षेप करते आहेस तीसुद्धा ओझरती

१८३ . . . हम् रश्क को अपने भी गवारा नहीं कर्ते
मर्ते हैं वले उन्की तमन्ना नहीं कर्ते ॥ १ ॥
दर्पर्दा उन्हे गैरसे है रब्ते निहानी
जाहिर का ये पर्दा है के पर्दा नहीं करते ॥ २ ॥
ये बाइसे नौमीदीये अरबाबे हवस् है
गालिब् वो बुरा कहते हो अच्छा नहीं कर्ते ॥ ३ ॥

( १ ) तिच्या प्रेमात आम्हाला स्वत चाही मत्सर वाटू लागला आहे आम्ही मरून जाऊं पण तिची इच्छा करणार नाहीं कारण त्यामुळ आमचा आम्हालाच मत्सर वाटू लागेल

( २ ) आतून तिला माझ्या प्रतिस्पर्ध्याची ओढ लागली आहे पण ती दिसून येऊ नये म्हणून आणि आपल्या मनात काहीं नाही ह दाखविण्याकरता ती बेपडदा होऊन प्रतिस्पर्ध्याशी बोलत कारण सकोच करणें आणि पडदा पाळणें यावरून आतून आपल लक्ष कुणावर तरी आहे असें सुचविण्यासारखें आहे

( ३ ) गालिब तुझा खरा प्रेमिक आहे त्याला वाईट म्हणतेस हें बरें नाहीं त्यामुळें इतर प्रतिस्पर्धी आपल्या प्रेमाबाबत निराश होतील त्यात काय नवल ?

असद् है नज़अ मे चल बेवफा बराये ख़ुदा
मुकामे तर्के हिजाब् व विदाये तमकीन है ॥ ४ ॥

( १ ) मदिरेला तुझे ओठ लागल्यामुळें तिचा तांबडा रंग अधिक खुलून दिसत आहे आणि मदिरापात्रावरील रेघा तुझ्या फुलासारख्या भासणाऱ्या ओठाच्या संसर्गानें अधिक खुलून दिसत आहेत

( २ ) ह्या प्रेमवेड्याची काहीं तरी दाद घे बघ सगळें आयुष्य उशीवर डोकें टेकून तो तळमळत पडला आहे

( ३ ) फुलें बुलबुलचीं आक्रंदनें कशीं ऐकतील ? दवबिंदूच्या रूपानें त्याच्या कानांत कापूस भरला आहे ना ?

( ४ ) हे प्रिये, असद् अतशाची घटिका मोजीत आहे आता तरी त्याची विचारपूस कर ही वेळ स्वाभिमान व संकोच सोडून देण्याची आहे

१८५ . . . क्यौं न हो चश्मे बुतान् महवे तगाफुल क्यौं न हो
यानी इस् बीमार को नज्ज़ारे से परहेज़ है ॥ १ ॥
मरते मरते देखनेकी आरज़ू रहजायेगी
वाये नाकामी के उस् काफ़िर का ख़जर तेज़ है ॥ २ ॥
आरिजे गुल् देख रूये यार याद् आया असद्
जोशिशे फस्ले बहारी इश्तियाक़ अंगेज़ है ॥ ३ ॥

( १ ) उर्दू काव्यात प्रेयसीच्या डोळ्यांना प्रेमरोग्याच डोळे म्हणण्याचा प्रघात आहे. कवि म्हणतो कीं प्रिया आमची उपेक्षा करते तिच्या डोळ्यांना आमच्याकडे न बघण्याचें पथ्य सांगितलें आहे असें वाटतें

( २ ) मरतांना तिच्याकडे डोळे भरून पाहाण्याची हौस मनातच राहून जाईल प्रियेचा खंजीर इतका तीक्ष्ण आहे कीं डोळ्याचं पातें लवतें न लवतें तोंच आमचा शिरच्छेद व्हावयाचा

( ३ ) गुलाबाचें उमललेलें फूल पाहून प्रियेचा चेहेरा आठवला वसंतऋतूच्या आगमनाबरोबर जणू प्रेमाचे विचार पुन्हा मनात खेळू लागले

१८६ . . . दिया है दिल् अगर उस्को बशर है क्या कहिये
हुवा रक़ीब् तो हो नामाबर है क्या कहिये ॥ १ ॥
ये ज़िद के आज न आवे और आये बिन् न रहे
कज़ासे शिकवा हमे किस्क़दर है क्या कहिये ॥ २ ॥

रहे हैं यौं गह् व बेगह के कूये दोस्त को अब्
अगर न कहिये के दुश्मन् का घर है क्या कहिये ॥ ३ ॥
जहे करिश्मा के यौं दे रखा है हम को फरेब्
के बिन् कहे ही उन्हें सब खबर है क्या कहिये ॥ ४ ॥
समझ्के करते हैं बाजार मे वो पुर्सिशे हाल
के ये कहे के सरे रहगुजर है क्या कहिये ॥ ५ ॥
तुम्हे नहीं है सिररिश्तये वफा का खियाल
हमारे हाथ् मे कुछ है मगर है क्या कहिये ॥ ६ ॥
उन्हें सवाल मे जोमे जुनू है क्यौं लडिये
हमे जवाब् से कता नजर है क्या कहिये ॥ ७ ॥
हसद् सजाये कमाले सुखन् है क्या कीजे
सितम् बहाये मताए हुनरर है क्या कहिये ॥ ८ ॥
कहा है किस्ने के गालिब् बुरा नही लेकिन्
सिवाये इस्के के आशुफ्ता सर है क्या कहिये ॥ ९ ॥

(१) मी दूताबरोबर प्रियेकडे निरोप पाठविला निरोप पोहोंचवून तो दूत तिच्या प्रेमात सापडला तिचे सौंदर्य इतकें मादक आहे की दूत प्रेमात सापडावा ह्यात नवल नाहीं कारण तोही मनुष्यच आहे

(२) आज मृत्यू न यावा आणि आमच्या दुःखाचा शेवट करावा असें वाटतें मृत्यु येईल, आल्याशिवाय राहणार नाहीं, पण तो आज हवा आहे तेव्हा हटकून येणार नाहीं फार हट्टी आहे तो

(३) आमचा प्रतिस्पर्धी जेव्हां दिवसरात्र प्रियेच्या घरीं पडून राहतो तेव्हा प्रियेचें घर म्हणजे आम्हाला शत्रुस्थान वाटूं लागलं आहे

(४) प्रियेचा नखरा पाहा ती असा आव आणते जणूं काय तिला माझी मन:स्थिति पूर्णपणें माहीत आहे ह्या भ्रमामुळें मी तिला आपली हकीकत सांगू शकत नाहीं

(५) ती जाणूनबुजून रस्त्यात उभी राहून माझी चौकशी करी कारण तिला माहीत की रस्त्यात उभे राहून बोलणें आम्हाला आवडत नाहीं आणि तिने चौकशी केली तरी आम्ही गप्प राहतो हें तिला माहीत आहे

(६) तिला निष्ठा म्हणजे काय शब्द आहे माहीत नाहीं. आम्ही आपली निष्ठा मुठींत धरून बसलों आहोंत. आमच्या मुठींत काय आहे हें विचारलें तर ती उत्तर देऊं शकत नाहीं.

(७) मी प्रश्न विचारले कीं तिला वाटतें मला वेड लागले आहे त्यामुळें तिच्याकडून उत्तराची अपेक्षा करणें मी सोडून दिलें आहे.

(८) प्रतिभाशाली माणसाबद्दल जगाला नेहमीं हेवा वाटतो. म्हणजे प्रतिभा ही शिक्षा झाली आणि कलाकाराचा जग छळ करतें म्हणजे कलेचें मूल्य छळ होय

(९) गालिब वाईट नाहीं फक्त त्याचे डोकें फिरलें आहे म्हणतात

१८७ . . . देखकर दरपरदा गरमे दामन् अफ़शानी मुझे
कर् गयी वाबस्तये तन् मेरी उरियानी मुझे ॥ १ ॥
बन् गया तेगेनिगाहे यार् का संगेफिसा
मर्हबा मैं क्या मुबारक् हैं गिराजानी मुझे ॥ २ ॥
क्यों नहो बेइल्तफाती उसकी खातिरजमअ है
जानता है महवे पुरसिशहाये पिनहानी मुझे ॥ ३ ॥
मेरे ग़मखाने की क़िस्मत् जब रकम् होने लगी
लिखदिया मिन्जुम्लये असबाबे वीरानी मुझे ॥ ४ ॥
बद्गुमा होता है वो काफिर न होता काश के
इस्कदर जौके नवाये मुर्गे बुस्तानी मुझे ॥ ५ ॥
वाये बाभी शोरे महशरने न दम् लेने दिया
ले गया था गोर मे जौक़े तन् आसानी मुझे ॥ ६ ॥
वादा आनेका वफा कीजे ये क्या अदाज् है
तुमने क्यों सोंपी है मेरे घरकी दरबानी मुझे ॥ ७ ॥
हा निशाते आमदे फस्ले बहारी वाहवाह
फिर् हुवा है ताजा सौदाये गजल ख़्वानी मुझे ॥ ८ ॥
दी मेरे भाईको हक़ने अज़सरेनौ जिंदगी
मीर्जा यूसुफ़् है गालिब यूसुफेसानी मुझे ॥ ९ ॥

( १ ) वस्त्रें त्यागिल्यानें मी जीवन्मुक्त झालों असें समजत होतों; पण शरीराचें वस्त्र आत्म्याला चिकटलें तें काहीं त्यागतां येईना.

( २ ) माझ्या शरीराचें भाग्य काय समजावें! प्रिया आपल्या नयनांची कट्यार माझ्या शरीराला दगड समजून त्याच्यावर कट्यार घासून धार तीक्ष्ण करीत असते.

( ३ ) ती माझी उपेक्षा करीत आहे; कारण तिला माहीत आहे कीं, मी तिचे मनोमय चिंतन करण्यांत गर्क झालों आहें. तोंडानें शब्द काढीत नाहीं. आपली उपेक्षा मला जाणवणार नाहीं, ह्याची तिला खात्री आहे.

( ४ ) माझें घर उध्वस्त होण्याचें जेव्हां परमेश्वर माझ्या नशीबीं लिहीत होता, त्यांत उध्वस्ततेला कारण मी होणार हेंही त्यानें लिहून टाकलें.

( ५ ) मला पक्ष्यांचे संगीत आवडतें, त्यामुळें प्रिया माझ्यावर चिडते. तिला वाटतें, आपल्याशिवाय इतर कोणत्याही गोष्टीची आसक्ति मला राहूं नये. पक्ष्याचें कूजन, ऐकण्याचा मला शौक नसता तर बरें झालें असतें.

( ६ ) कबरेंत तरी मला स्वस्थता मिळेल असें मी समजत होतों; पण दुर्दैव माझें! कल्पांताच्या हलकल्लोळानें मला तेथें पण विश्रांति घेऊं दिली नाहीं.

( ७ ) येईन म्हणून वचन दिलेंस तें पूर्ण कर ना. हें काय? तुझ्या प्रतीक्षेंत माझ्या घराचा मी राखणदार बनून बसलों आहें.

( ८ ) या वसंतऋतो, तूं आलास त्यामुळें मनाला किती हर्ष होतो आहे म्हणून सांगूं! आतां पुन्हां काव्यरचनेला बहर येऊं लागला आहे.

( ९ ) परमेश्वरानें माझा भाऊ मिर्झा यूसुफ ह्याला ( हा वेडा होता ) नवजीवन दिलें हे त्याचे आभार होत. माझा भाऊ यूसुफ हा प्राचीन कालचा मतियुसुफच होय.

१८८ . . . याद् है शादी मे भी हंगामये यारब् मुझे
सुब्हाये जाहिद् हुवा है ख़ंदा जेरेलब् मुझे ॥ १ ॥
है कुशादा खातिर वाबस्ता दर रहने सुखन
था तिलिस्मे कुफ़्ले अब्जद् ख़ानये मक्तब् मुझे ॥ २ ॥
यारब इस आशुफ्तगी की दाद किससे चाहिये
रश्क आसाइश पे है जिंदानीयोंकी अब् मुझे ॥ ३ ॥
तग़ है मुश्ताक़े लज़्ज़तहाये हस्रत् क्या करूं
आरज़ू से है शिकस्ते आरज़ू मतलब् मुझे ॥ ४ ॥
दिल लगाकर आप भी ग़ालिब मुझी से होगये
इश्क से आते थे माने मीरज़ा साहब् मुझे ॥ ५ ॥

(१) आनंदाच्या प्रसंगीं 'हे परमेश्वरा, हे प्रभो,' असें मी म्हणत असतों. माझे ओठ म्हणजे जपमाळ बनले आहेत.

(२) विशिष्ट प्रकारचीं कुलपें जशीं विशिष्ट शब्द जुळल्याबरोबर उघडतात आणि म्हणून त्या विशिष्ट शब्दांवर अवलंबून असतात. तद्वत माझ्या तब्येतीची खुलावट माझ्या काव्यरचनेवर अवलंबून आहे.

(३) माझें वेड पाहा. पूर्वी कारागारांत होतों तेव्हा वाळवंटाची उपेक्षा करीत होतों. आतां वाळवंटांत आहें तर कारागारातील सुखाचा हेवा वाटूं लागला आहे.

(४) मला हुरहुर आणि हळहळ ही आवडतात आणि आकांक्षा आवडतात. ह्याचा अर्थ अतृप्त आकांक्षा आवडतात हा होय.

(५) गालिब, प्रेम करूं नका म्हणून तूं आम्हाला सांगत होतास, पण तूंही त्यांत फसून आमच्यासारखाच झाला आहेस.

१८९ . . . हुज़ूरे शाह्र मे अहले सुख़न् की आज़माइश् है
चमन् मे खुशनवायाने चमन् की आज़माइश् है ॥ १ ॥
क़द् व गेसू मे क़ैस् व कोह्कन् की आज़माइश है
जहां हम् हैं वहां दारो रसन् की आज़माइश् है ॥ २ ॥
करेंगे कोहकन् के हौसलेका इम्तिहा आख़िर्
हनूज़् उस् ख़स्ताके नैरुये तन् की आज़माइश् है ॥ ३ ॥
नसीमे मिस्र को क्या पीरे कन्आ की हवाख़्वाही
उसे यूसुफ़की बूये पैरहन् की आज़माइश् है ॥ ४ ॥
वो आया वज़्म मे देखो न कहियो फिर् के ग़ाफ़िल् थे
शिकेबो सब्रे अहले अंजुमन् की आज़माइश् है ॥ ५ ॥
रहे दिलही मे तीर अच्छा जिगर् के पार हो बेहतर्
ग़रज़् शुस्ते बुते नावकफ़गन् की आज़माइश है ॥ ६ ॥
नहीं कुछ सुबहा व जुन्नार के फंदे मे गीरायी
वफ़ादारी मे शेखो ब्रेहमन् की आज़माइश है ॥ ७ ॥
पडा रह अय् दिले वाबिस्ता बेताबीसे क्या हासिल्
मगर फिर् ताबे ज़ुल्फ़े पुरशिकन् की आज़माइश है ॥ ८ ॥

रगो पये मे जब् उतरे जहरे ग़म् तब् देखिये क्या हो
अभी तो तल्खीये कामो दहन् की आज़माइश है ॥ ९ ॥
वो आयेगे मेरे घर् वादा कैसा देखना ग़ालिब
नये फ़ित्नोंमे अब् चर्खे कुहन् की आज़माइश है ॥ १० ॥

( १ ) आज दरबारात कवींची परीक्षा आहे. जणू काय उपवनांत पक्ष्यांची कूजना-बाबत स्पर्धा आहे.

( २ ) मजनू आणि फरहाद ह्याच्या प्रेमाची परीक्षा प्रेयसीचा बांधा, तिचा केशकलाप इत्यादि भौतिक गोष्टींच्यावरून केली जाते. पण आमची परीक्षा त्याहूनही कठीण आहे.

( ३ ) फरहाद कालवा खणून आणण्याच्या प्रयत्नांत आहे. सध्या त्याच्या शारीरिक श्रमाची परिक्षा आहे. ह्याच्या पुढची पायरी म्हणजे त्याच्या निर्धाराची परीक्षा राहील.

( ४ ) यूसुफ इजिप्त देशामध्यें कैदेंत असतानाची हकीकत. कवि म्हणतो, इजिप्तकडून येणारा वारा यूसुफच्या शरीराचा सुगंध घेऊन यूसुफचा बाप याकूब ह्याच्याकडे आला. त्यांत त्या वाऱ्याला याकूबचें कुशल जाणण्याची इच्छा नव्हती, तर त्या सुगंधाचा याकूबवर काय परिणाम होतो, हें पाहावयाचें होतें.

( ५ ) ती पहा मैफिलींत आली. पुन्हा म्हणू नका कीं आम्ही गाफील होतों. म्हणून आतां मैफिलीच्या सहनशक्तीची आणि शांततेची परीक्षा आहे.

( ६ ) बाण हृदयांत रुतून राहिला तर बरें; तो काळजाच्या आरपार निघून गेला तर त्याहूनही उत्तम. त्या शरसंधान करणाऱ्या प्रियेच्या नेमबाजीची आता परीक्षा आहे.

( ७ ) मुसलमानाची स्मरणी आणि ब्राह्मणाचें जानवें ह्यात सर्व कांहीं आलें असें नाहीं. खरा प्रश्न श्रद्धेचा आणि त्यात ह्या दोघांची खरी परीक्षा आहे.

( ८ ) अरे बद्ध हृदया, उगाच कां तळमळतो आहेस? प्रियेच्या केशकलापाच्या बंधनांत तू किती तरी वेळा अडकला आहेस. आतां पुन्हां परीक्षा पाहायची आहे काय?

( ९ ) हें शोकाचें विष सध्यां फक्त डोक्यापर्यंतच मर्यादित आहे तर ही स्थिति आहे. उद्या तें नसानसांतून पसरलें तर परमेश्वर जाणें काय अनर्थ होणार आहे!

( १० ) ती काय माझ्या घरीं येते? वसलीं वचनें न् काय? आतां बघावें तिच्या न येण्यानें नियति माझ्यासाठीं काय नवीन नवीन संकटें निर्माण करणार आहे.

१९० . . . कभी नेकी भी उसके जीमे गर् आजाये है मुझसे
जफ़ायें करके अपनी याद शरमा जाये है मुझसे ॥ १ ॥
ख़ुदाया जज़्बये दिल्र की मगर् तासीर उल्टी है
के जितना खींचता हू औऱ् खिंचता जाये है मुझसे ॥ २ ॥

२४५ . . . .

वो बदख़ू और् मेरी दास्ताने इश्क़ तूलानी
इबारत् मुख्तसर क़ासिद् भी घबरा जाये है मुझसे ॥ ३ ॥
उधर वो बद्गुमानी है इधर ये नातुवानी है
न पूछा जाये है उससे न बोला जाये है मुझसे ॥ ४ ॥
सम्हलने दे मुझे अय् नाउमीदी क्या क़ियामत् है
के दामाने ख़ियाले यार छूटा जाये है मुझसे ॥ ५ ॥
तकल्लुफ् बरतरफ़ नज़्ज़ारगी मे भी सही लेकिन
वो देखा जाये कब् ये ज़ुल्म् देखा जाये है मुझसे ॥ ६ ॥
हुये हैं पांवही पहले नबर्दे इश्क़मे जख़मी
न भागा जाये है मुझसे न ठहरा जाये है मुझसे ॥ ७ ॥
क़ियामत् है के होवे मुद्दई का हसमफ़्र ग़ालिब्
वो काफ़िर जो ख़ुदाको भी न सोंपा जाये है मुझसे ॥ ८ ॥

( १ ) प्रियेच्या मनांत माझें चांगलें करावें असें आलें तरी आपण पूर्वी केलेल्या छळांची तिला आठवण होऊन, चांगलें करण्यास तिला संकोच वाटतो.

( २ ) माझ्या हृदयींच्या भावनांचें लक्षण सारें उलटें दिसतें. मी भावनांना जितकें जवळ करावें म्हणतो तितक्याच त्या दूर जात आहेत.

( ३ ) प्रिया चिडखोर आणि माझी प्रेमकहाणी दीर्घ. ती तिच्यापर्यंत पोहोंचवूं कशी ह्या कल्पनेनेंच माझा दूत घाबरला आहे.

( ४ ) ती माझ्यासंबंधीं गैरसमज करून बसली आहे. इकडे माझ्यांत बोलण्याची शक्ति नाहीं. ती विचारपूस करीत नाहीं आणि इकडे आम्हांला बोलवत नाहीं.

( ५ ) हे निराशे, आतां हा छळ पुरा कर. बघ तुझ्या आघातामुळें प्रियासंबंधीं विचारही मनांतून हळूहळू नाहींसे होऊं लागले आहेत.

( ६ ) तिच्याकडे पाहात राहणाऱ्यामध्यें मीही आहें. पण खरें पाहिलें तर तिच्याकडे कोणी पाहिलेलें मला खपत नाहीं.

( ७ ) प्रेमाच्या क्षेत्रांत प्रथम माझे पाय कामांतून गेले आहेत. धड पळ तांयेत नाहीं, धड उभे राहतां येत नाहीं, अशी स्थिति झाली आहे.

( ८ ) काय कहर आहे पहा! जिला निरोप देतांना तुला परमेश्वरावर सोंपविली आहे असें मला म्हणवत नाहीं, तिला माझ्या प्रतिस्पर्धीच्या सोबत जातांना पाहणें माझ्या कपाळीं आलें आहे.

१९१ . . . अज़बसके मस्के तमाशा जुनून् अलामत् है
कुशादो बस्ते मिज़ह् सेलीये नदामत है ॥ १ ॥
न जानूं क्यौंकरे मिटे दाग़े ताने बद्अहदी
तुझे के आयीना भी वर मलाये मलामत् है ॥ २ ॥
ब पेचोतावे हवस् सिल्के आफ़ियत् मत् तोड
निगाहे अज्ज़ सररिश्तयें सलामत् है ॥ ३ ॥
वफ़ा मुक़ाबिल व दावये इश्क़ बेबुनियाद्
जुनूने साख़्ता व फ़स्ले गुल्र कियामत् है ॥ ४ ॥

(१) सौंदर्याचें सारखें सारखें निरीक्षण हें वेडाचें लक्षण आहे. सुंदर स्त्रियाच्याकडे पाहताना आपल्या नेत्राची जी उघडझाप होते, त्याचा अर्थ हा कीं पापण्या आपल्याला सारखे टोंचत असतात कीं, सौंदर्याची इतकी आसक्ति बरी नव्हे

(२) तूं वचनें पाळीत नाहींस असा अपवाद तुला कायमचा चिकटला आहे. तो डाग काहीं धुतला जाणार नाहीं आणि तू सौंदर्यप्रसाधना करत आरसा समोर घेऊन बसतेस त्या वेळीं आरसासुद्धा तुला आरोपी समजतो.

(३) आसक्तीच्या मार्गें लागून आपला नाश करून घेऊं नकोस आसक्तीचा त्याग करण्यात सुरक्षितता आहे.

(४) उपरोधानें कवि म्हणतो कीं, तू एकनिष्ठ बनावीस आणि आमचा प्रेमाचा दावा खोटा निघावा हीं मोठींच आश्चर्यें होत जसा वसतऋतु यावा पण प्रेमवेड हें बनावटी असावें असाच हा प्रकार आहे

१९२ . . . लागर् इतना हूं के गर् तू बज्म मे जा दे मुझे
मेरा ज़िम्मा देख के गर् कोयी बतला दे मुझे ॥ १ ॥
क्या ताज्जुब् है के उसको देख़कर् आजाये रहम्
वा तलक् कोयी किसी हीलेसे पोहोंचा दे मुझे ॥ २ ॥
मूंह न दिखलादे न दिखला पर् बअन्दाजे इताब्
खोलकर पर्दा जरा आखेंही दिख़लादे मुझे ॥ ३ ॥
यातलक् मेरी गिरफ़्तारीसे वो ख़ुश है के मैं
ज़ुल्फ गर बन् जावूं तो शाने मे उल्झा दे मुझे ॥ ४ ॥

(१) मी प्रियेच्या विरहात इतका रोड झालों आहें कीं तिच्या बैठकींत तुम्ही मला जाऊं दिलेंत तर तिची नजर कांहीं माझ्यावर पडणार नाहीं, ह्याची मला खात्री आहे

(२) कोणत्या तरी निमित्तानें मला तिच्यापर्यंत पोहोंचवा कसें! कदाचित् माझी स्थिति पाहून तिला माझी दया येण्याचा संभव आहे

(३) तुला आपलें तोंड मला दाखवायचं नाहीं, तर नको दाखवूं, पण वरून पाहाण्याच्या निमित्तानें का होईना तोंडावरचा बुरखा बाजूला सारून डोळे तरी दाखविशील कीं नाहीं ?

(४) मला बंधनात अडकविण्यात तिला मोठा आनंद वाटतो मी जर तिचे अलक बनलों तरी ती मला बांधून मानेवर अडकवून ठवल्याशिवाय राहाणार नाहीं

बाज़ीचये अतफ़ाल है दुनिया मेरे आगे
१९३ . . . होता है शबो रोज़् तमाशा मेरे आगे ॥ १ ॥
इक् खेल है औरंगे सुलेमा मेरे नज़्दीक्
इक बात् हे एजाज़े मसीहा मेरे आगे ॥ २ ॥
जुज़् नाम् नहीं सूरते आलम् मुझे मंज़ूर्
जुज़् वहम् नहीं हस्तीये अशिया मेरे आगे ॥ ३ ॥
होता है निहा गर्दमे सहरा मेरे होते
घिसता है जबीं ख़ाक पे दरिया मेरे आगे ॥ ४ ॥
मत् पूछ् के क्या हाल है मेरा तेरे पीछे
तू देख् के क्या रंग है तेरा मेरे आगे ॥ ५ ॥
सच् कहते हो ख़ुद्बीं व ख़ुद्आरा हू न क्यों हू
बैठा है बुते आयीनासीमा मेरे आगे ॥ ६ ॥
फिर देखिये अंदाज़े गुलफ़्शानीये गुफ़्तार
रखदे कोयी पमाना व सहबा मेरे आगे ॥ ७ ॥
नफ़्रत् का गुमा गुज़रे है मै रश्क से गुज़रा
क्योंकर कहू लो नाम् न उनका मेरे आगे ॥ ८ ॥
ईमा मुझे रोके है तो खींचे है मुझे कुफ़्र
काबा मेरे पीछे है कलीसा मेरे आगे ॥ ९ ॥

आशिक़ हूं पे माशूक़ फरेबी है मेरा काम
मजनूं को बुरा कहती है लैला मेरे आगे ॥ १० ॥

खुश होते हैं पर् वस्ल मे यौं मर् नहीं जाते
आयी शबे हिज्रां की तमन्ना मेरे आगे ॥ ११ ॥

है मौजज़न इक् कुल्ज़ुमे ख़ूं काश् यही हो
आता है अभी देखिये क्या क्या मेरे आगे ॥ १२ ॥

गो हाथ् को जुंबिश् नहीं आंखोमे तो दम है
रहने दो अभी साग़रो मीना मेरे आगे ॥ १३ ॥

हम् पेशा व हम् मश्रब् व हम्राज़ है मेरा
गालिब् को बुरा क्यों कहो अच्छा मेरे आगे ॥ १४ ॥

( १ ) हें जग म्हणजे माझ्या नजरेंत पोरांचा खेळ आहे. दिवस आणि रात्र माझ्यासमोर हा खेळ चालला आहे.

( २ ) सुलेमानचें उडणारें सिंहासन आणि प्रेषिताचे चमत्कार हीं मला क्षिल्लक वाटतात.

( ३ ) ह्या सृष्टीला मी नाममात्र समजतों आणि जडपदार्थांना मी एक भ्रम समजतों. एक परमेश्वर सोडून मी कोणत्याही वस्तूचें अस्तित्व मानण्यास तयार नाहीं.

( ४ ) प्रेमवेडात माझ्या भटकण्यामुळें धूळ उडून वाळवंट दिसेनासें होतें आणि बेफाम अश्रु वाहविण्यामुळें समुद्राला स्वत च्या जलाशयाची लाज वाटूं लागली आहे.

( ५ ) माझ्या मागें तुझें कसें होईल असें काय विचारतेस? तू आतां ज्याप्रमाणें संकोचून आणि शरमून माझ्यासमोर बसली आहेस त्याप्रमाणें मलाही तुझ्या विरहामुळें अस्वस्थ वाटेल.

( ६ ) मी गर्विष्ठ आणि अहंकारी आहें असें तू म्हणतेस. खरें आहे; तुझ्यासारखी सुंदरी माझ्यासमोर असल्यावर मला कां बरें गर्व चढणार नाहीं?

( ७ ) माझ्या समोर कोणी मद्यपान ठेवून द्या. आणि मग पाहा माझ्या वाणींतून वाग्पुष्पें कशीं उधळतात तीं!

( ८ ) माझ्या प्रियेचें नाव दुसऱ्या कोणी उच्चारलें कीं मला मत्सर वाटतो. बरें, नांव उच्चारू नका म्हणण्याची सोय नाहीं. त्यामुळें कुणाला वाटायचें कीं माझें आणि माझ्या प्रियेचें बिनसलें आहे.

२४९ . . . .

(९) धर्म आणि अधर्म ह्यांच्या संघर्षांत मी सापडलों आहें. एकीकडे काबा (मक्का तील पवित्र स्थान) ओढीत आहे तर दुसरीकडे कलीसा (ख्रिस्ती देवळ) मला आपल्याकडे ओढू पाहात आहे.

(१०) मी प्रेमिक आहें. प्रेयसींच्या तावडींत मी जायला हवें होतें. उलट मी प्रेयसींना आपल्या तावडींत झुलत ठेविलें आहे. फार काय लैलासुद्धा मजनूंच्या तुलनेंत मला चांगला समजत आहे.

(११) विरहांत मी प्रार्थना करी कीं हे परमेश्वरा, मला मीलनरात्रींत मरण येऊं दे. काय दुर्दैव! मीलनाच्या रात्रींत नेमकी ती प्रार्थना फळास यावी.

(१२) माझ्या हृदयात रक्ताचें तुफान उसळलें आहे. आतां प्रेमामुळें ह्यापुढे काय होणार आहे पाहिले पाहिजे.

(१३) माझ्या हातात शक्ति नसेल पण डोळ्यात तरी आहे ना? माझ्या समोर मदिरेची सुरई आणि पात्रें अजून थोडा वेळ राहूं द्या.

(१४) गालिब हा सहृदय आणि समव्यवसायी आहे. त्याला वाईट का म्हणतां?

१९४ . . . कहूं जो हाल् तो कहते हो मुद्दुआ कहिये
तुम्हीं कहो के जो तुम् यों कहो तो क्या कहिये ॥ १ ॥
न कहियो तानसे फिर् तुम् के हम् सितमगर् हैं
मुझे तो ख़ है के जो कुछ कहो बजा कहिये ॥ २ ॥
वो नेश्तर सही पर् दिल मे जब उतर् जावे
निगाहे नाज़् को फिर क्यों न आशनाँ कहिये ॥ ३ ॥
नहीं जरीये राहत् जराहते पैकान्
वो जख़्मे तेग़ है जिस्को के दिल्कशा कहिये ॥ ४ ॥
जो मुद्दई बने उसके न मुद्दई बनिये
जो नासज़ा कहे उसको न नासज़ा कहिये ॥ ५ ॥
कहीं हकीकते जान्काहीये मरज़् लिखिये
कहीं मुसीबते नासाज़ीये दवा कहिये ॥ ६ ॥
कभी शिकायते रंजेगिरांनशीं कीजे
कभी हिकायते सब्रे गुरेज़्पा कहिये ॥ ७ ॥

रहे न जान् तो कातिलको खंबहा दीजे
कटे जबान् तो खंजरको मरहबा कहिये ॥ ८ ॥

नहीं निगार् को उल्फत् न हो निगार् तो है
रवानीये रविश् व मस्तीये अदा कहिये ॥ ९ ॥

नहीं बहार को फुर्सत् न हो बहार् तो है
तरावते चमन् व खूबीये हवा कहिये ॥ १० ॥

सफीना जब्के किनारे पे आलगा ग़ालिब्
खुदासे क्या सितम् व जोरे नाखुदा कहिये ॥ ११ ॥

( १ ) माझी स्थिति मी वर्णूं लागलों कीं मुद्दयाची गोष्ट बोला म्हणून तूं म्हणतेस. तूंच असें बोलूं लागलीस तर आम्ही काय म्हणायचें हें तूंच सांग.

( २ ) तुझ्या प्रत्येक गोष्टीला योग्य, ठीक, बरोबर असें म्हणण्याची मला सवय पडली आहे. बघ बरें, मी तुझा छळ करतें असें दुसऱ्यांदा म्हणूं नकोस. नाहींतर बरोबर असे शब्द माझ्या तोंडून निघायचे आणि मग तूंच वरें माझ्यावर चिडशील.

( ३ ) तो शर असला तरी नयनशर आहे. शर कोणालाच आवडत नाहीं पण नयन-शराला हृदयानें धारण केलें, ह्यामुळें नयनशर हृदयाचा आवडता आहे हें सिद्ध होतें.

( ४ ) बाणानें फक्त हृदयांत चीर पडते म्हणून मला आवडत नाहीं. त्या उलट खंजीरीमुळें हृदय फाटतें म्हणून मला बाणापेक्षा खंजीरीचे आघात आवडतात.

( ५ ) शत्रूला शत्रू म्हणूं नका आणि आपल्याशीं वाईट करणाऱ्याचें बरें होवो अशी इच्छा करा.

( ६ ) आमची स्थिति काय वर्णावी ? कधीं आपल्या रोगाचें वर्णन करतो आणि कधीं ह्या रोगावर कोणतेंच औषध कसें लागू पडत नाहीं हें सांगत सुटतो.

( ७ ) कधीं आमच्या आपत्तींची आम्ही कहाणी गातों तर कधीं आमची सहनशक्ति कशी नाहींशी झाली आहे हें सागतों.

( ८ ) तुमच्या शरीरांत प्राण शिल्लक राहिला नाहींतर प्रियेला खूनबहा ( कुणाचा वध केला तर आरोपीनें मेलेल्या माणसाच्या वारसांना द्यायची रक्कम ) द्या. कारण तिला देण्याकरितां तुमच्यापाशीं जीव शिल्लक नाहीं आणि जीभ कापली गेली तर खंजीरीला धन्यवाद द्या.

( ९ ) ती सुंदरी प्रेम करीत नसेल तर काय झालें? तिच्या शरीरसौष्ठवाची आणि चंचल गतीची स्तुति करण्यास काय हरकत आहे ?

(१०) वसतऋतु अल्पायु असेल म्हणून काय झालें? वसतऋतूचा वायू आणि बहरलेली उपवनें ह्याचा आनंद लुटण्यास काय हरकत आहे?

(११) आपली नाव किनाऱ्याला लागली आता नावाड्यानें आम्हाला छळलें म्हणून गाऱ्हाणें गाण्यात अर्थ नाहीं. गत सकटें विसरून जाणें हें बरें!

१९५ . . . रोनेसे और इश्क मे बेबाक होगये
धोये गये हम् ऐसे के बस् पाक होगये ॥ १ ॥
सर्फे बहाये मय् हुये आलाते मय् कशी
थे येही दो हिसाब सो यों पाक होगये ॥ २ ॥
रुसवाये दहर गो हुये आवारगीसे तुम्
बारे तबीयतोंके तो चालाक होगये ॥ ३ ॥
कहता है कौन नालये बुल्बुल् को बे असर्
पर्दे मे गुल् के लाख जिगर् चाक् होगये ॥ ४ ॥
पूछे है क्या वजूद व अदम् अहले शौक का
आप अपनी आग के खसो खाशाक् होगये ॥ ५ ॥
करने गये थे उससे तगाफुल् का हम् गिला
की एकही निगाह के बस् खाक् होगये ॥ ६ ॥
इस् रगसे उठायी कल् उसने असद् की नाश
दुश्मन् भी जिसको देखके ग़मनाक् होगये ॥ ७ ॥

(१) जोंपर्यंत डोळ्यातून अश्रु वाहात नव्हते तोंपर्यंत आमच्या प्रेमरहस्याचा स्फोट होऊं नये म्हणून काळजी घेत होतों पण एकदा अश्रु वाहूं लागल्यानंतर कोणत्याच प्रकारचा सकोच राहिला नाहीं आणि आम्ही स्वैर आणि स्वच्छंदपणें वागूं लागलों

(२) दारू पिण्यात दारू गाळण्याचीं साधनें आम्ही विकून टाकिलीं. आता तीं बाळगण्याची भानगड मिटली

(३) तुझ्या स्वच्छंदी वागणुकीनें तुझा दुर्लौकिक झाला, पण त्याबरोबर तूं चतुर आणि धीट बनलीस हा लाभ पण झाला

(४) बुलबुलच्या आक्रंदनाना निष्फळ कोण म्हणेल! त्या फुलाकडे पाहा. त्याच्या पाकळ्याचे (काळजाचे) कसे असख्य तुकडे पडले आहेत!

(५) प्रेमिकांची हालहवाल काय विचारतोस ? ते आपल्याच प्रेमाग्नींत फेरकचऱ्याप्रमाणें जळून भस्म झाले आहेत.

(६) तिच्या उपेक्षेचें गाऱ्हाणें सांगण्यास आम्ही तिच्याकडे गेलों पण तिनें एका दृष्टिक्षेपानें आम्हांला भस्म करून टाकलें.

(७) तिनें काल असद् (कवि) चें प्रेत अशा पद्धतीनें उचललें कीं तें पाहून प्रतिस्पर्ध्यांनाही दुःख वाटलें.

१९६ . . . नशाहा शादाबे रंगो साज़्हा मस्ते तरब्
शीशये मय् सर्वे सब्ज़े जोय्बारे नग़मा है ॥ १ ॥
हम्नशीं मत् कह के बरहम् कर् न बज़्मे ऐशे दोस्त
वां तो मेरे नाले को भी एतिबारे नग़मा है ॥ २ ॥

(१) मैफिल ऐन रंगांत आली आहे. संगीताचा दर्या वाहू लागला आहे आणि हिरव्या मधु पात्रांमुळें मैफिलींत उपवनांतील सुरूचीं झाडें डुलत असल्याचा भास होत आहे.

(२) हे मित्रा, माझ्या निःश्वासांनीं आणि आक्रंदनांनीं मैफिलीचा रंग मी बिघडवूं नये असें म्हणूं नकोस. अरे, तेथें पोहोंचून माझी दुःखद आक्रंदनें मधुर गीतें बनतात.

१९७ . . . अर्ज़े नाज़े श़ूखिये दंदां बराये ख़ंदा है
दावये जमीयते अहबाब् जाये ख़ंदा है ॥ १ ॥
है अदम् मे ग़ुंचा महवे हैरते अंजामे गुल्
यक जहां ज़ानूये ताम्मुल दर् कफाये ख़ंदा है ॥ २ ॥
कुल्फते अफ्सुर्दगीको ऐशे बेताबी हराम्
वर्ना दंदां दरदिलअफ्शुर्दन् बिनाये ख़ंदा है ॥ ३ ॥
सोज़िशे बातिन् के हैं अहबाब मुन्किर् वर्ना यां
दिल मुहीते गिरिया व लब् आशनाये ख़ंदा है ॥ ४ ॥

(१) स्मिताच्या द्वारे दंतपंक्तींना आपलें सौंदर्य दाखविण्याम संधि मिळते. पण हे दांत तरी दीर्घकाळपर्यंत एकत्र कुठें टिकून राहातात.

(२) कळी उमलली आणि तिचें फूल बनलें म्हणजे कळी नाहींशी झाली आणि फुलानें तिची जागा घेतली. आपला असा शेवट झाल्याबद्दल कळीला विस्मय आणि चिंता वाटत आहे.

(३) उदासपणात तळमळीचा अनुभव कोठें ? तशी तळमळ असती तर आम्हीं तिच्या आत्यंतिकतेनें आमचीं हृदयें दातांनीं कडकडा चावलीं नसतीं का ?

(४) हृदयात दडवून ठेवलेलें दुःख माझ्या मित्राना आवडत नाहीं म्हणून मी हृदयात अपार दुःख साठवून ठेवलें आहे आणि ओंगावर हसू असल्यासारखें दाखवीत आहे

१९८ . . . हुस्ने बेपर्वा खरीदारे मताये जल्वा है
आयीना जानूये फ़िक्रे इस्तिराए जल्वा है ॥ १ ॥
ता कुजा अय् आगही रंगे तमाशा बाख़्तन्
चश्मे वा गर्दीदा आगोशे विदाये जल्वा है ॥ २ ॥

(१) सौंदर्याचा स्वभावच असा आहे कीं त्यानं इतराची उपेक्षा करावी पण नवनव्या प्रकारानें आविष्कार व्हावा ह्याची सौंदर्याला मोठी हौस म्हणून सुंदर स्त्रिया आरशात आपलें रूप न्याहाळण्यात सदा गुतलेल्या असतात

(२) हे प्रतिभे, तू कितीकाळ हा सृष्टीचा चमत्कार अनिमिष डोळ्यानीं पाहते आहेस ! हें सारें क्षणभंगुर आहे आणि डोळ्यासमोरून सरकत आहे म्हणजे तुझें पाहाणें आणि सृष्टीला निरोप देणें ही एकदमच घडत आहेत

१९९ . . . जब् तक् दहाने ज़ख़्म न पैदा करे कोयी
मुश्किल के तुझसे राहे सुख़न् वा करे कोयी ॥ १ ॥
आलम गुबारे वहशते मजनूं है सरबसर्
कबतक् ख़ियाले तुर्रये लैला करे कोयी ॥ २ ॥
अफ़्सुर्दगी नहीं तरब्अफ़्राये इल्तिफात्
हा दरद् बनके दिल्में मगर् जा करे कोयी ॥ ३ ॥
रोने से अय् नदीम् मलामत् न कर् मुझे
आख़िर् कभी तो उक़्दये दिल वा करे कोयी ॥ ४ ॥
चाके जिगर्से जब् रहे पुर्सिश् न वा हुयी
क्या फायदा के ज़ैब को रुस्वा करे कोयी ॥ ५ ॥
लख़्ते जिगर् से है रगे हर ख़ार् शाखे गुल्
ता चंद् बागबानीये सहरा करे कोयी ॥ ६ ॥

नाकामीये निगाह् है बर्के नज़्ज़ारासोज़्
तू वो नहीं के तुझको तमाशा करे कोयी ॥ ७ ॥

हर म्गो ख़िस्त है सद्फे गोहर शिकेर
नुक़्सा नहीं जुनूसे जो सौदा करे कोयी ॥ ८ ॥

सरवर् हुयी न वादये सब्रआज़्मा से उम्
फुर्मत् कहा के तेरी तमन्ना करे कोयी ॥ ९ ॥

है वहशते तबीयते ईजाद् यासख़ेज़
ये दर्द वो नहीं है के पैदा करे कोगी ॥ १० ॥

बेकारीये जुनू को है सर् पीटनेका शग़ल
जन् हाथ टूट् जायें तो क्या करे कोयी ॥ ११ ॥

हुस्ने फरोगे शम्मेये सुख़न् दूर है असद्
पहले दिले गुदास्ता पैदा करे कोयी ॥ १२ ॥

( १ ) हे परमेश्वरा, तुझ्याशीं सभापण करण्यास ही जीभ आणि हें तोंड उपयोगाचीं नाहींत त्याग व्यथा आणि तळमळीच तोंड उघड झालें पाहिजे

( २ ) हें जग म्हणजे मजनूंच्या वेडाची धूळ आहे ह्याला लैलाचा आकर्षक गिरपेंच असें कोण किती काळपर्यंत समजणार ! कवीचा सङ्केत असा कीं हें जग म्हणजे माया आणि भ्रम आहे हें आकर्षक आणि मनोहर आहे असा भ्रम किती काळ टिकणार आहे ?

( ३ ) उदास बनल्यान प्रेयसींच्या मनात काय परिणाम होणार ! अतर्बाह्य व्यथा आणि तळमळ दाखविल्यानें तिच्या हृदयात जागा मिळण्याची शक्यता आहे

( ४ ) मला मोकळेपणानें रुदन करू दे वर अरे, माणसान शेवटीं किती दिवस कुढत राहायचें ?

( ५ ) आमच हृदय उघडें करून दाखविल्यानें तिच्या मनावर काहीं परिणाम झाला नाहीं आता वेडाच्या भरात कपडे फाडल्यानें काय होणार आहे ?

( ६ ) माझ्या काळजाचे तुकडे वनातील काट्याकाट्यावर विखुरले आहेत म्हणून काटे रंगीबेरंगी फुलासारखे दिसत असून त्यामुळें वनाला विलक्षण शोभा आली आहे

( ७ ) परमेश्वरा, तुला कोण पाहू शकेल कोणीं प्रयत्न केलाच तर त्याची दृष्टि वीज पडल्यासारखें होऊन भस्म होऊन जाइल

(८) वेडाशीं सौदा काहीं महाग पडणार नाहीं कारण वेड लागल्यावर मुलं मागें लागून दगड फेंकतात ते दगड नव्हेत। आत तत्त्वाच मोती धारण करणाऱ्या शिंपल्या होत

(९) तुम्हीं वचनं सहनशक्तीची सीमा पाहतात येण्याचं वचन देऊन तूं आली नाहींस आणि तळमळींत आमचा अन्त झाला

(१०) प्रेमाची व्यथा निर्माण करू म्हटल्यानें निर्माण होऊं शकत नाहीं आणि असा कोणी प्रयत्न केल्यास त्याच्या पदरीं निराशा येते

(११) वेडात माणसें आपले कपडे फाडतात कपडे फाटून झाल्यावर डोक्यावर हात आपटून घेतात, पण आपटून आपटून हात नाहींसे झाले तर काय करावं! कारण वेड्याना गप्प बसवत नाहीं

(१२) काव्याची ज्योत उजळणें कठीण आहे त्याला प्रथम हृदयाची तळमळ आणि व्यथा संपादली पाहिजेत त्याशिवाय काव्यदीपाला सौंदर्याचा साज चढत नाहीं

२०० . . . इब्ने मरियम् हुव करे कोयी
मेरे दुख की दवा करे कोयी ॥ १ ॥

✓शरा व आइन् पर् मदार् सही
ऐसे कातिल् का क्या करे कोयी ॥ २ ॥

चाल जैसे कडी कमान् का तीर्
दिल् मे ऐसे के जा करे कोयी ॥ ३ ॥

बात पर् वा जबान् कटती है
वो कह और् सुना करे कोयी ॥ ४ ॥

बक् रहा हू जुनून् मे क्या क्या कुछ
कुछ न समझे खुदा करे कोयी ॥ ५ ॥

न सुनो गर् बुरा कहे कोयी
न कहो गर् बुरा कहे कोयी ॥ ६ ॥

रोकलो गर गलत् चले कोयी
बख्श दो गर् खता करे कोयी ॥ ७ ॥

कौन् है जो नहीं है हाजत्मन्द
किस् की हाजत् रवा करे कोयी ॥ ८ ॥

क्या किया खिज़्र ने सिकंदर् से
अब् किसे रहनुमा करे कोयी ॥ ९ ॥
जब् तवक़्क़ोही उठ् गयी ग़ालिब्
क्यों किसी का गिला करे कोयी ॥ १० ॥

( १ ) कोणी येशु ख्रिस्त मृतांना जिवंत आणि पीडितांना बरे करणारा असेल, मला काय त्याचे. माझा रोग कोणी बरा करील, तर मी खरें म्हणेन.

( २ ) जग कायदेकानूप्रमाणें चाललें आहे. वध करणाऱ्यांना कायद्याप्रमाणें शिक्षा होते पण शिरच्छेद न करतां प्राण हरणाऱ्या प्रेयसींना कोण काय शिक्षा करणार !

( ३ ) तिचे चालणें पाहून हृदयांतून बाण आरपार गेल्यासारखें वाटतें. तिच्या हृदयांत स्थान कसें मिळावें ?

( ४ ) तिच्या समोर शब्द काढला कीं जीभ छाटली जाते. ह्याचा अर्थच असा कीं तिनें हवें तें बोलावें आणि आम्हीं ऐकून घ्यावें.

( ५ ) वेडाच्या भरात मी काय काय बडबडतों कुणास ठाऊक. देव करो आणि माझी बडबड कुणाला न समजो.

( ६ ) तुम्हांला कोणीं वाईट म्हटलें तर ऐकून न ऐकल्यासारखें करा आणि कोणीं तुमचें वाईट केलें तर तिकडे दुर्लक्ष करा.

( ७ ) कोणी रस्ता भटकत असेल तर त्याला थांबवा. कोणीं चूक केली असेल तर त्याला क्षमा करा.

( ८ ) तुमची अडचण कोणीं दूर केली नाहीं तर त्यावर रागावूं नका कारण ज्याला अडचण नाहीं असा जगांत कोण आहे ?

( ९ ) खिजर ( स्वर्गाचा वाटाड्या ) नें सिकंदरला अमृताजवळ नेलें पण सिकंदरला अमृत लाभलें नाहीं. जर खिजर सिकंदरला अमृताचा लाभ करून देण्यास असमर्थ ठरला तर मार्गदर्शक म्हणून कुणाला पत्करायचें ?

( १० ) गालिब, आतां ज्या अर्थी आशा नावालाही शिल्लक राहिली नाहीं तर आतां कुणाच्या नांवानें बसलें गाऱ्हाणें करायचें ?

२०१ . . . वहोत् हे ग़मे गीती शराब कम् क्या है
ग़ुलामे साक़ीये कौसर हूं मुझ्को ग़म् क्या है ॥ १ ॥
तुम्हारी तर्ज़े रविश् जान्ते हैं हम क्या है
रक़ीब् पर है अगर लुत्फ़ तो सितम् क्या है ॥ २ ॥
सुख़न् मे ख़ामये ग़ालिब् की आतिश् अफ़्शानी
यक़ीन हैं हम्को भी लेकिन् अब् इसमे दम् क्या है ॥ ३ ॥

२५७ . . . .

(१) जीवन शोकमय आहे हें खरें पण मला ह्या तिलत्री कृपेची मदिरा पाजणारे हजरत अली ह्याचा मी दास आहें मला कशाची वाण आहे ?

(२) तुला मी पूर्ण ओळखून आहें तुझ्यावर मी जुलूम करीत नाहीं असें तू म्हणतेस पण प्रतिस्पर्ध्यांवर तुझी कृपा म्हणजे आमचा छळ नाहीं तर काय आहे !

(३) गालिबचीं काव्यें म्हणजे स्फुर्तिचें होतीं पण आता त्याच्यात जीव राहिला नाहीं

२०२ . . . बाग पाकर खफ़क़ानी ये डराता है मुझे
साययेशाखे गुल अफ़ई नज़र आता है मुझे ॥ १ ॥
जाहरे तेग़ बसरचश्मये दीगर् मालूम्
हू वो सब्ज़ा के जहराब उगाता है मुझे ॥ २ ॥
मुद्दुआ महवे तमाशाये शिकस्ते दिल ह
आयीनाख़ानेमे कोयी लिये जाता है मुझे ॥ ३ ॥
नाला सरमाये यक़ आल्म् व आलम् कफ़े खाक़
आसमा बेज़ये कुमूरी नज़र आता है मुझे ॥ ४ ॥
ज़िंदगी मे तो वो महफ़िल से उठा देते थे
देखू अब् मर् गये पर कोन् उठाता है मुझे ॥ ५ ॥

(१) मला दुबळ हृदयाचा समजून उपवन मला प्रत्येक वेळेस घाबरवीत असतें बागेंतील फुलफांद्याच्या सावलीत निळा साप समजून मी घाबरून जाता

(२) तलवारीच्या पात्यावर जी हिरवी छटा दिसते ती रसायन मिसळलेल्या पाण्यात तलवार बुडविल्यान निर्माण होते माझे जीवन सुद्धा शोकरसायन मिसळलेल्या पाण्यात बुडविल्यामुळें विशिष्ट प्रकारानें बहरलं आहे

(३) ध्येयपूर्ति न झाल्यामुळें माझ्या हृदयरूपी आरशाचे शेंकडो तुकडे उडाले आहेत आणि माझ्या अतृप्त आकांक्षा ह्या तुकड्यांकडे स्तिमित होऊन पाहात आहेत

(४) ह जग मला तुच्छ वाटतें हें जग आहे काय ? एक शोकगीताच भांडवल आणि मूठभर धूळ आकाश म्हणजे धुळीच्या रंगाचा आक्रंदन करणारा बुलबुल पक्षी आहे

(५) मी जीवंत असताना ती मला आपल्या मैफिलींतून उठवून लावीत असे आता बघावें, मी मेल्यावर माझें प्रेत कोण उचलील तें

२०३ . . . रौंदी हुयी है कौकबये शहरयार्की
इत्राये क्यों न खाक् सरे रहगुज़ार् की ॥ १ ॥

जब् उस्के देखने के लिये आयें बादशाह्
लोगोंमे क्यौं नमूद् न हो लालाज़ार् की ॥ २ ॥
भूके नहीं है सैरे गुलिस्तांके के हम् थ ले
क्योंकर् न खाइये के हवा है बहार् की ॥ ३ ॥

( १ ) बादशहाच्या स्वारानीं उडविली म्हणून रस्त्यावरची धूळ गर्व करीत आहे.

( २ ) ज्या उपवनाला बादशहा भेट देतात त्या उपवनाची प्रसिद्धि जनतेंत झाल्याशिवाय कशी राहील.

( ३ ) उपवनाची सहल करण्याची आम्हाला हौस नाहीं पण वायूची विलक्षण मादकता आम्हांला तिकडे ओढून नेत आहे.

२०४ . . . हजारों ख़ाहिशें ऐसी के हर ख़ाहिशपे दम् निकले
बहोत् निकले मेरे अरमान् लेकिन् फिरभी कम् निकले ॥ १ ॥
डरे क्यौं मेरा कातिल क्या रहेगा उसकी गर्दन् पर्
वो खूं जो चश्मेतर्से उम्रभर् यौं दमबदम् निकले ॥ २ ॥
निकलना खुल्द से आदम् का सुनते आये हैं लेकिन्
बहोत् बेआबरू होकर् तेरे कूचेसे हम् निकले ॥ ३ ॥
भरम् खुल जाये जालिम् तेरे कामत् की दराज़ी का
अगर् इस् तुर्रये पुरपेचोख़मका पेचोख़म् निकले ॥ ४ ॥
मगर् लिखवाये कोयी उसको ख़त् तो हम् से लिखवाये
हुयी सुबह और् घर्से कान् पर् रखकर् कलम् निकले ॥ ५ ॥
हुयी इस् दौर् मे मन्सूब् मुझसे बादा आशामी
फिर आया वो ज़माना जो जहा मे जामे जम् निकले ॥ ६ ॥
हुयी जिन्से तवक्को खस्तगीके दाद् पानेकी
वो हमसे भी ज़ियादा खस्तये तेग़े सितम् निकले ॥ ७ ॥
मोहब्बत मे नहीं है फर्क जीने और् मरने का
उसीको देखकर् जीते हैं जिस् काफिर् पे दम् निकले ॥ ८ ॥
कहां मयख़ाने का दरवाज़ा ग़ालिब और कहां वाइज़्
पर् इतना जानते हैं कल वो जाता था के हम् निकले ॥ ९ ॥

(१) मला हजारों इच्छा आहेत त्या इतक्या उत्कट आणि तीव्र आहेत की प्रत्येक इच्छेवर जणु जीव चालला आहे असें वाटते काहीं इच्छा तृप्त झाल्या तरी त्या अत्यल्पच होत्या अतृप्त इच्छा पुष्कळच राहिल्या

(२) माझा वध करणाऱ्याला विनाकारण भीति वाटते कीं माझें रक्त त्याला चिरडून राहील माझ्या डोळ्यातून रक्ताच्या धारा सारख्या वाहात आहेत त्या वधकाच्या अंगावर चिरडून कशा राहातील

(३) आदि मानव स्वर्गांतून भ्रष्ट आणि अवमानित होऊन पतित झाल्याची दंतकथा आम्ही ऐकत आलों, पण प्रिये, तुझ्या बैठकीतून जेव्हा आम्ही अवमानित होऊन बाहेर फेकले गेलों तेव्हा आम्हाला त्या कथेची सत्यता जाणवली

(४) हे प्रिये, तुझा बांधा उंच असल्याचा भास होतो पण तुझ्या डोक्यावरील शिरपेंच आणि तुऱ्याचा अदाज लागला कीं तुझ्या उंचीचा भ्रम नाहींसा होईल

(५) प्रियेशीं बरेच प्रेमिक पत्रव्यवहार करीत असतील ह्या शंकेने कवि म्हणतो कीं मी लेखनाचा धंदा पत्करला आहे म्हणजे लोक माझ्याकडून पत्रें लिहिवितील आणि ह्या निमित्तान ते काय मजकूर सांगूं इच्छितात मला कळून येईल माझ्याकडून तुमचीं पत्रें लिहिवलीं जावीं म्हणून मी कानाला लेखणी लावून दिवसभर शहरातून फिरत आहे असें कवि म्हणतो

(६) जमशीदचे मदिरापान प्रसिद्ध होतें आता जमशीद किंवा त्याचे मदिरापात्रही राहिलें नाहीं पण माझ्या मदिरापानामुळें जमशीद आणि त्याच्या मधुपात्राची लोकांना पुन्हा आठवण होऊं लागली आहे

(७) आम्ही पीडित म्हणून ज्याच्यापाशीं दाद मागण्यास गेलों ते आपल्यापेक्षाही अधिक पीडित निघाले

(८) प्रेमात जीवनमरणातील भेद नाहींसा होतो जिच्याकरिता आमचा जीव चालला आहे तिच्याकडे पाहून आम्ही जगत आहोत

(९) मदिरालय कोठे आणि कोठे कट्टर धर्मप्रचारक पण कालची मौज पाहा आम्ही मदिरालयातून बाहेर पडत होतों तों आम्हाला जाहिद (मौलवी) आत प्रवेश करताना दिसला

२०५ . . . कोहके हों बारे ख़ातिर् गर् सदा हो जाइये
वे तकल्लुफ अये शरारे जस्ता क्या हो जाइये ॥ १ ॥
बेज़ा आसा नगे बाल्ोपर है ये कुंजे कफम्
अज़् सरे ना ज़िंदगी हो गर् रिहा हो जाइये ॥ २ ॥

(१) हे ठिणग्यानो, आमचीं आक्रंदनें पर्वतावर आदळून परत येतात म्हणजे तीं पर्वताना नकोशीं झालीं आहेत मग आम्हीं काय करावं कवीचा आशय असा कीं आपण ठिणगी बनावे म्हणजे क्षणभर का होईना मुक्तपणानें जळून नष्ट होता येईल

(२) माझं कारागार म्हणजे अब्यासारखें संकुचित आहे अब्यातून बाहेर पडल्या वर पक्षी जसे मोकळेपणान हिंडूं लागतात तसे ह्या कारागारातून बाहेर पडलों कीं मला नवजीवन लाभेल

मस्ती बज़ोंके गफ़्लते साक़ी हलाक है
२०६ . . . मौजे शराब् यक् मिज़हे ख़ाब्नाक् है ॥ १ ॥
जुज़ ज़ख़्मे तेग़े नाज़ नहीं दिल्‌ मे आरज़ू
जेबे ख़ियाल्‌ भी तेरे हातोंसे चाक है ॥ २ ॥
जोशे जुनूंसे कुछ् नज़र् आता नहीं असद्
सहरा हमारी आख मे यक मुश्ते ख़ाक है ॥ ३ ॥

(१) साकी (प्रिया) ची उपेक्षा आणि दुर्लक्ष करण्याचा आकर्षक ढंग काय वर्णावी? तिच्यापुढं मदिरेची खुमारी म्हणजे काहीं नाहीं उलट ही लाल मदिरा पाहिली तर असें वाटतें कीं मधुपात्राच रक्ताळलेले डोळे म्हणजेच ही मदिरा होय

(२) माझें हृदय तुझ्या नाजनखऱ्याच्या खंजिरीनं विद्ध आहे आता त्यात कोणताही भाव शिल्लक राहाण्यास जागा नाहीं

(३) वेडाच्या आत्यंतिकतत आम्हाला आता काहीं दिसेनासें झालें आहे एवढं विशाल वाळवंट समोर पसरलं आहे पण आमच्या नजरेंत तें मूठभर धुळीहून अधिक वाटत नाहीं

लबे ईसा की जुंबिश् करती है गहवारा जुनानी
२०७ . . . क़ियामत्‌कुश्तये लाले बुताना ख़ाब सगीं है ॥ १ ॥

(१) मृताना आपल्या मंत्रोच्चारानं येशूख्रिस्त जिवंत करी असें म्हणतात. पण सुंदरीच्या ओठानीं हत झालेल्यावर ह्या मंत्राचा प्रभाव चालत नाहीं उलट त्याची निद्रा अधिक दीर्घ होण्याची शक्यता मात्र आहे

आमदे सैलाब् तूफ़ाने सदाये आब है
२०८ . . . नक्शेपा जो कान मे रखता है उंगली जादा है ॥ १ ॥
बज़्मे मय् वहशत्‌कदा है किसूकी चश्मे मस्त का
शीशे मे नब्जे परी पिनहा है मौजे बादा से ॥ २ ॥
हू मै भी तमाशाईये नेरंगे तमन्ना
मतलब् नहीं कुछ् इससे के मतलब् ही बर् आये ॥ १ ॥

सियाही जैसे गिरजाये दमे तहरीर् कागज़ पर्
मेरी क़िस्मत् मे यों तस्वीर् है शबूहाये हिजा की ॥ २ ॥

( १ ) पदचिन्हाना कान आणि घाटेला बोटाची उपमा देण्यात आली आहे कवि म्हणतो समुद्रावर तुफान वादळाचा ध्वनि ऐकू येऊं लागला आहे तो कानीं पडून भीति वाटू नये म्हणून पदचिन्हानीं धाटेचीं बोटें आपल्या कानात घातलीं आहेत भीति ह्या गोष्टीची की समुद्राच्या तुफानात पदचिन्हें नाहींशी व्हावयाची

( २ ) कोणाच्या मादक डोळ्यामुळें मदिरेच्या मैफिलीत खळबळ उडाली आहे वरें मदिरेच्या पात्रात ती लाल वारुणीरुपी अप्सरामुद्धा रुसून बसली आहे

( १ ) आमक्षा वाळगण्यात त्या पूर्ण व्हाव्या हा हेतु नाहीं तर त्या आशाक्षाचा काय शेवट होतो आणि कसा होतो ह्याचा तमाशा पाहाणें हा हेतु आहे

( २ ) लिहिता लिहिता कागदावर काळी शाई सांडावी तसें माझ्या नशिबावर विरहाची काळी रात्र पसरली आहे

२०९ . . . हुज्मे नाल्ये हैरत् आजिज़ अरज् यक् अफगा है
खमूशी रेशये सद् नेस्तासे खस् बददा है ॥ १ ॥
तमाटुफ् बरतरफ है जासितातर् लुत्फे वदखूया
निगाहे वेहिजाबे नाज़ तेगे तेज उरिया है ॥ २ ॥
हुयी ये कसरते गमसे तलफ् कैफियते शादी
के सुबहे ईद् मुझको बद्तर् अज़् चाके गरेबा है ॥ ३ ॥
दिल् व दीन् नकद ला साकीसे गर् सौदा किया चाहे
के इस् बाजारमे सागर् मताये दस्तगरदा है ॥ ४ ॥
गम् आगोशे बला मे परवरिश् देता है आशिक् को
चिरागे रोशन् अपना कल्ज़मे सरसर् का मरजा है ॥ ५ ॥

( १ ) माझीं आक्रंदनें बाहेर पडूं इच्छितात पण सुन्न आणि स्तिमित होऊन बाहेर पडत नाहींत

( २ ) तिने आपले नयनशर सहज फेकले तरी आमचा वध होतो आणि आता ती हेतुपुरस्सर आणि उघडउघड आमच्याकडे कटाक्ष फेंकते आहे मग आमची काय दशा होईल ह्याची कल्पनाच केलेली बरी

( ३ ) माझा शोक इतका अपार आहे कीं आनंदाच्या सणाची प्रभात मला वेडाच्या भरात कपडे फाडण्यास लावील इतकी शोकमय वाटते

(४) तुला दारू हवी असेल तर हृदय आणि धर्म आधीं गहाण टाक कारण ह्या मैफिलींत उधारी चालत नाही.

(५) प्रेमिकाचें सगळें आयुष्य दुःख आणि संकटांत जातें. प्रेमिकाची प्रेमज्योत संकटाच्या तुफान वादळांतच वाढीला लागते. मरजान ह्या प्राणी समुद्राच्या तुफानांतही तग धरून राहातो त्याप्रमाणें आहे.

२१० ... खुशियों मे तमाशा अदा निकल्ती है
निगाहे दिल्से तेरी सुर्मा सा निकल्ती है ॥ १ ॥
फिशारे तंगीये खिल्वत् से बनती है शबनम्
सबा जो गुंचे के परदे मे जा निकल्ती है ॥ २ ॥
न पूछ सीनये आशिक्से आबे तेग़े निगाह्
के जख्म रौज़ने दर्से हवा निकल्ती है ॥ ३ ॥

(१) तुझी दृष्टि स्तब्ध आहे. ज्यामुळें आवाज बसनो असा सुर्मा हृदयांत भरला आहे म्हणून की काय तुझी दृष्टि बोलत नाहीं.

(२) प्रभातकालीन वायूची लहर गुलाबाच्या पाकळ्यांत प्रवेश करती झाली. गुलाबानें तिच्याशीं एकांत साधला, लहरीचें लाजेमुळें पाणी पाणी झालें आणि लोक त्यालाच दवबिंदु म्हणतात.

(३) प्रियेच्या नयनशरानें प्रेमिकाच्या हृदयाला किती जखम होते हें काय विचारतोस? अरे, दरवाजांना मोठीं भोकें पडून त्यांतून वारा येतो आहे ना. तीं भोकें प्रिया दरवाजांतून पाहात होती तेव्हां तिच्या कटाक्षामुळें पडलेलीं आहेत.

२११ ... जिस् जा नसीम् शानाकशे जुल्फे यार् है
नाफ़ा दिमाग़े आहूये दश्ते तितार है ॥ १ ॥
किस्का सुराग़े जल्वा है हैरत् को अय् खुदा
आयीना फर्शे शशजिहते इंतिज़ार् है ॥ २ ॥
है ज़र्रा ज़र्रा तंगीये जाये ग़ुबारे शौक़्
गर् दाम् ये है वसअते सहरा शिकार् है ॥ ३ ॥
दिल् मुद्दई व दीदा बना मुद्दआले
नज़्ज़ारे का मुकद्दमा फिर् रूबकार् है ॥ ४ ॥
छिड़्के है शबनम् आयीनये बर्गे गुल पर् आब
अये अंदलीब् वक्ते विदाए बहार् है ॥ ५ ॥

पेच आपडी है वादये दिल्दार् की मुझे
वो आये या न आये पे या इतिज़ार् है ॥ ६ ॥
वे पर्दा सूए वादीये मज्नूं गुज़र् न कर्
हर् ज़रें के नक़ाब् मे दिले बेक़रार् है ॥ ७ ॥
अय् अदर्लीब् यक् कफे ख़स् बहरे आशिया
तूफ़ाने आमद् आमदे फस्ले बहार् है ॥ ८ ॥
दिल मत् गवा खबर् न सही सैर् ही सही
अय् बेदिमाग आयीनये तिमसाल्दार है ॥ ९ ॥
गफ़लत् कफ़ीले उम्र व असद् ज़ामिने निशात्
अय् मर्गे नागहा तुझे क्या इंतिज़ार् है ॥ १० ॥

(१) वारा सुंदरीच्या सुगंधित केशकलापाशीं खेळतो केसांचा सुगंध त्यावर पसरत जाऊन कस्तुरीमृगाच्या डोक्यात शिरून मृगाच्या डोक्याला सुगंधी करतो जणू कुणाला वाटावे की नाभीप्रमाणें मृगाच्या डोक्यानही कस्तुरी साठविली आहे

(२) कुणाच सादर्य पाहाव आणि चहूंकडून पाहाव म्हणून मनान निरमयाच आरसे चोहोंकडे लावून ठेवले आहेत वरे

(३) माझ्या आसक्तींचा प्रतिकूल परिस्थितीमुळें चक्काचूर झाला त्याची धूळ वहून मह प्रदेश व्यापून आहे.

(४) हृदयात डोळ्यावर खटला भरला आहे डोळ्यांनी नेमकेच सौंदर्य पाहिलें आणि त्यामुळें हृदयातील रक्त वाहूं लागल म्हणून हा खटला आहे

(५) ईराणमध्ये कुणाला निरोप धावयाचा असला तर त्याच्या पाठीवर आरसा धरून त्या आरशावर पाणी शिंपडतात त्याच म्हणतो दंवबिंदू फुलांवर पडतात ते आरशावरील पाणी होय आणि वसन्तऋतूला निरोप देण्याची वेळ आली असे ते दंवबिंदू कोकिळेला सुचवितात

(६) प्रियेनें येण्याच वचन दिल आहे त्यामुळें पेंच पडला आहे, कारण ती येवो अथवा न येवो मला तर तिची प्रतीक्षा करणें भाग आहे

(७) अगे लैला, बेपडदा होऊन तू मजनूंच्या वनात जाऊं नकोस कारण तेथील कणाकणातून मजनूंच तळमळणारे हृदय दडल आहे

(८) हे कोकिळे, घरटं बांधण्यास वाळलेलं तृण झाडून गोळा कर त्या वगैं तो चघ वसन्तऋतु येऊं पाहात आहे मग तुला वाळलेलं गवत मिळायच नाहीं

(९) हे हृदया, तुला परमेश्वराचा साक्षात्कार होत नसेल तर हरकत नाहीं सुंदराना तरी साक्षात्कार होऊ द

(१०) ऐषआरामांत काळ कैफगान्यांना अचानक मृत्यु येतो असा संकेत आहे. कवि म्हणतो की हे मृत्यो, आम्ही ऐषआरामांत आणि तुला विसरून जीवन कंठीत आहोंत. मग तूं अचानकपणें येत कां नाहींस.

२१२ ... आयीना क्यौं न दूं के तमाशा कहें जिसे
ऐसा कहांसे लावूं के तुझसा कहें जिसे ॥ १ ॥
हस्रत्ने लाखा तेरी बज़्मे ख़ियाल मे
गुल्दस्तये निगाहे सुवेदा कहें जिसे ॥ २ ॥
फूंका है किस्ने गोशे मोहोब्बत् मे अय् ख़ुदा
अफ़्सूने इंतिज़ार् तमन्ना कहें जिसे ॥ ३ ॥
सरपर् हुजूमे दर्दे ग़रीबीसे डालिये
वो एक् मुश्ते खाक् के सहरा कहें जिसे ॥ ४ ॥
है चश्मे तर् मे हस्रते दीदार्से निहां
शौके इनान् गुसेख़्ता दरिया कहें जिसे ॥ ५ ॥
दरकार् हे शिगिफ्तने गुल्हाये ऐश् को
सुबहे बहार् पम्बये मीना कहें जिसे ॥ ६ ॥
ग़ालिब बुरा न मान् जो वाइज़ बुरा कहे
ऐसा भी कोयी है के सब् अच्छा कहें जिसे ॥ ७ ॥

(१) तुझ्यासारखी सुंदर स्त्री कोठून आणूं, थाव, तुला आरसा आणून देतों म्हणजे तूं आपलें रूप न्याहाळशील आणि तुझा विस्मय पाहून माझी करमणूक होईल.

(२) माझ्या हुरहुरीनें हृदयांत तुझे कटाक्ष आणून ठेविले आहेत आणि ते हृदयाचे मर्मस्थळ बनले आहेत.

(३) हे परमेश्वरा, प्रेमाच्या कानांत कुणी वरें प्रियेसाठीं लागणाऱ्या तळमळीचा मंत्र फुंकला आहे?

(४) परदेशांत संकटामुळें डोक्यांत माती घालावी असें वाटतें. ती थोडी थोडकी नसून लोकाना वाटावें कीं सगळें वाळवंट जणूं मी डोक्यावर घेत आहें.

(५) प्रियेला पाहाणाऱ्या तळमळीमुळें माझ्या डोळ्यांत इतके अश्रु येऊन थबकले आहेत कीं त्यांना समुद्राचीच उपमा साजेल.

(६) सकाळच्या कापसासारख्या पांढऱ्या प्रकाशांत फुलें उमलतात पण आमच्या हृदयाचीं फुलें दारूच्या पांढऱ्याशुभ्र पात्रांनीच खुलतात.

( १० ) ऐषआरामांत काळ कंठणाऱ्याना अचानक मृत्यु येतो असा संकेत आहे. कवि म्हणतो कीं हे मृत्यो, आम्ही ऐषआरामात आणि तुला विसरून जीवन कंठीत आहोंत. मग तूं अचानकपणें येत कां नाहींस.

२१२ . . . [१]आयीना क्यौं न दूं के तमाशा कहें जिसे
ऐसा कहांसे लावूं के तुझसा कहें जिसे ॥ १ ॥
हस्रत्ने लारखा तेरी बज़्मे खियाल मे
गुल्दस्तये निगाहे सुवेदा कहें जिसे ॥ २ ॥
फूंका है किस्ने गोशे मोहोब्बत् मे अय् खुदा
अफ़्सूने इंतिज़ार् तमन्ना कहें जिसे ॥ ३ ॥
सरपर् हुजूमे दर्दे ग़रीबीसे डालिये
वो एक् मुश्ते खाक् के सहरा कहें जिसे ॥ ४ ॥
हैं चश्मे तर् मे हस्रते दीदार्से निहां
शौंके इनान् गुसेख्ता दरिया कहे जिसे ॥ ५ ॥
दरकार् है शिगिफ्तने गुल्हाये ऐश् को
सुबहे बहार् पंबये मीना कहे जिसे ॥ ६ ॥
[१]ग़ालिब बुरा न मान् जो वाइज़ बुरा कहे
ऐसा भी कोयी हैं के सब् अच्छा कहे जिसे ॥ ७ ॥

[१]( १ ) तुझ्यासारखी सुंदर स्त्री कोठून आणूं, थाव, तुला आरसा आणून देतों म्हणजे तूं आपलें रूप न्याहाळशील आणि तुझा विस्मय पाहून माझी करमणूक होईल.

( २ ) माझ्या हुरहुरीनें हृदयांत तुझे कटाक्ष आणून ठेविले आहेत आणि ते हृदयाचे मर्मस्थळ बनले आहेत.

( ३ ) हे परमेश्वरा, प्रेमाच्या कानांत कुणी वरें प्रियेसाठीं लागणाऱ्या तळमळीचा मंत्र फुंकला आहे ?

( ४ ) परदेशांत संकटामुळें डोक्यात माती घालावी असें वाटतें. ती थोडी थोडकी नसून लोकाना वाटावें कीं सगळें वाळवंट जणूं मी डोक्यावर घेत आहें.

( ५ ) प्रियेला पाहाणाऱ्या तळमळीमुळें माझ्या डोळ्यात इतके अश्रु येऊन थबकले आहेत कीं त्यांना समुद्राचीच उपमा साजेल.

( ६ ) सकाळच्या कापसासारख्या पांढऱ्या प्रकाशात फुलें उमलतात पण आमच्या हृदयाचीं फुलें दारूच्या पांढऱ्याशुभ्र प्यालानींच खुलतात.

(७) गालिब, तो कट्टर धर्मप्रचारक तुला वाईट म्हणत असेल तर वाईट वाटून घेऊ नकोस. सगळेच ज्याला चांगला म्हणतात असा जगात कोणी असेल काय ?

२१३ . . .

शब्नम् व गुलेलाला न खाली अज् अदा है
दागे दिले बेदरद् नजरगाहे हया हैं ॥ १ ॥
दिल खूशुदये कश्मकशे हस्रते दीदार्
आयीना बदस्ते बुते बदमस्त् हिना है ॥ २ ॥
शोलेसे न होती हवसे शोलेने जो की
जी किस्कदर् अफ्सुर्दगीये दिल पे जिला हैं ॥ ३ ॥
तिम्साल्मे तेरी है वो शोखी के बसद् जौक़
आयीना बअंदाजे गुल आगोश कुशा हैं ॥ ४ ॥
कुम्री कफे खाकस्तर् व बुल्बुल कफ़से रग
अय् नाला निशाने जिगरे सोख़्ता क्या हैं ॥ ५ ॥
खूने तेरी अफ्सुर्दा किया वहशते दिलको
माशूकी व बेहौसलगीये तर्ज बला हैं ॥ ६ ॥
मजबूरी व दाव्ये गिरफ्तारीये उल्फत्
दस्ते तहे संग् आमदा पैमाने वफ़ा है ॥ ७ ॥
मालूम हुवा हाले शहीदाने गुजिश्ता
तेगे सितम् आयीनये तस्वीर्नुमा है ॥ ८ ॥
अय् परतवे खुर्शीदे जहाताब् इधर भी
साये की तरह हम्पे अजब् वक्त पडा है ॥ ९ ॥
नाकर्दा गुनाहोंकी भी हस्रत् की मिले दाद्
यारब् अगर इन् कर्दा गुनाहों की सज़ा हैं ॥ १० ॥
बेगानगीये खल्क् से बेदिल न हो ग़ालिब्
कोयी न हो तेरा तो मेरी जान खुदा है ॥ ११ ॥

(१) फुलावरचे दवबिंदु निरर्थक नाहीत. हृदयात व्यथा आणि तळमळ नसेल तर व्यर्थ होय. फुले निष्ठुर असतात. आपल्याला तळमळ नाही ह्याची त्याना लाज वाटून त्यांना घाम आला. त्यालाच दवबिंदु म्हणतात.

( २ ) तिला पाहाण्याच्या तळमळींत हृदयाचें रक्त वाहूं लागलें. हें रक्त प्रियेच्या हाताची मेंहंदी होय. ह्या मेहंदीकडे प्रिया आरशात पाहावें तशी सतत पाहात असते. जणू काय माझ्या रक्तानें बनलेली मेहंदी तिला आरशासारखी भासूं लागली.

( ३ ) प्रेमाग्नीनें मी जितका जळत आहें तितका त्याच्या अग्नीनें जळलों नसेन. माझ्या मनःस्थितीमुळें मी अग्नीपेक्षांही जास्त दाहकपणें जळत आहें.

( ४ ) तुझ्या प्रतिबिंबित सौंदर्याच्या मादकपणाला भुलून आरसा उमललेल्या फुलाप्रमाणें विकसला आहे. हेतु हा कीं तुझें सौंदर्य आपल्यांत पूर्णपणें सामावलें जावें.

( ५ ) कुमरी पक्षी म्हणजे गुलाचा प्रियकर हा प्रेमशोकांत जळून राखेचा रंग धारण करीत आहे आणि फुलांचा प्रियकर बुलबुल प्रेमांत नष्ट होऊन फक्त रंगाच्या रूपानें शिल्लक आहे. त्याच्यांत जीव राहिला नाहीं. हा रंगही फुलामुळेंच शिल्लक राहिला आहे. म्हणजे राखेमुळें कुमरी पक्षी आणि रंगामुळें बुलबुल ह्यांचा पत्ता तरी मिळतो पण माझ्या दग्ध काळजाचा पत्ता कसा लागावा.

( ६ ) हे प्रिये, तुझ्या प्रेमामुळें माझें हृदय तळमळत आहे. ती तळमळ घालविणें तुझ्या हातांत आहे पण तूं उपेक्षा करूं लागल्यामुळें ती तळमळ नाहींशी होऊं लागली हें मोठें संकट माझ्या नशिबीं आलें आहे.

( ७ ) लाचारीच्या अवस्थेंत, प्रेम करण्याचा दावा मांडणें म्हणजे जड दगडाखालीं हात सांपडल्यासारखें आहे. वर वर म्हणायला आमचें प्रेम यशस्वी आहे असें हे प्रेमिक म्हणतात पण आंतून त्यांची लाचारी जाणवल्याशिवाय राहात नाहीं.

( ८ ) तुझ्या हातांतील छळाची तलवार पाहूनच तुझ्या हातून हत झालेल्यांची स्थिति काय झाली हें समजण्यासारखें आहे. कारण तुझी तलवार म्हणजे आरशासारखी आहे. त्यांत वरील छळाचें स्पष्ट प्रतिबिंब दिसून येतें.

( ९ ) हे परमेश्वरा, आम्ही सावलीला सत्य समजण्याच्या भ्रमांत सापडलों आहोंत. तुझी कृपादृष्टि यत्किंचित जरी आमच्याकडे वळली (तुझ्या कृपेचा एक किरण जरी आमच्या वाट्याला आला) तरी आमचे भ्रम नाहींसे होतील.

( १० ) परमेश्वरा, केलेल्या पापाची शिक्षा आम्हांला मिळणार असेल तर जीं पापें मनांत आलीं पण आम्ही करूं शकलों नाहींत त्याबद्दल पण आम्हांला शिक्षा झाली पाहिजे ना ?

( ११ ) लोक आपल्याला विचारीत नाहींत म्हणून उदास होऊं नकोस. कोणी नसला तरी विचारणारा परमेश्वर पाठीशी आहे ना ?

२१४ . . . मंज़ूर थी ये शक्ल तजल्ली को नूर की
किस्मत खुली तेरे कदोरुख् के ज़ुहूर की ॥ १ ॥

इक् खूंचिकां कफ़न् मे करोडों वनाव हैं
पड़ती है आंख तेरे शहीदोंपे हूर की ॥ २ ॥
वाइज़् न तुम् पियो न किसीको पिला सको
क्या बात् है तुम्हारे शरावे तहूर की ॥ ३ ॥
आमद् बहार की है जो बुल्बुल है नग़्मा संज
उडतीसी एक ख़बर है ज़बानी तुयूर की ॥ ४ ॥
लडता है मुझसे हश्र मे कातिल के क्यों उठा
गोया अभी सुनी नहीं आवाज़ सूर की ॥ ५ ॥
गो वां नहीं पे वांके निकाले हुये तो हैं
कावेसे इन् बुतोंको भी निस्वत् है दूर् की ॥ ६ ॥
क्या फ़र्ज है के सब् को मिले एकसाजवाब्
आवो न हम् भी सैर् करें कोहे तूर् की ॥ ७ ॥
गरमी सही कलाम मे लेकिन् न इसक़दर्
की जिस्से वात् उसने शिकायत जरूर् की ॥ ८ ॥
ग़ालिब् गर् इस् सफ़र् मे मुझे साथ ले चलें
हज् का सवाब् नज़र करूंगा हुज़ूर् की ॥ ९ ॥

( १ ) सौंदर्याला सुंदर बांधा आणि हूर ह्यांची प्रतीक्षा होती. तू त्यामतांच सौंदर्याचें भाग्य उजळलें.

( २ ) तुझ्या हातानें वध झालेल्या प्रेमिकांचें वैभव काय वर्णावें? रक्तरंजित कफनांत लपेटलेलीं त्यांचीं शरीरें पाहून अप्सरा त्यांच्यावर मोहित होतील.

( ३ ) अरे धर्मप्रवचनकारा, तू स्वर्गीय सुधेची थोरवी वर्णन करीत आहेस. जी तूं पिऊं शकत नाहींस आणि दुसऱ्याला पाजूं शकत नाहींस असली कसली रे ती सुधा. ती कल्पनेची सुधा असेल.

( ४ ) वसंतऋतूचें आगमन होणार अशी उडत उडत बातमी आली आहे. तो पाहा बुलबुल गीतें गाऊं लागला आहे.

( ५ ) कयामतीच्या दिवशीं परमेश्वराच्या दूतानें शिंग फुंकलें की मृत माणसें उठून बसतात अशी कल्पना आहे. प्रेमिक असाच उठून बसला तर प्रेयसीला राग आला की माझ्या आज्ञेशिवाय हा परत उठला कसा म्हणून.

( ६ ) मूर्ती आतां काब्यांत नाहींत पण काब्यांतून काढून टाकलेल्या आहेत ना. म्हणजे दूरचा कां होईना मूर्तींचा आणि काब्याचा संबंध आहेच ना !

( ७ ) चला आपणही टारस पर्वताची सहल करू या. पैगंबर मोझेसला परमेश्वरानें दिलें तेंच उत्तर आपल्याला मिळेल कशावरून ? त्यापेक्षां अधिक आशादायक उत्तर आपल्याला कदाचित् मिळेल.

( ८ ) वाणींत जोम पाहिजे पण इतकाही नको कीं लोकांना गान्हाणें करावेंसें वाटेल. वाणींत संयम आणि समतोलपणा पाहिजे.

( ९ ) बादशहांनीं मला मक्केच्या यात्रेंत बरोबर नेण्याचें ठरविलें, तर यात्रेचें सगळें पुण्य मी त्यांना नजर करण्यास तयार आहें.

२१५... ग़म् खाने मे बोदा दिल् नाकाम् बहोत् है
ये रंज के कम् है मये गुल्फ़ाम् बहोत हे ॥ १ ॥
कहते हुये साकीसे हया आती है वर्ना
है यौं के मुझे दुर्दे तहे जाम् बहोत् है ॥ २ ॥
नै तीर् कमान् मे है न सय्याद् कमीन् मे
गोशे मे कफस् के मुझे आराम् बहोत् है ॥ ३ ॥
क्या जहद को मानूं के न हो गर्चे रियायी
पादाशे अमल्की तमअे खाम बहोत् है ॥ ४ ॥
हैं अहले खिरद् किस रविशे खास् पे नाज़ां
पाबस्तगीये रस्मोरहे आम् बहोत् है ॥ ५ ॥
जम्जम्हीपे छोडो मुझे क्या तौफे हरम्से
आलूदा व मय् जामये इहराम् बहोत् है ॥ ६ ॥
है कहर् गर् अबभी न बने बात् के उन्को
इन्कार् नहीं और मुझे इब्राम् बहोत है ॥ ७ ॥
खूं होके जिगर आंखसे टपूका नही अय् मर्ग
रहने दे मुझे यां के अभी काम बहोत् है ॥ ८ ॥
होगा कोयी ऐसा भी के ग़ालिब् को न जाने
शाइर् तो वो अच्छा है पे बद्नाम् बहोत् है ॥ ९ ॥

( १ ) माझें हृदय भारीच दुबळें बनलें आहे. एवढेसें दुःखसुद्धां त्याला सहन होत नाहीं. आज पिण्यास मदिरा थोडी आहे ह्याचेंच दुःख त्याला भारी वाटत आहे.

( २ ) साकीला सांगायला मला लाज वाटते पण खरी गोष्ट अशी कीं मदिरापात्राच्या तळाशीं उरलेली मदिरा मला फार आवडते. पण मी किती हलक्या रुचीचा आहें असें साकी समजेल म्हणून मी गप्प आहें.

( ३ ) धनुष्याला बाण जोडला नाहीं कीं परिसरात व्याध नाहीं. ह्या कारागारात मला विलक्षण स्वस्थता अनुभवास येत आहे.

( ४ ) ज्या उपासनेंत कामना आहे ती उपासना काय कामाची. असली उपासना सदोष होय. कारण परलोकीं सुखें मिळावीं हा त्या मागील हेतु असतो.

( ५ ) चार लोकांसारखे आपण वागतों ह्या गोष्टीचा बुद्धिमान अभिमान बाळगतात ह्यात मला काहीं वैशिष्ट्य वाटत नाहीं. काहीं तरी असाधारण हे लोक करून दाखवितील तर ती खरी बुद्धिमत्ता म्हणावी.

( ६ ) मला जम्‌जम्‌च्या पवित्र विहिरीवर बसून राहूं द्या कर्मे. मला हरम ( पवित्र स्थळ ) ची प्रदक्षिणा घेऊन काय करावयाचें आहे. माझे यात्रेकरूंचे कपडे मद्यानें भरले आहेत.

( ७ ) माझी विनवणी आहे आणि तिची समति आहे ह्या उपरही मीलन झालें नाहीं तर माझें दुर्दैव म्हणावे लागेल.

( ८ ) हे मृत्यो, मला अजून प्रेमाचा आघात होऊन डोळ्यावाटे रक्त वाहात नाहीं. तू येण्याची घाई करूं नकोस, मला जीवनाच्या सुरसु खाचे अनुभव अजून घ्यावयाचे आहेत.

( ९ ) गालिबला न ओळखणारा कोणी सापडणार नाहीं कारण तो बदनाम आहे. पण खरें म्हटलें तर तो उत्तमपैकीं कवि पण आहे

२१६ . . . मुद्दत हुयी है यारको मेहमा किये हुये
जोशे कदहसे बज्मे चरागां किये हुये ॥ १ ॥
करता हूं जमा फिर जिगरे लख्तलख्त को
अर्सा हुआ है दावते मिज़गा किये हुये ॥ २ ॥
फिर् वज़ए एहतियातसे रुकने लगा है दम्
बर्सों हुये हैं चाके गरेबा किये हुये ॥ ३ ॥
फिर् गर्मे नालाहाये शररबार हैं नफ़स्
मुद्दत् हुयी है सैरे चरागां किये हुये ॥ ४ ॥
फिर पुर्सिशे जराहते दिलको चला है इश्क
सामाने सदहजार नमकदा किये हुये ॥ ५ ॥
फिर भररहाहू खामए मिजगां बखूने दिल
साजे चमन्तराजीये दामा किये हुये ॥ ६ ॥
बा हमदिगर हुये हैं दिलोदीदा फिर रकीब
नज्जारा व खियाल का सामा किये हुये ॥ ७ ॥

दिल् फिर् तवाफ़े कूये मलामत् को जाये है
पिंदारका सनमकदा वीरां कियेहुये ॥ ८॥
फिर् शौक करहा है ख़रीदार् की तलब्
अर्जे मताए अक्लो दिलो जां किये हुये ॥ ९ ॥
दौडे है फिर् हर एक् गुलो लाला पर खियाल
सद् गुलसितां निगाह् का सामां किये हुये ॥ १० ॥
फिर् चाहता हूं नामये दिल्दार् खोलना
जां नज़रे दिल फरेबीए उन्वां किये हुये ॥ ११ ॥
मांगे हैं फिर् किसी को लबे बाम् पर हवस्
जुल्फ़े सियाह रुख़पे परीशां किये हुये ॥ १२ ॥
चाहे है फिर् किसी को मुकाबिल मे आरज़ू
सुर्मेसे तेज़् दश्नये मिज़गां किये हुये ॥ १३ ॥
इक् नौबहारे नाज़् को ताके है फिर निगाह
चेहरा फ़रोग़े मय् से गुलिस्तां किये हुये ॥ १४ ॥
फिर जी मे है के दर पे किसी के पडे रहें
सर जेर बारे मिन्नते दरबां किये हुये ॥ १५ ॥
जी ढूंडता है फिर वही फुर्सत् के रातदिन्
बैठे रहें तसव्वुरे जानाँ किये हुये ॥ १६ ॥
ग़ालिब् हमे न छेड् के फिर् जोशे अश्क से
बैठे हैं हम् तहीये तूफ़ां किये हुये ॥ १७ ॥

(१) प्रियेला पाहुणी म्हणून आणि तिच्या स्वागतार्थ मैफिली मजकून आणि घरांत दिवाळीची आरास करून अनेक दिवस झाले.

(२) आता ती पुन्हा येणार म्हणून हृदयाचे इतस्ततः विखुरलेले तुकडे पुन्हा एकत्र करीत आहे. कारण हृदय भग्न करण्याकरिता म्हणून तिच्या पापण्यांना आमंत्रण देऊन बरेच दिवस झाले.

(३) आता पुन्हा जीव गुदमरू लागला आहे. प्रेमवेडात स्वतःचे कपडे फाडून टाकल्याला अनेक दिवस झाले. आता प्रिया पुन्हा येणार म्हणून पहिल्यासारखी मन स्थिति होऊ लागली आहे.

( ४ ) फिरून निश्वासाची दाहकता दिसून येऊं लागली आहे. दाहक निश्वासानीं दिव्यासारखी आरास झालेल्याला पुष्कळ दिवस झाले

( ५ ) हृदयाच्या भग्नावस्थेची विचारपूस करण्याकरिता प्रेम पुन्हा वाट चलूं लागलें आहे. आणि जखमावर मीठ शिंपडण्याकरिता प्रेमानें आपल्याबरोबर मिठाच्या अगणित पेट्या घेतल्या आहेत

( ६ ) माझ्या पापण्याची लेखणी मी पुन्हा हृदयाच्या रक्तांत बुडवीत आहें. त्या लेखणीनें मला आपल्या वस्त्रावर रंग उमटवायचे आहेत.

( ७ ) हृदयाला प्रियेच्या चिंतनात म्हणून आणि डोळ्याना प्रियेच्या दर्शनाकरिता म्हणून आपसात चटाओढ लागली आहे.

( ८ ) अहंकाराचें आसन उध्वस्त करून हृदय पुन्हा अवमान आणि अवहेलनेची वाट चालूं लागलें आहे

( ९ ) रसिकतेनें विक्रीकरिता म्हणून पुन्हा आपली बुद्धि, हृदय आणि प्राण बाजारात माडले आहेत

( १० ) दृष्टि पुन्हा पुन्हा आपली सारी शक्ति एकवटून फुलानीं बहरलेल्या उपवनाकडे वळत आहे

( ११ ) प्रियेचे पत्र उघडून त्याच्या आकर्षक शीर्षकावर पुन्हा जीव ओवाळून टाकावा असें वाटूं लागलें आहे.

( १२ ) प्रिया आपले केश मुक्त सोडून पुन्हा गच्चीवर यावी असें मनाला पुन्हा पुन्हा वाटूं लागले आहे.

( १३ ) कुणीतरी डोळ्याना सुर्मा लावून आपले शर तीक्ष्ण करून समोर येऊन बसावें असें पुन्हा वाटूं लागलें आहे.

( १४ ) वारुणी पिऊन जिचा सुंदर चेहरा उजळून निघाला आहे अशा प्रमदेकडे पाहाण्याकरिता डोळे पुन्हा उत्कंठित झाले आहेत.

( १५ ) कुणाच्या तरी उंबरठ्यावर डोकें टेकून आणि रखवालदाराचे ऋणी होऊन पडावें असें पुन्हा वाटूं लागलें आहे.

( १६ ) दिवसरात्र प्रियेचे चिंतन करीत बसावें असें मनाला रात्रंदिवस वाटूं लागलें आहे.

( १७ ) गालिब, आम्हाला छेडूं नकोस बरें आमचें ऊर भरून आलें आहे आणि आम्ही बादलाची तयारी करून बसलों आहोंत

२१७ . . . नवीदे अमन है बेदादे दोस्त् जान् के लिये
रही न तर्जे सितम् कोयी आस्मा के लिये ॥ १ ॥

बखसे गर् मिजहे यार् तश्नये ख़ू है
रख़ कुछ अपनी भी मिज़गाने ख़ूँफिशा के लिये ॥ २ ॥
वो जिंदा हम हैं के हैं रूशिनासे ख़ल्क अये ख़िज्र
न तुम् के चोर् बने उम्रे जाविदा के लिये ॥ ३ ॥
रहा बलामे भी मै मुब्तिलाये आफते रश्क
बलाये जान् हे अदा तेरी इक् जहा के लिये ॥ ४ ॥
फलक़ न दूर् रख उससे मुझे के मै ही नहीं
दराज़दस्तीये कातिल् के इम्तिहा के लिये ॥ ५ ॥
मिसाल ये मेरी कोशिश् की है के मुर्ग असीर्
करे कफस् मे फराहम् ख़स् आशिया के लिये ॥ ६ ॥
गदा समझके वो चुप् था मेरी जो शामत् आयी
उठा आर् उठ्के कदम् मैने पासबा के लिये ॥ ७ ॥
बकद्रे शौक़ नहीं ज़र्फे तंगनाये गजल
कुछ ओर् चाहिये वसअत् मेरे बया के लिये ॥ ८ ॥
दिया है ख़ल्क को भी ता उसे नज़र् न लगे
बना हे ऐश् तजमल हुसेन ख़ा के लिये ॥ ९ ॥
ज़बा पे बारे ख़ुदाया ये किस् का नाम् आया
के मेरे नुत्क़ ने बोसे मेरी ज़बा के लिये ॥ १० ॥
नसीरे दौलत् व दीन् और मुइने मिल्लत् व मुल्क्
बना है चर्ख़ बरीं जिसकी आस्ता के लिये ॥ ११ ॥
जमाना अहद मे उसके है महवे आराइश्
बनेंगे आर् सितारे अब् आसमा के लिये ॥ १२ ॥
वरक़ तमाम् हुवा और मदह् बाक़ी है
सफीना चाहिये इस बहरे बेकरा के लिये ॥ १३ ॥
अदाये ख़ास से गालिब् हुवा है नुक्ता सरा
सलाये आम् है याराने नुक्तादा के लिये ॥ १४ ॥

(१) माझ्याकडे दुर्लक्ष करणारी तरुणी वरी कारण माझ्या प्रियनें छळ करण्याचा कोणतीही तऱ्हा शिल्लक ठेवली नाहीं

(४) फिरून निश्वासाची दाहकता दिसून येऊं लागली आहे. दाहक निश्वासानीं दिव्यासारखी आराम झालेल्याला पुष्कळ दिवस झाले.

(५) हृदयाच्या भग्नावस्थेची विचारपूस करण्याकरिता प्रेम पुन्हा वाट चालूं लागलें आहे आणि जखमावर मीठ शिंपडण्याकरिता प्रेमानें आपल्याबरोबर मिठाच्या असंख्य पेट्या घेतल्या आहेत.

(६) माझ्या पापण्याची लेखणी मी पुन्हा हृदयाच्या रक्तात बुडवीत आहें. त्या लेखणीनें मला आपल्या कपड्यावर रंग उमटवायचे आहेत

(७) हृदयाला प्रियेच्या चिंतनात म्हणून आणि डोळ्याना प्रियेच्या दर्शनाकरिता म्हणून आपसात चढाओढ लागली आहे.

(८) अहंकाराचें आसन उध्वस्त करून हृदय पुन्हा अवमान आणि अवहेलनेची वाट चालूं लागलें आहे.

(९) रसिकतेन विक्रीकरिता म्हणून पुन्हा आपली बुद्धि, हृदय आणि प्राण बाजारात मांडले आहेत

(१०) दृष्टि पुन्हा पुन्हा आपली सारी शक्ति एकवटून फुलानीं बहरलेल्या उपवनाकडे वळत आहे

(११) प्रियेचें पत्र उघडून त्याच्या आकर्षक शीर्षकावर पुन्हा जीव ओवाळून टाकावा असें वाटूं लागलें आहे.

(१२) प्रिया आपले केश मुक्त सोडून पुन्हा गच्चीवर यावी असें मनाला पुन्हा पुन्हा वाटूं लागलें आहे.

(१३) कुणीतरी डोळ्याना सुर्मा लावून आपले शर तीक्ष्ण करून समोर येऊन बसावें असें पुन्हा वाटूं लागलें आहे.

(१४) वारुणी पिऊन जिचा सुंदर चेहरा उजळून निघाला आहे अशा प्रमदेकडे पाहाण्याकरिता डोळे पुन्हा उत्कंठित झाले आहेत.

(१५) कुणाच्या तरी उंबरठ्यावर डोकें टेकून आणि रखवालदाराचे ऋणी होऊन पडावें असें पुन्हा वाटूं लागलें आहे

(१६) दिवसरात्र प्रियेचें चिंतन करीत बसावे असें मनाला रात्रंदिवस वाटूं लागलें आहे

(१७) गालिब, आम्हाला छेडूं नकोस बरें. आमचे ऊर भरून आले आहे आणि आम्ही वादळाची तयारी करून बसलों आहोंत

२१७ . . . नवीदे अमन है वेदादे दोस्त् जान् के लिये
रही न तर्जे सितम् कोयी आसमां के लिये ॥ १ ॥

बलासे गर् मिज़हे यार् तश्नये खूं है
रखूं कुछ अपनी भी मिज़गाने खूंफ़िशां के लिये ॥ २ ॥
वो जिंदा हम हैं के हैं रूशिनासे ख़ल्क़ अये ख़िज़्
न तुम् के चोर् बने उम्रे जाविदां के लिये ॥ ३ ॥
रहा बलामे भी मै मुब्तिलाये आफ़ते रश्क
बलाये जान् है अदा तेरी इक् जहां के लिये ॥ ४ ॥
फ़लक् न दूर् रख् उससे मुझे के मै ही नहीं
दराज़दस्तीये क़ातिल के इम्तिहां के लिये ॥ ५ ॥
मिसाल ये मेरी कोशिश् की है के मुर्ग़े असीर्
करे क़फ़स् मे फ़राहम् खस् आशियां के लिये ॥ ६ ॥
गदा समझके वो चुप् था मेरी जो शामत् आयी
उठा और् उठ्के कदम् मैने पासवां के लिये ॥ ७ ॥
बक़द्रे शौक़ नहीं ज़र्फ़े तंगनाये गज़ल
कुछ और् चाहिये वसअत् मेरे बयां के लिये ॥ ८ ॥
दिया है ख़ल्क को भी ता उसे नज़र् न लगे
बना है ऐश् तजमल हुसेन् ख़ां के लिये ॥ ९ ॥
ज़बां पे बारे खुदाया ये किस् का नाम् आया
के मेरे नुत्क़ ने बोसे मेरी ज़बां के लिये ॥ १० ॥
नसीरे दौलत् व दीन् और मुईने मिल्लत् व मुल्क्
बना है चर्ख़ बरीं जिस्की आस्तां के लिये ॥ ११ ।
ज़माना अहद मे उसके है महवे आराइश्
बनेंगे और् सितारे अब् आसमां के लिये ॥ १२ ॥
वरक़ तमाम् हुवा और मदह् बाक़ी है
सफ़ीना चाहिये इस बहरे बेकरां के लिये ॥ १३ ॥
अदाये ख़ास से ग़ालिब् हुवा है नुक्ता सरा
सलाये आम् है याराने नुक्तादां केलिये ॥ १४ ॥

(१) माझ्याकडे दुर्लक्ष करणारी तरुणी वरी कारण माझ्या प्रियेनें छळ करण्याची कोणतीही तऱ्हा शिल्लक ठेविली नाहीं.

( २ ) प्रियेच्या पापण्याना माझें रक्त हवें आहे पण मी तें सर्व देणार नाहीं कारण मला डोळ्यावाटे वाहण्याकरिता रक्त नको का ?

( ३ ) हे खिजर्, ( हा चिरंजीव समजतात ) तुझें दीर्घायुष्य काय कामाचे ? तू कुणाला दिसत नाहींस की कुणाला भेटत नाहींस चोरासारखें तुझें जीवन आहे आमचें पाहा ह्या अल्पजीवनात आमचें नाव सर्वतोमुखीं झाल आहे

( ४ ) तू माथा छळ करतेस पण मला त्यातही हेवा वाटतो तो ह्याकरिता कीं तू सगळ्या जगाला छळतेस तें का ? तुझा छळ फक्त माझ्या वाट्याला यायला हवा त्यात दुसऱ्याना वाटा काय म्हणून मिळावा ?

( ५ ) शिकार दूर असली तरच तिला धरण्यात शिकाऱ्याचें कौशल्य आहे म्हणून का हे काला, मला तू प्रियेपासून दूर ठेवलेंस ? हा प्रयोग करून पाहाण्याकरिता मीच का तुला सापडलों ?

( ६ ) माझे सारे प्रयत्न निरर्थक आहेत कारागारात सापडलेल्या पक्ष्यान घरटें बाधण्याच्या हेतूनें गवताच्या काड्या गोळा करण्याचा प्रयत्न करावा तसें माझें झाल आहे

( ७ ) मला भिकारी समजून तिच्या घरचा रखवालदार गप्प होता पण माझें दुर्दैव त्याचे पाय धरण्याची बुद्धि मला आठवली आणि म्हणून माझें स्वरूप त्याला उमगलें

( ८ ) माझ्या वाणीला गजलाचा पद्यप्रकार अपुरा पडतो माझे विचार व्यक्त करण्यास गजलाहून विशाल असें वृत्त हव

( ९ ) परमेश्वरानें बहुतेक वैभव तजमल हुसेन खा ( फर्रुखाबादचा नबाब ) ला दिल आहे उरलेल थोडें वैभव इतराच्या वाट्याला दिल आहे हेतु हा कीं नवाबाला कुणाची दृष्ट लागू नये

( १० ) नवाबाचें नाव जिभेवर येताच माझ्या घशानें प्रेमानें माझ्या जिभेचें चुंबन घेतलं

( ११ ) नवाबसाहेब हे धर्मरक्षक आणि देशरक्षक आहेत नियति स्वत त्याचा उंबरठा बनली आहे

( १२ ) नवाबाच्या राज्यांत प्रत्येक वस्तु सुंदर रूप धारण करीत आहे आणि नवनवे शृंगार करीत आहे कदाचित् आकाशालाही आपल्या शृंगाराकरितां नवीन तारे निर्माण करावे लागतील

( १३ ) नवाबाची स्तुति करताना कागद पुरत नाहींत त्या अथाग गुणसमुद्रा